आंतरभारतीय पुस्तकमाला

# भारतींच्या
## ललित साहित्यकृती

**सुब्रह्मण्य भारती**

संपादक
**पेरियस्वामी तूरन**

अनुवाद
**अरुण टिकेकर**



**नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया**

## उपोद्घात

प्रत्येक भाषेची लिखित गद्य शैली आणि बोली भाषा प्रारंभीच्या काळात एकच असावी असे वाटते. परंतु मुद्रणाची सोय नसल्यामुळे मौखिक रूपाने सांगितलेले अनुभव, आठवणी आणि कहाण्या त्याच गद्य शैलीत अंकित करून सुरक्षित ठेवणे शक्य झाले नाही. जेव्हा ताडपत्रांवर खिळयाच्या साह्याने लेखन सुरू झाले, त्या काळातही काव्याबरोबर गद्य लिपिबद्ध करणे इतके सुकर नव्हते. भावपूर्ण काव्य लिपिबद्ध करणे आणि मुखोद्गत करणे, गद्याच्या तुलनेने, अधिक सोपे वाटले असावे. म्हणून कदाचित सर्वप्रथम काव्यरचना जन्माला आली आणि तोच क्रम पुढे चालू राहिला. अतिप्राचीन काळातसुद्धा तमिळ भाषा सुविकसित, परिमार्जित आणि व्याकरणबद्ध होती तरीही ह्याच अवस्थेतून ती गेली असे म्हणणेच योग्य ठरेल.

आठव्या शतकात लिहिले गेलेले '**इरैयनार कळवियल**' प्राचीन काळच्या तमिळ गद्यशैलीचा एक नमुना म्हणून समजता येईल. एक दोन शतकांनंतर '**तोल्काप्पियम्**' आणि '**पत्तुपाट्टु**' यांच्या टीका अनेकांनी तयार केल्या. इळमपूरणार, पेरासिरियर, नच्चिनारक्किनियर, परिमेलळगर, सेनावरैयर, अडियारक्ळु नल्लार अशा कितीएक विद्वानांनी किती तरी विशिष्ट ग्रंथांवर सुंदर टीका लिहिली. ह्या लेखकाचा काळ इ. स. बारावे शतक ते इ. स. सोळावे शतक हा होय. अर्थात ह्या लेखकांचे टीकात्मक व समीक्षात्मक लेखन मूळाबरहुकूम आपल्यापर्यंत पोहोचले असेलच असे मानणे योग्य होणार नाही. कारण प्रथम मौखिक रूपात जतन केलेली ही टीका नंतरच्या काळात ताडपत्रांवर लिपिबद्ध करण्यात आली, असेच मानणे योग्य ठरेल.

ह्या टीकाकारांना आपल्या टीका विस्ताराने लिहिता आल्या नाहीत म्हणून त्यांनी एक विशिष्ट गद्य शैली अवलंबिली, जी कवितेसारखी काव्यमय आणि अपरिपुष्ट होती. '**शिलप्पदिगारम्**'चे भाष्य लिहिताना अडियारक्ळु नल्लारने पहिल्या दोन

पंक्तींवर विस्तृत रूपात भाष्य करून नंतर लिहिले आहे की ह्या प्रकारचे विस्तृत भाष्य करणे असंभवनीय असल्यामुळे अन्य पदांवरील भाष्य संक्षिप्त रूपाने दिले जात आहे.

'**शिलपदिगारम्**' मध्ये दोन पद्यांच्या मध्ये गद्यालाही स्थान मिळालेले दिसते. तसेच संघकाळातील एक कवी भारतम् पाडिय पेरुंदेवनार यांनी आपल्या ग्रंथात 'वेण्बा' आणि 'अगवल पा' या तमिळ काव्यच्छंदाचा अधिक प्रयोग केलेला आढळून येतो आणि अधूनमधून गद्यभागाचा वापर केलेला दिसतो. परंतु ह्या सर्व लेखनाला तमिळ गद्यशैलीचा नमुना म्हणून ग्रहण करणे योग्य होणार नाही. फक्त त्या काळातही जी गद्यशैली वापरली गेली होती ती कशा रूपात आहे, एवढेच आपल्याला ह्या ग्रंथांमुळे कळून येते.

मध्ययुगीन काळात जैनलेखकांनी संस्कृतप्रचुर अशा 'मणिप्रवाल' शैलीचा अवलंब केला होता हे 'श्रीपुराण' व 'सत्यचिंतामणी' या ग्रंथांवरून लक्षात येते. वैष्णव आचार्यांनी सुद्धा '**नालायिर दिव्यप्रबंधम्**' वर जे भाष्य लिहिले आहे तेसुद्धा 'मणिप्रवाल' शैलीत आहे. शैव सिद्धांताच्या ग्रंथावरील भाष्ये शैव संप्रदायाच्या पंडितांनी गद्यातच रचलेली आढळतात. परंतु ह्या सर्वांनाही तमिळ गद्यशैलीच्या विकासाची उदाहरणें म्हणून आपण स्वीकारू शकत नाही.

असे मात्र म्हणू शकतो की भारतात छापखान्याचा वापर सुरु झाला तेव्हापासून गद्याच्या विकासालाही सुरुवात झाली. ह्यानंतरच गद्यातील ग्रंथांचा विकास होऊ लागला. ख्रिस्ती धर्मप्रचारासाठी 'बायबल'चा अनुवाद तमिळ गद्यात झाला.

बाराव्या शतकापासून ते सोळाव्या शतकापर्यंतच्या काळातील जे शिलालेख आपल्याला उपलब्ध आहेत, त्यावरून ध्यानात येते की, तमिळ गद्याचा विकास अशा तऱ्हेने होत राहिला परंतु शिल्पकारांना तमिळ भाषेचे चांगले ज्ञान नसल्यामुळे शिलालेखात अनेक प्रकारच्या चुका राहिल्या. म्हणून तमिळ गद्याचा विकास दाखवताना त्यांचे देखील उदाहरण घेता येत नाही.

अठराव्या शतकाच्या प्रारंभास वेस्की नामक इटालियन मिशनरी पाद्री तमिळनाडूत आले. त्यांनी तमिळ भाषेचे चांगले अध्ययन केले आणि वीरमामुनिवर या नावाने तमिळमध्ये काव्यरचना केली. ह्याव्यतिरिक्त '**अविवेकपूर्ण गुरुकथै**', '**वेदेयर ओळुक्कम**' आदि गद्यकाव्येही लिहिली. ह्यांच्या आधी सतराव्या शतकाच्या मध्यावर जे ख्रिस्ती पाद्री भारतात आले होते ते 'तत्त्वबोधक स्वामी' या नावाने तमिळनाडूत राहिले आणि आपला अंतिम श्वासही त्यांनी येथेच घेतला. संस्कृतप्रचुर शैलीत त्यांनी अनेक ग्रंथांची रचना केली. वीरमामुनिवरलिखित '**अविवेकपूर्ण गुरुकथै**' हास्यरस-प्रधान आहे. त्यांची गद्यशैली सोपी आणि सरळ असल्याने लोकांनी मोठ्या आवडीने

त्यांचे लेखन वाचले. त्यांच्या समकालीन असलेल्या शिवज्ञान मुनिवरांनी **'शिवज्ञान-बोधम्'** नावाचा विषयप्रधान आणि उत्कृष्ट ग्रंथ **'द्राविड महापाडियम्'** या नावाने लिहिला.

एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीला तांडवराय मुदलियार यांनी तमिळ गद्यशैलीला विलक्षण नावीन्य प्राप्त करून दिले. यांनी लिहिलेल्या पंचतंत्रातील कथा तत्कालीन तमिळगद्याचा एक सुंदर नमुना होत. त्यांची शैली सरळ, बोधगम्य आणि प्रवाही होती. **'कथा मंजरी'** या नावाच्या एका गद्यग्रंथाचे त्यांनी संकलन केले आहे.

यांच्या समकालीन लेखकांमध्ये थाळपाणम ( सिलोन) चे रहिवासी आरुमुख नावलर यांचे स्थान महत्त्वाचे आहे. यांचा जन्म सन १८२३ मध्ये झाला. त्यांनी तमिळ-मध्ये **'पेरियपुराण वचनम्,' 'तिरुविळैयाडल पुराणवचनम्,' 'कंदपुराणवचनम्'** अशा अनेक सुंदर गद्यग्रंथांची रचना केली. विद्यार्थ्यांसाठी त्यांनी पाठ्यपुस्तके तयार केली. सरळ सुबोध गद्यशैलीचे मार्गदर्शन करण्याचे सारे श्रेय त्यानाच मिळते. तिरुवरुट्-प्रकाश वळ्ळलार नावाच्या रामलिंगस्वामींनी **'मणुमुरै कंड वाचकम्,' 'जीविकारुणयम्'** आदि काही ग्रंथ लिहिले. त्यांच्यानंतर वीरास्वामी चेट्टियार यांनी **'विनोद रस मंजरी'** नामक गद्यग्रंथ रचला.

मायूरम् वेदनायकम् पिल्लै यांनी इ. स. १८७६ मध्ये **'प्रताप मुदलियार चरित्तिरम्'** नावाचे एक पुस्तक लिहिले. याला विनोदाचे खास अंग आहे. हीच तमिळ भाषेत प्रकाशित झालेली पहिली कादंबरी मानली जाते. इ. स. १८८७ मध्ये यांनीच **'सगुण-सुंदरी'** नावाची दुसरी एक कादंबरी लिहिली. वेदनायकम् पिल्लै यांची शैली अशी आहे की जणू दोन व्यक्ती आपापसात बोलत आहेत.

राजम् अय्यर यांनी सन १८७२–१८९८ मध्ये **'कमलांबाळ चरित्तिरम्'** नावाची एक सुंदर कादंबरी प्रकाशित केली. यानंतर लगेच म्हणजे १८९७ मध्येच मादवय्यांनी **'पद्मावती चरित्रम्'** नावाची कादंबरी तसेच अजून दोन कादंबऱ्या आणि **'कुरुविकर कुट्टीक्ककदैकळ'** शीर्षकाने काही कथा समकालीन गद्य शैलीत लिहिल्या.

दामोदर पिल्लै यांनी **'चूळामणी वचनम्'** नावाचा ग्रंथ विशिष्ट शब्दावलींचा वापर करून उत्कृष्ट शैलीत लिहिला आहे. सूर्यनारायण शास्त्रींनीही आपली **'मणिवाणन् कथै'** अशाच प्रकारच्या उत्कृष्ट शैलीत लिहिलेली आहे. त्यांनी काही नाटके आणि इतर ग्रंथही लिहिले. **'इल्लाणमै,' 'तमिल नावलर चरित्रम्'** आदि ग्रंथांचे कर्ते कवमसुंदरम् पिल्लै थाळपाणम् (सिलोन) चे निवासी होते.

विसाव्या शतकाच्या प्रारंभानंतर काही काळातच तमिळ गद्यसाहित्याचा सर्वा-भिमुख विकास सुरू झाला. साहित्याच्या सर्व शाखोपशाखांत ग्रंथकृती निर्माण होऊ लागल्या. मरैमलैयाडिकल यांनी शुद्ध तमिळ शैली वापरली. व्ही. कल्याणसुंदर

मुदलियार यांनी आलंकारिक परंतु प्रवाहमयी शैलीत भाषणे देऊन आणि लेखन करून तमिळगद्यशैलीला एक सुंदर रूप दिले. त्यांच्या निबंधसंग्रहांची आणि गद्यग्रंथांची संख्या बरीच आहे. हे प्रकाशित करित असलेल्या 'नवशक्ति' साप्ताहिकाचा तमिळ गद्याच्या विकासात फार मोठा सहभाग आहे.

पंडितमणि कदिरेसन चेट्टियार, नावलर सोमसुंदर भारतीयार, वेंगटस्वामी नाडार, आदींची शैलीही खूपच छान आणि वैशिष्टयपूर्ण असे. 'तमिलदादा' म्हणून विख्यात असलेले ख्यातनाम डॉक्टर, उ. वे. स्वामीनाथ अय्यर यांनी 'मीनाक्षी सुंदरम् पिल्लै चरित्तिरम्', 'एन चरित्तिरम्', 'नान कंडदुम केट्टदुम' वगैरे ग्रंथांत सुंदर, मधुर आणि अगदी सरळ भाषाशैली वापरली होती. या सरळ जिवंत आणि सुंदर शैलीचा अनेक समकालीन विद्वानांच्या शैलीवर प्रभाव पडलेला दिसून येतो. का. सुब्रह्मणीयम् पिलै यांनी तमिळ साहित्याचा इतिहास लिहिला. डॉक्टर रा. वि. सेतुपिल्लै यांनी एक अशी शैली वापरली की जीमुळे गद्य शैलीच्या लाक्षणिकतेवर प्रकाश पडतो.

तो. पो. मीनाक्षी सुंदरनार, का. अप्पातुरै यांच्यासारख्या अनेक भाषापंडितांनी सशक्त आणि सुस्पष्ट शैलीचा वापर केला. आचार्य कल्की कृष्णमूर्तींचा तमिळ-गद्याच्या विकासात फार मोठा हिस्सा आहे. जेव्हा ते 'आनंदविकटन' 'कल्की' वगैरे साप्ताहिकांचे संपादक होते तेव्हा त्यांनी हास्यलेख, उत्कृष्ट कथा, विशिष्ट ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या. अर्थशास्त्र आणि राजनीतीसारख्या गंभीर विषयां-वरही ते इतक्या सरळ आणि सोप्या भाषेत लिहीत असत की जनसामान्यालाही त्यांचे लिखाण समजणे अवघड वाटू नये.

राजाजींनी अनेक कथासंग्रह, निबंध, वैचारिक लेख आणि विविध विषयावर लिहिलेल्या ग्रंथांसाठी आपली एक खास अशी निराळी शैली वापरली.

तमिळ कादंबरीच्या क्षेत्रात मु. वरदराजन् यांनी युगांतरकारी परिवर्तन घडवून आणले. त्यांनी शिष्टसंमत शैलीतच आपल्या कादंबऱ्या रचल्या. परंतु तमिळ कादंबरीला वेगळे वळण दिले. आपले विचार साध्या भाषेत वाचकांपर्यंत पोहोच-विण्यात त्यांचा हात धरणारा दुसरा नव्हता. तमिळ भाषेचे आणि साहित्याचे सम्यक् ज्ञान त्यांच्या यशस्वितेत साथ देत असे. त्याची अनेकविध पुस्तके प्रकाशित झाली आहेत. त्यांचे अनुकरण करीत कु. राजवेलू यांनीही अनेक कादंबऱ्या लिहिल्या.

कि. वा. जगन्नाथन् यांनी सुंदर, सुबोध आणि समकालीन भाषाशैलीत कथा, लघुनिबंध आणि इतर पुस्तके लिहिली आहेत. ना. पार्थसारथी, मी. प. सोमसुंदरम् आदि तमिळ विद्वानांनी आणि लेखकांनी तमिळ कथा, कादंबरी आणि इतर साहित्याच्या क्षेत्रात उल्लेखनीय कामगिरी केली आहे. ह्या क्षेत्रात अकिलन यांचे स्थान वैशिष्टयपूर्ण आहे. त्यांच्या वाङ्मयकृतींची संख्याही बरीच आहे.

बी. एस्. रामय्यांनी सुंदर कथा तसेच 'तेरोट्टी मगन' ( कर्ण) अशा प्रकारची यशस्वी नाटके लिहिली. एस्. डी. सुंदरम् लिखित '**कवियिन कनवु**' नामक नाटक देशभक्तिपूर्ण, भावनाप्रधान आणि उत्कृष्ट नाटक आहे. चित्रपटांसाठी लिहिलेल्या यांच्या पटकथाही उल्लेखनीय आहेत. पम्मलसंबंध मुदलियार यांनी अनेक नाटके लिहून 'नाटकाचा जनक' असे नामाभिधान मिळविले आहे.

जगर्शिपियन, कोवी मणिशेखरन्, चाण्डिलयन्, रा. की. रंगराजन्, कण्णदासन् ह्यांनी खास शैलीत साहित्यकृती निर्मिल्या. लक्ष्मी, अनुत्तमा, राजम, कृष्णन, कोमगळ यांच्या-सारख्या लेखिकांनीसुद्धा प्रांजळ आणि सर्रास वापरल्या जाणाऱ्या शैलीत आपली सृजनशील लेखणी चालवून ख्याती मिळविली.

रसिकमणी टी. के. सी., एस्. महराजन आदींची निबंधशैली विचारानुकूल, गंभीर परंतु सुंदर आहे. मु. अरुणाचलम् यांनी दहाव्या शतकापासून पंधराव्या शतकापर्यंत तमिळ साहित्याचा अभ्यासपूर्ण आणि संशोधनात्मक इतिहास अनेक खंडांत लिहिला. तमिळ गद्य साहित्याच्या विकासात ह्या इतिहासाला महत्त्व आहे. ह्याव्यतिरिक्तही त्यांनी इतर अनेक ग्रंथ लिहिले.

मयिलै चीनी वेंकटस्वामींनी तमिळ साहित्यात समीक्षात्मक ग्रंथांची भर टाकली. हे म्हणणे क्रमप्राप्त आहे की उपरोक्त सर्व लेखकानी तमिळ गद्यसाहित्याच्या निर्मितीत यथायोग्य सेवा केली.

आजकाल काही लेखक व्यवहारात बोलली जाते ती भाषाशैली सृजनात्मक साहित्यात वापरत आहेत. पुदुमैपित्तन, कु. प. रा. आदी कथाकार ह्या शैलीचे पुरस्कर्ते मानता येतील. सुन्दररामस्वामी जयकान्तन् यांनी तर ह्या शैलीत कल्पनातीत यश मिळविले आहे. त्यांच्या कथा आणि कादंबऱ्या खास उल्लेखनीय आहेत. ति. जानकी-रामन्, चिदंबर रघुनाथन्, का. दिरवियम्, सिलम्ब चिल्वर, मा. पो. सी., ने. तु. सुंदरवडिवेलु, ला. स. रामामृतम्, सिवपादसुंदरम् आदि लेखक आपापल्या साहित्य-कृतींनी तमिळ गद्य वाङ्मय समृद्ध करीत आहेत. वासवन् यांच्या शैलीत गांभीर्य आणि भावप्रवणता प्रकर्षाने दृग्गोचर होते.

स्वर्गीय अण्णादोराई यांच्या भाषणात आणि लेखनात अनुप्रासयुक्त आलंकारिक शैलीमुळे शब्दाचे नादमाधुर्य प्रत्ययाला येत असते. काही प्रतिभाशाली लेखक त्यांच्या शैलीचे अनुकरण करीत गद्यवाङ्मय वृद्धिंगत करीत आहेत.

'**सेंदमिळ**', '**तमिल पोळिल**', '**सेंदमिळ चेलवी**' अशासारख्या नियतकालिकांत क्लिष्ट शब्दांनी भरलेल्या ज्या एका कठीण शैलीचा वापर होत होता, तेच गद्य आज सरळ, स्पष्ट, सुगम आणि सुंदरशैलीच्या रूपात विकसित होताना दिसते. '**कलैमगळ**', '**कल्की**' सारखी नियतकालिके आणि '**तमिळनाडू**', '**दिनमणी**' यांच्यासारखी

दैनिके यांचा ह्या नवनिर्माणात मोठा वाटा आहे. '**तामरै**' बोनी भाषेत प्रांजल शैलीत चागल्या कथांचे प्रकाशन करीत आहेत. तर वानमामलै '**अरायच्ची**' ( संशोधन) नामक एका त्रैमासिकाचे प्रकाशन करीत आहेत.

व. वे. सु. अय्यरांचे '**बाल भारतम्**', माधवय्यांचे '**पंचामृतम्**' कवी भारतींचे '**इंडिया**' आदि नियतकालिकांनी तमिळ गद्यविकासात प्रशंसनीय कार्य केले आहे.

बालसाहित्याच्या क्षेत्रात किशोरांसाठी आवश्यक असलेल्या सरळ भाषाशैलीत अनेक लेखकांनी सृजन केले. त्यात ति. ज. रंगनाथन्, अ. ळ. वलियप्पा, पूवण्णन, आविपेनूरन् वगैरे उल्लेखनीय ठरतात.

आजकाल विज्ञानासंबंधी ग्रंथ व निबंधसाहित्यसुद्धा अगदी सरल व सुबोध तमिळमध्ये प्रकाशित होऊ लागले आहे. ह्या क्षेत्रात पे. न. अप्पुस्वामी अय्यर यांनी अनेक वर्षे अविश्रांत परिश्रम केले. वाचनीय, सरळ-सोपी परंतु समृद्ध शैलीत विज्ञानासंबंधी विषयावर ग्रंथ लिहिण्याचे प्रयत्न होत आहेत. ह्या दिशेने '**तमिल कलैकलंजियम्**' ( ज्ञानकोष), '**कुळंबैकळ् कलैकलंजियम्**' यांचे महत्त्वाचे कार्य आहे.

अशा प्रकारच्या छोटेखानी लेखात तमिळ गद्य साहित्याच्या विकासासंबंधी आणि विविध शाखोपशाखांवर विस्ताराने लिहिणे अशक्य आहे. मोजक्या शाखांचाच उल्लेख करता येईल. तरीही एक महत्त्वाची बाब उल्लेखणे आवश्यक वाटते. आजकाल अन्य भाषिक शब्दांचे मिश्रण न करता एक जिवंत, निरामय, शुद्ध आणि प्रवाही शैली विकसित करण्यासाठी सर्व उत्सुक आहेत. हीही बाब तितकीच महत्त्वपूर्ण वाटते की नियतकालिके पूर्ण सहकार्य देत आहेत.

राष्ट्रकवी भारती नेहमी ह्या गोष्टीवर जोर देत असत. आमच्या स्त्रियांनी सरळ दृष्टी ठेवून, सशक्तपणाने योग्य मार्ग आक्रमावा. भारतीचे काव्य आणि गद्यलेखन त्यांच्या ह्याच विचारांना प्रतिबिंबित करताना दिसते. त्यांच्या रचना सरळ, साध्या, सशक्त आणि मानवी हृदयाला जाऊन मिळण्याइतकी मर्मस्पर्शी आणि स्पष्ट विचारांनी परिपूर्ण आहेत. त्यांच्या काव्यावर समीक्षणात्मक जितके लिहिले जाते तितके त्यांच्या गद्यरचनांसंबंधी लिहिले जात नाही, हे मात्र मानावे लागेल. त्यांच्या शैलीत असणारे संस्कृत शब्दांचे बाहुल्य हे एक कारण असू शकेल. परंत ज्या काळात हे लेखन झाले तो काळ विचारात घेतला तर भारतींनी अशा प्रकारची भाषा का अवलंबिली ह्या प्रश्नाचे उत्तर मिळते. त्यांचे सारे लक्ष आपले विचार जनमानसात पुरते पोहोचविणे हे होते. सशक्त, गंभीर परंतु सरळ, सुबोध, मर्मभेदी भाषेत लिहिणे हेच त्यांचे एकमेव उद्दिष्ट होते. आपल्या ध्येयात ते पूर्णपणे यशस्वी झाले यात काहीच शंका नाही. त्यांच्या गद्य रचनांचे अध्ययन केले तर त्यांच्या साध्या, परंतु सशक्त शैलीचा, सरळ व स्पष्ट विचार, सजीव भाषेची स्पंदने आपल्याला कळून येतील.

प्रस्तुत संकलनातील त्यांचे निबंध आणि कथा वाचत असताना उमजेल की कुठलीही गोष्ट आडवळणाने सांगण्याऐवजी अगदी सरळ आणि आकर्षक पद्धतीने सांगण्यात त्यांचा हातखंडा होता. ह्या त्यांच्या प्रतिभाविलासाने आपले मन मुग्ध झाल्याशिवाय राहत नाही. त्यातच विनोद आणि स्पष्टोक्ती वगैरेंची अभिव्यक्ती आढळते. '**ज्ञानरथम्**' ही गद्यसाहित्यातील एक अनमोल कृती आहे.

तमिळ गद्यसाहित्याच्या विकासात ज्यांनी महत्त्वपूर्ण कामगिरी बजाविली आहे, अशा काही लेखकांची नावे वगळली गेली आहेत, याची मला पूर्ण जाणीव आहे. ज्यांचा उल्लेख झाला आहे, त्यांच्या कार्याबद्दलही मी फारशा विस्ताराने लिहू शकलो नाही.

ह्या संक्षिप्त लेखात लंकानिवासी तमिळभाषिकांनी आणि मलेशिया इत्यादी देशांत राहणाऱ्या तमिळभाषिकांनी तमिळ गद्यसाहित्याची जी सेवा केली आहे, त्यांच्यासंबंधी लिहिले पाहिजे होते परंतु विस्तारभयास्तव त्यांचा उल्लेख केला नाही. ह्या लोकांचाही तमिळ गद्यसाहित्याचा विकास होण्यास हातभार लागला आहे. ह्याबरोबरच आपला लेख मी समाप्त करीत आहे.

– पेरियस्वामी तूरन

## अनुक्रम

## तृतीय खंड : समाज



## चतुर्थ खंड : तत्त्वज्ञान

# सुब्रह्मण्य भारती (१८८२–१९२१)
## (संक्षिप्त चरित्र)

तमिळ साहित्याचे पुनरुज्जीवन आणि तमिळ भाषिकांमधील नवजागृती या दोन्हीचे श्रेय कवी भारती यांच्याकडे जाते. त्यांचे पिता चिन्नस्वामी अय्यर हे एट्टयापुरम् भागातील एक बडी आसामी म्हणून ओळखले जात. म्हणूनच एट्टयापुरम्च्या राज-दरबारात असलेल्या तमिळ पंडित आणि विद्वानांच्या सान्निध्यात भारतीचे बाल्य गेले आणि त्यांना नेहमी भेटण्याची संधीही मिळाली. म्हणूनच अगदी शैशवकालापासूनच काव्य करायला सुरुवात करून 'भारती' ही उपाधी प्राप्त करून घेतली होती.

भारतीचे शिक्षण तिरुनेलवेलीच्या हिंदू कॉलेजात झाले. चौदाव्या वर्षीच त्यांचा विवाह झाला परंतु त्याच सुमारास त्यांच्या वडिलांची आर्थिक स्थिती शोचनीय झाली होती. भारतीच्या विवाहानंतर एका वर्षाच्या आत त्यांच्या वडिलांचे निधन झाले. पुढे कुटुंबाची परिस्थिती फारच बिघडली, भारतीच्या जीवनाला नवी कलाटणी मिळाली. ते काशीला गेले आणि तेथे त्यांनी आपल्या आत्याच्या घरी राहून दोन वर्षे शिक्षण चालू ठेवले. येथेच इंग्रजीशिवाय हिंदी आणि संस्कृत भाषा शिकण्याची त्यांना संधी मिळाली. कलकत्ता विश्वविद्यालयाच्या प्रवेशपरीक्षेत ते प्रथमश्रेणीत उत्तीर्ण झाले. काशीला राहिल्यामुळे त्यांच्यात राष्ट्रकवी बनण्याची मुळे रुजली, असे म्हणता येईल. बंगालमध्ये स्वातंत्र्याची जी भावना फैलावत होती त्याने भारती इतके प्रभावित झाले की तो प्रभाव त्यांच्या हृदयावर शेवटपर्यंत टिकून होता.

१९०२ मध्ये भारती एट्टयापुरम्ला परत आले. आणि काही काळ त्यांनी जमीन-दाराकडे त्याच्या राजसभेत नोकरी केली. परंतु भारतीचे स्वच्छंदी मन नोकरीत रमेना. १९०४ साली ते मदुरेला गेले आणि तेथील शाळेत जवळजवळ तीन महिने तमिळ भाषेचे अध्यापन केले. परंतु अध्यापनातही त्यांचे मन लागेना म्हणून तेही सोडून दिले.

त्याच वर्षी ते मद्रासला आले आणि तमिळ दैनिक 'स्वदेशमित्रन्' मध्ये सहसंपादक म्हणून रुजू झाले. हे काम करीत असतानाच त्यांनी 'चक्रवर्तिनी' नामक मासिकही सुरू केले. त्याचबरोबर तिरुवल्लिकेणीत मंडयम तिरुमलाचारींनी 'इंडिया' नावाचे जे साप्ताहिक सुरू केले होते त्याच्या संपादनाची जबाबदारीही त्यांनी अंगावर घेतली. स्वत:च्या हृदयात धगधगणारी देशभक्तिपर भावना आवेशपूर्ण विचारांच्या योगे सर्व तमिळनाडूमध्ये फैलावण्याच्या दृष्टीने 'इंडिया' साप्ताहिक फार चांगले साधन ठरले.

डिसेंबर १९०७ मध्ये सुरतेला भरलेल्या कॉंग्रेस अधिवेशनात भारतींनी जहाल गटाचे समर्थन केले होते. लोकमान्य टिळकांच्या विचारांनी भारतींना इतके प्रभावित केले की टिळकांच्यावर त्यांची भक्तीच जडली. लोकमान्यांच्या स्तुतीपर आणि मवाळ गटाची टवाळी करणाऱ्या काही कविता त्यांनी लिहिल्या.

सुरतेहून परतताच सरकारी नियमांची पर्वा न करता भारती आपल्या लेखणीच्या साह्याने क्रांतीची आग भडकावू लागले. इंग्रज सरकारने प्रकाशकांवर कायदेभंगासाठी कारवाई केली तेव्हा मित्रांच्या आग्रहावरून भारती गुप्तरूपात पॉंडिचेरीला पळून गेले. भारती पॉंडिचेरीला पोहोचल्यानंतर सुमारे महिनाभरातच 'इंडिया' साप्ताहिक पॉंडिचेरीहून प्रकाशित होऊ लागले. परंतु इंग्रजसरकारने त्यांच्या आधिपत्याखाली असलेल्या भारतीय प्रांतात 'इंडिया' वर बंदी घातल्याने नाइलाजाने साप्ताहिक बंद करावे लागले.

१९०८ ते १९१८ पर्यंत भारती पॉंडिचेरीतच राहिले. तेथे आर्थिक ओढाताणीमुळे त्यांना असंख्य कष्ट सोसावे लागले. घर चालविणेही कठीण होऊन बसले, परंतु आर्थिक विवंचनेच्या ह्याच कालखंडात त्यांनी उत्तम साहित्यनिर्मिती केली. '**पांचाली शपथम्**', '**कण्णन् पाट्टु**' '**कुयिल पाट्टु**', इत्यादी त्यांनी येथे लिहिलेले अजरामर साहित्य होय. असे म्हणता येईल की पॉंडिचेरीमध्येच भारतीची कवित्वशक्ती आणि गद्यशैली तावूनसुलाखून पूर्णपणे विकसित झाली.

भारतींचा जीवनप्रवास सर्व दृष्टीने दु:खपूर्ण झाला असे समजणेही योग्य होणार नाही. ह्याच कालखंडात त्यांना दोन महान व्यक्तींचा सहवास आणि स्नेह लाभला. १९१० साली श्री. अरविंद घोष पॉंडिचेरीला आले. त्यांच्या आधीच व. वे. सु. अय्यर तेथे येऊन पोहोचले होते. लंडन शहरातील इंडिया हाऊसमध्ये राहणाऱ्या एका युवकाने १ जुलै १९०९ ला कर्झन वायली नावाच्या इंग्रजावर गोळी झाडून त्याला ठार मारले आणि नंतर स्वत:वरही त्याने गोळी चालवून आत्मार्पण केले. तात्डतोब इंग्रज सरकारने इंडिया हाऊसमधून सावरकर आणि व. वे. सु. अय्यर आदींना पकडण्याचे कसोशीने प्रयत्न केले. परंतु अय्यर वेष पालटून त्यांच्या डोळ्यांत धूळ फेकून निघाले ते थेट पॉंडिचेरीला येऊन पोहोचले.

अशा रीतीने श्री. अरविंद आणि श्री. अय्यर यांची संगत भारतींना लाभली. लहान-पणापासून भारती पराशक्ती देवीचे उपासक होते. येथे त्यांनी पराशक्तिदेवीवर अनेक सुंदर गीते लिहिली. कण्णन आणि मुरुगन ( कार्तिकेय) त्यांची परमआराध्य दैवते होती. त्यांच्या '**कण्णन् पाट्टु**' ला तमिळ साहित्यात अग्रस्थान मिळाले आहे. मुरुहनवर लिहिलेली गीतेही तितकीच चांगली आहेत. "**चुट्टी निल्लादे-पो-पगये तुल्ली वरुगुदुवेल**" (हे शत्रुता ! माझ्याभोवती फिरू नकोस, शूलायुध वार करण्यासाठी येत आहे ) ह्या पंक्तीवर व. वे. सु. अय्यर बेहद्द खूश होते. त्यांच्याच शब्दात सांगायचे तर ह्या पंक्ती-तील प्रत्येक अक्षर लाखमोलाचे आहे.

नोव्हेंबर १९१८ मध्ये पहिले महायुद्ध संपले. भारती पाँडिचेरी सोडून ब्रिटिशांनी व्यापलेल्या भारतखंडात परत आले. परंतु त्वरित सरकारने त्यांना कैद करून तुरुंगात डांबले. परंतु अनेक मित्रांच्या साह्यामुळे त्यांना सोडण्यात आले. त्यानंतर भारती कडैयम ह्या आपल्या गावात आले आणि काही काळ तेथेच राहिले. नंतर तेथून परत मद्रासला आले आणि पूर्ववत 'स्वदेशमित्रन्' दैनिकात काम करू लागले. भारतींची प्रकृती आता खूप खालावली होती. ते अशक्त झाले होते आणि वेगळेच दिसू लागले होते.

१५ नोव्हेंबर १९२० पासून 'स्वदेशमित्रन्'मध्ये जवळ जवळ दररोज 'रसतिरट्टू', 'विनोदतिरट्टू', 'टिप्पण्या' आदि स्तंभांमधून भारती लेख लिहू लागले. ह्यातील बहुतांश लेख उच्च विचारसरणी दाखविणारे होते अथवा स्वातंत्र्यासंबंधी वाचकांच्या मनात चेतना व जागृती निर्माण करणारे होते.

त्या वेळी भारती तिरुवल्लिखेणीत राहत असत. ते नेहमी पार्थसारथीच्या मंदिरात जात असत आणि मंदिरातील हत्तीला मोठ्या प्रेमपूर्वक फळे आणि नारळ खायला देत असत. एके दिवशी उन्मत्त दशेतील त्या हत्तीने भारतींना वर उचलून जोरात जमिनी-वर आपटले. भारतींच्या माथ्यावर आणि शरीरावर बऱ्याच गंभीर जखमा झाल्या होत्या. काही दिवसांनी जखमा भरून आल्या परंतु ह्या घटनेनंतर ते फार दिवस जगले नाहीत. त्यांची प्रकृती बिघडतच चालली आणि ११ सप्टेंबर १९२१ ह्या दिवशी त्यांचा देहांत झाला. ज्यांनी आपल्या प्रतिभाशाली लेखणीद्वारा आणि असामान्य कवित्वशक्ती-द्वारा तमिळ भाषेत नवी जागृती निर्माण केली अशा ह्या युगद्रष्टया कवी भारतींना अवघे अडतीस वर्षांचे आयुर्मान लाभले. हृदयात उचंबळून येणाऱ्या उदात्त भावनांच्या ज्वालांना आणि भावनाविवशतेला काबूत ठेवायला त्यांचे कृश शरीर असमर्थ ठरले.

भारतींच्या निधनानंतरच त्यांच्या कवितांना महत्त्व प्राप्त होऊन त्या प्रकाशात आल्या. त्या काळी स्वातंत्र्यासाठी लढणाऱ्यांच्या प्रत्येक सभेत भारतींची राष्ट्रीय गीते निनादत राहिली. त्यांच्या देशभक्तिपर गीतांनी जनताजनार्दन अस्वस्थ होऊन उठला. त्यांच्या गद्यशैलीत एक प्रकारचे नावीन्य होते, जणू संभाषण, बातचीतच होत आहे.

त्यांच्या उदात्त विचारांत स्पष्टता होती. भारतींनी गद्याच्या प्रांतात नव्या भावनांना जन्म दिला.

स्त्री-स्वातंत्र्य, समाजसुधारणा व राजनीती ह्यासंबंधीचे भारतींचे विचार त्यांच्या प्रगतिशीलतेचे द्योतक होते. भारती क्रांतिकारी होते. त्यांचे काव्य, कथा, लेख आदि लेखनातून त्यांची राष्ट्रीय भावना आणि क्रांतीकडे झुकणारे विचार स्पष्ट दिसून येतात. जसे स्वत: भारतींनीच म्हटले आहे,—' हृदयात जर प्रकाश असेल तर वाणीत अवश्य प्रकाश असणार '— त्याप्रमाणे त्यांच्या हृदयातील उज्ज्वल, आलोकमय प्रकाशामुळे त्यांच्या सर्व लेखनामधून प्रकाश पडताना पाहणारे आपण त्या ' महाकवीला ' आपली श्रद्धांजली अर्पित करू या.

**प्रथम खंड—कथा**

## एक षष्ठांश

मीना वीणावादनात सरस्वतीदेवीशीच जणू स्पर्धा करीत असे. जेव्हा केव्हा ती पुरसैवाक्कममध्ये आमच्या घरी यायची, तेव्हा तिच्यासाठी वरच्या मजल्यावरची खोली खाली करून दिली जाई. चांदण्यारात्री आठच्या सुमारासच जेवणं आटोपली जात. नऊ वाजल्यापासून ते मध्यरात्रीपर्यंत ती आपल्या खोलीत वीणा वाजवीत बसे. खोलीला लागूनच असलेल्या मांडवात तिचे पिताजी रावबहादुर सुंदरराजुलू खाटेवर पडल्या-पडल्या तिचं वीणावादन ऐकत असत आणि थोड्याच अवधीत घोरू लागत. परंतु महाशयांचं घोरणं इतकं खालच्या आवाजात असे की त्यामुळे वीणेचा मधुर ध्वनी दबला जात नसे. बाहेरच्या अंगणात एका बाजूला मी एकटा आपला ब्रह्मचारी बिछाना पसरून त्यावर लोळण घेत असे. वीणावादन बंद होईपर्यंत माझ्या डोळ्यांवर झोप यायचीच नाही. अगदी चिंचेचा गोंद लावूनसुद्धा पापण्या मिटत नसत. मीनाच्या खोलीतच तिची सोबत करणारी माझी बहीण रत्नम् निजत असे. तीसुद्धा लवकरच झोपी जाई. खाली आई, वडील बन्धू, वहिनी सर्वच्यासर्व निद्रामग्न होत. माझी वहिनी तर पोटात अन्न गेल्यावर हात धुताधुताच जांभयी देऊ लागे. अधूनमधून मुलांच्या रडण्याचा आवाज ऐकू येई. वडील बन्धू रेव्हेन्यू बोर्डाच्या ऑफीसमध्ये नोकरी करीत. चार वर्षांतून एकदा त्यांना ऑफीसमध्ये दहा रुपयाचं आणि घरी दोन मुलांचं प्रमोशन मिळत असे.

वसंत ऋतू. चांदणीरात्र. मध्यरात्रीचा समय. सारं पुरसैवाक्कम गाढ निद्रेत. केवळ दोन व्यक्तींच्या डोळ्यांत झोप नाही. एक मी, आणि दुसरी ती.

मीना खरोखरच गंधर्वकन्येसारखं वीणावादन करीत असे. दिसण्यातही ती अप्सरे-समान होती. सोळा वर्षांची. अनावश्यक तपशील कशाला देत बसू ? कामदेवानं आपल्या तीक्ष्ण बाणांनी माझे प्राण विद्ध करून तिच्या हातात सोपविले होते. काय

सांगू ? तिचं अलौकिक संगीत मन मानेल तितकं ऐकावं, समाधान मिळत नसे. तिचा मुखारविंद नित्यनवा वाटत असे, नवविकसित वाटत असे. तिचे पिताजी रावबहादुर सुंदरराजुलू नायडू माझ्या आईचे लाबचे भाऊ लागत. तंजोर आणि अन्य काही जिल्ह्यांत अनेक वर्षे पोलीस इन्स्पेक्टरच्या जागेवर राहून सरकारची चांगली सेवा केल्याचे फळ म्हणून त्यांना ' रावबहादुर 'ही उपाधी मिळाली होती. स्वदेशी आंदोलन सुरू व्हायच्या अगोदरच ते सेवानिवृत्त झाले होते. माझ्या म्हणण्याचा अर्थ इतकाच की त्यांना मिळालेली उपाधी स्वदेशी आंदोलनात भाग घेणाऱ्या काही नेत्यांवर खोटेनाटे आरोप ठेवून मिळालेली नव्हती, ते खरोखरच्या कष्टाचं फळ होतं. आमच्या लहानपणापासूनच त्यांची अशी इच्छा होती की मीनाबालेचा विवाह माझ्याशीच करावा. परंतु हे घडण्यात अनेकविध विघ्ने आली. अधिकांश विघ्नांचं कारण खरं तरं मीच होतो.

वयाच्या सोळाव्या वर्षापर्यंत मी मद्रासच्या ख्रिश्चन कॉलेजमध्ये शिक्षण घेतले. "वैदिक काळापासून आजपर्यंतचे भारतवर्षाचे ऋषिमुनी मूर्ख होते. अर्जुन, कालिदास, शंकराचार्य, शिवाजी, रामदास, कबीरदास हे सर्व आणि तसेच त्यांच्या आधी व नंतर होऊन गेलेल्या महान व्यक्ती मूर्ख होत्या. भारतीय आपल्या हृदयात जो भक्तिभाव पोसत आले आहेत, तो अन्धश्रद्धेनं भरलेला मूर्ख भक्तिभाव आहे. हीन आणि तुच्छ आहे..." अशा प्रकारच्या इंग्रजांच्या महान वक्तव्यांनी माझ्या हृदयात प्रवेश केला होता. पण हे ख्रिस्ती पाद्रीसुद्धा विचित्रच. एकीकडे हिंदू धर्म आणि हिंदू संस्कृती-संबंधी श्रद्धाळू असणं मूर्खपणा आहे असं सांगतात तर दुसरीकडे युवकांमध्ये असाही प्रभाव पाडतात की ज्या ख्रिस्ती धर्माचं गुणगान ते करीत आहेत तीही अखेर मूढभक्तीच आहे. धर्मविषयक बाबी विस्ताराने लिहून वाचकांसाठी डोकेदुखी निर्माण करण्याची इच्छा नाही. थोडक्यात एवढंच सांगेन की मी आपल्या धर्माच्या विचारांनी विरक्त होऊन 'ज्ञानस्नान ' मुळीच केलं नाही पण ब्राह्मोसमाजी बनलो.

काही दिवसांनंतर शिक्षणाला रामराम केला. घरी कुणालाही न सांगता कलकत्त्याला गेलो. तिथं ब्राह्मोसमाजाची दीक्षा घेतली. काही महिने तेथल्या पाठशाळेत शिकलो. खरं तर माझं ध्येय ब्राह्मोसमाजाचा उपदेशक होणं हे होतं. कलकत्त्याहून पंजाब व हिंदुस्थानच्या अन्य प्रांतांतून फिरत फिरत शेवटी मद्रासला पोहोचलो. हिंदू धर्माचा त्याग केल्याबद्दल मला माझ्या जातिबांधवांनी खूप छळलं, पण मी मात्र निराश झालो नाही. उलट पहिल्यापेक्षा अधिक मानसिक दृढता माझ्यात निर्माण झाली. माझे पिताजी——त्यांचं नाव दुभाषी रामचंद्र नायडू होतं——बाहेरून जरी सर्वसाधारण लोकांच्या आचारविचाराचे दिसले तरी त्यांना मनातून ब्राह्मोसमाजाविषयी आस्था होती. म्हणून मला परमात्म्याच्या भक्तीत लागलेला पाहून व आत्मविश्वासाने व श्रद्धेने उपनिषदांचं

अध्ययन करताना पाहून मनोमन आनंदित झाले. परंतु दर्शनी मात्र नाराज झाल्यासारखं त्यानी दाखविलं. माझ्या आप्तेष्टांचं ऐकून त्यांनी मला कधीही त्रास दिला नाही. घरी तर अशी व्यवस्था केली गेली की पहिल्यापेक्षा अधिक सोई मला उपलब्ध होतील. परंतु का कोणास ठाऊक, वडील बन्धूनी माझा तिरस्कार सुरू केला. मी पंजाबी लोकांप्रमाणे केस डोक्यावर बांधीत असे. पंधरा रुपये वेतन मिळविणाऱ्या गुमास्त्यांप्रमाणे कुंभकोणम् पद्धतीची पगडी–जिच्यात ना धड सौंदर्य असतं, ना गांभीर्य–मी वापरत नसे. म्हणून माझे बन्धू माझ्यावर नाराज होते. "**राजपुत्रुडू, वीडु दोंग विधवा ! नललो महा आडंबरमुख पगडी वीडिकी.**" (आला मोठा राजपुत्र ! बेटयाची थाटामाटाची पगडी पाहा डोक्यावरची ! ) अशी शेलकी पैजारं ते मारीत असत. ह्याच दरम्यान एके दिवशी अर्धांगवातानं पिताजींचं अचानक निधन झालं. त्यांचा अंत्यसंस्कार ब्राह्मोसमाजाप्रमाणे करायचा माझा विचार होता. माझा भाऊ तर पक्का हिंदुत्वनिष्ठ ! हिंदुप्रमाणेच हा संस्कार झाला पाहिजे अशा मताचा. ह्यावर खूप गरमागरमी आणि वादविवाद झाले. अनेकांच्या मध्यस्थीनंतर स्मशानात प्रथम त्याने आपल्या इच्छेनुसार अंत्यसंस्कार केले आणि नंतर मी आपल्या सिद्धांतांप्रमाणे एका ब्राह्मोसमाजाच्या गुरूची मदत घेऊन सर्व क्रियाकर्म पार पाडले. ह्या सर्व प्रकारामुळे मी आपले मामा रावबहादुर सुंदरराजुलू नायडू यांच्या मनातून पार उतरलो. परिणामी विवाह होण्यास विलंब होत चालला. परंतु मनोमनी त्यांची हीच इच्छा होती की कोणत्याही प्रकारे का होईना मला सुधारून आपल्या मुलीशी माझा विवाह लावायचा.

वसंत ऋतू. पौर्णिमेचा चंद्र. मध्यरात्रीची वेळ. सारं पुरसैवाक्कम निद्रिस्त होतं. केवळ दोन जीव जागृत होते. एक मी, दुसरी मीना. शीतल मंद हवा. छतावरून मीनाच्या खोलीमधून येणारा वीणेचा मधुर ध्वनी. परंतु नेहमीप्रमाणे घोरण्याचा आवाज ऐकू येत नव्हता. मामासाहेब शहरात नव्हते, परगावी गेले होते. मी आपला अंगणात खाटेवर बसून होतो. माझ्या हृदयात दोन ज्वालामुखींचं परस्परांशी व्द्वंद्वयुद्ध चाललं होतं–त्यातला एक होता–प्रेम ! आणि उरलेला ? त्याच्याशी लवकरच ओळख होईल. वीणावादन एकाएकी थांबलं. थोड्याच वेळात मला समजून चुकलं की माझ्या पाठीमागं कुणीतरी उभं आहे. वळून पाहिलं तर मीना उभी होती.

प्रथमच एकांतात भेटत असेल असं समजून प्रेमालापाचं लांबलचक वर्णन येथे येईल अशी आशा वाचकांनी करू नये. अनेक वेळा आम्ही एकांतात भेटलो होतो. मीना खाटेवर येऊन बसली. "मीना ! आज मी तुझ्याशी काही बोलू इच्छितो," मी हळूच म्हटलं.

ती म्हणाली, "मला माहीत आहे."

"काय असावं ? सांग तर खरं."

" तुम्ही ब्रह्मचर्यव्रत धारण करणार आहात ? "

" का ? कशासाठी ? तुला कुणी सांगितलं ? "

ती म्हणाली, " वंदेमातरम्."

मीनाच्या तल्लख बुद्धीचा परिचय मला होता. म्हणून तिच्या मुखातून हे ऐकून मला आश्चर्य वाटलं नाही. मी सांगितलं, " होय ! मीना ! आता ब्रह्मचारी मंडळींनीच ह्या देशाच्या रक्षणाची जबाबदारी उचलली पाहिजे. हा महान देश आता पतित झाला आहे. सर्वोच्च हिमालय पर्वतमालेच्या जागी काटयाकुटयांच्या झुडुपानी आणि विषारी प्राण्यांनी भरलेलं जंगल सगळीकडे पसरलं आहे; असं वाटतं. जणू अर्जुनाच्या भव्य राजमहालात दिवाभीतांचं राज्य चाललं आहे. ब्रह्मचारीच ह्या देशाचा आता उद्धार करू शकतील. बोबली राजाचा पुत्र किंवा राजा सर रामस्वामी मुदलियार यांचे पुत्र नसल्यामुळे आमच्यासारखे साधारण कुटुंबातील लोक विवाह करतील तर ह्या दुष्काळग्रस्त देशाची परिस्थिती बिकटच होईल. चिमणीच्या डोक्यावर ताडाचं फळ ठेवण्याप्रमाणे, ह्या गिधाडांच्या झुंडीतील एका युवकाच्या शिरावर परिवाराची जबाबदारी टाकली तर त्याचे प्राण मुखात येऊन बसतील. त्याच्या छोटयामोठया इच्छाआकांक्षा पुऱ्या करण्यासाठी त्याला भगीरथासारखे प्रयत्न करावे लागतील. अशा अवस्थेत देशसेवेचं कार्य आणि कर्तव्य तो कसं पार पाडणार ? देशाची चिंता तो कसा करणार ? म्हणून आम्हाला ब्रह्मचाऱ्यांची आवश्यकता आहे. आत्मज्ञानी लोकांची आवश्यकता आहे. भौतिक सुखांची पर्वा न करणारे निःस्वार्थी सेवक पाहिजे आहेत. हे स्वदेशी आंदोलन काही लौकिक कार्य नव्हे. एक पुनीत कर्तव्य आहे. जो ही दीक्षा घेईल त्याच्यात कर्मयोग्याची निःस्पृहता, तेज, वीर्य आणि पौरुष आदि गुणांची आवश्यकता आहे. माझी इच्छा अशी आहे की मीसुद्धा हे व्रत धारण करावं...परंतु......"

" परंतु– मी मध्ये शनीसारखी येऊन टपकले...होय ना ? "

" पाहिलंस ? कसं बोलतेस तू ? माझं पूर्णपणे ऐकून तर घे ना ! ह्या माझ्या नव्या संकल्पापूर्वीच मी आपले प्राण तुझ्यावरून ओवाळून टाकले आहेत. माझं अजून एक कर्तव्य बाकी आहे. तुझ्या आज्ञेचीच फक्त प्रतीक्षा आहे आता मला."

तिला काही सांगावयाचं होतं. इतक्यात खाली दारापाशी गाडी येऊन थाबल्याचा आवाज झाला.

" पिताजी आले ! बरं, मी चलते आता." एक मिठी आणि चुंबन देऊन ती निघून गेली.

घोरणाऱ्या नायडूंनी दरवाजा खटकटवला आणि ते खालच्या मजल्यावर झोपलेल्या अन्य घोरणाऱ्यांना जागं करून आत येऊन यथास्थान आडले झाले आणि अर्ध्या अधिक तासाभरात स्वतःच घोरू लागले.

दोन व्यक्ती मात्र रात्रभर जाग्याच राहिल्या. एक मी, दुसरी ती.

## 2

मागील प्रकरणाच्या शेवटी घडलेल्या घटनेनंतर काही महिने उलटले असतील. ह्या कालावधीत आमच्या जीवनातही काही परिवर्तने घडून आली. ' वंदेमातरम् 'चा मी अनुयायी आहे हे समजल्यानंतर रावबहादुरांनी आपल्या कन्येचा विवाह माझ्याशी करावयाचा विचार सोडून दिला आणि गेल्या काही महिन्यापासून आपलं नेहमीचं निवासस्थान तंजावर सोडून पुरसैवाक्कमला येणं बंद करून टाकलं. आपल्या मीनासाठी ते दुसरा वर शोधत आहेत, अशीही बातमी कानावर आली. मीनाचं काहीच पत्र आलं नाही. वाटलं...आता तिला माझी आठवण मुळीच येत नसेल. म्हणतात की नारी म्हणजे वंचनेचं मूर्तिमंत रूपच ! हे खरं असावं का ? **" पेण्णएनप्पडुव केण्मो ! उल्निरंवुडंय वल्ल ओरायिर मनत्तवाकुय '** (नारी काय आहे जे जाणता आपण ?... पूर्ण समर्पित मनाचीच नाही, तर तिला हजारो मनं आहेत.) **' जीवकचिंतामणि '** हे तमिळ काव्य वाचताना वाटलं, लेखक मीनासारख्या स्त्रीशी परिचित नसावा. तिच्यासारख्या स्त्रीचं प्रेम मिळण्याचं भाग्य त्याला मिळालेलं नसावं. परंतु आता वाटलं— त्या लेखकाचं वचन सत्य ठरलं तर ! यौवनातील अज्ञानामुळे मी त्या विख्यात लेखकाच्या विचारांना चुकीचं मानलं होतं.

अरे मूर्खा ! ह्या एवढ्याशा एका गोष्टीमुळे तू इतका निराश होतो आहेस ? तू तर आजन्म ब्रह्मचर्यव्रत पाळण्याचा विचार मनाशी घोळत होतास. मीना जर दुसऱ्या कोणाशी विवाहबद्ध झाली तर तुझा मार्ग सुकर होईल. ह्या जीवनात तरी दुसऱ्या स्त्रीच्या प्रेमात तू पडणार नाहीस. केवळ तीच एकमेव तुझ्या मार्गातील धोंड होती. ती जर दुसऱ्या कोणाची पत्नी झाली तर तुझी काय हरकत आहे ? तुझं व्रत निर्विघ्नपणे पार पडेल. परमेश्वराची तुझ्यावर अशी कृपा होत असताना तू दु:खी का ? अशा प्रकारे माझं मन कधी कधी मला समजावीत असे.

पण त्याबरोबर लगेच मनात विचार येई— नाही. ती मला विसरू शकत नाही. ती तर माझ्या प्राणांत सामावून गेली आहे. माझ्या हृदयात प्रज्वलित धर्माने ती एकरूप झाली आहे. माझ्या व्रत पालनात विघ्न येऊ नये म्हणून ती मला पत्र लिहीत नसावी. अग मीने ! मी काय तुला ओळखत नाही ? काहीही झालं तरी तू मला विसरू शकशील ? तुझ्या डोळ्यांनी मला कितीतरी वेळा सांगितलं आहे, मी तुम्हाला कधीही विसरू शकणार नाही. तुझे ते डोळे ! ते डोळे माझ्यासमोर अजून दिसताहेत. ते

डोळे बोलतील खोटं ?

लगेच मन सांगतं—हाय हाय ! कसलं रे वैराग्य तुझं, कशाप्रकारची भक्ती तुझी ? कशाप्रकारचा धर्म, कसली रे श्रद्धा ! वा वा ! आज देशोद्धार करण्यासाठी तुझ्यासारखा पुत्र पाहिजे नाही का ? हा भीष्माचा देश आहे नाही का ? तुझ्यासारखे लोक ह्या मातीला उज्ज्वल बनवत आहेत नाही का ? छे छे छे. किती कोतं हे मन ! अमृताला सोडून हाडांच्या मागे लागलं ! लोकोद्धार ही मोठी चीज आहे की यौवनसुख ? धर्माची सेवा मोठी की नारीची सेवा ? बोल. सांग आता. तुला ह्या दोहोतील काय पाहिजे ?

अजून एक विचार आला—काहीही असो, तिला माझा निश्चय कळला आहे. तीच मला आता शक्ती देईल. " तुम्ही धर्माचं पालन करा. माझ्यासाठी धर्मत्याग करू नका. आजन्म तुम्हालाच माझं आराध्यदैवत मानून व्रतपालन करीत राहीन मी. स्वर्गात तुमची सोबत जरूर मिळेल " असं वचन ती देईल तर हे जीवन दुःसह होणार नाही.

तिचा विवाह दुसऱ्या कोणाशी झाला असं वृत्त समजलं असतं तर निश्चित झालो असतो. मग दुसरी कोणतीच ऐहिक चिंता उरली नसती. पूर्ण मनोभावाने धर्मसेवा करू शकलो असतो.

तिचं प्रेम ? नारीसाठी प्रेम असं असतं का ? प्रवंचना आणि लोभ ह्या दोन गोष्टी एकत्र करून ब्रह्मदेवानं नारीसृष्टी निर्माण केली.

अशा प्रकारे हजारो प्रकारचे तरंग मनात उठून मला व्याकूळ करू लागले. ज्याच्यात मानसिक दृढता नाही त्याचं चित्त खवळलेल्या सागरासारखं असतं असं म्हणतात. वाचकसुद्धा तटस्थ राहून आपल्या हृदयातील मानसिक संघर्षामुळे होणाऱ्या उलथापालथीचा विचार करतील तर तेही विस्मयचकित होतील. मानवी जीवनात इतक्या उलथापालथी आणि आश्चर्यजनक घटना कशासाठी घडतात ? " **मरप्पुम निनैप्पुमाय मिद्र वंच माया मनत्ताल वळरंतवु तोळि** " (अग सखये ! स्मृतिविस्मृतीच्या फेऱ्यात सापडून फसव्या मायावी मनामुळे अंकुरित झालीस ! )

अचानक एके दिवशी मीनाचं पत्र मिळालं. ते येथे देत आहे. आपणच कल्पना करावी की हे वाचताना माझ्या मनाला किती वेदना झाल्या असतील—

ॐ

तंजावर

माझ्या सर्वस्वा,

हे पत्र लिहीत असताना माझं मन कचरतंय्. काय लिहू ते समजत नाही. हे माझं अखेरचं पत्र असेल. ह्यापुढे मी आपलं दर्शन कधीच घेऊ शकणार नाही.

पिताजींनी ह्या शहरात आलेल्या एका नव्या पोलीस इन्स्पेक्टरशी माझा विवाह

लावण्याचा—म्हणजेच माझा बळी देण्याचा—निश्चय केला आहे. त्याचं नाव मन्नार आहे. लग्नाची तयारी होऊ लागली आहे. तुमचं नाव ऐकताच शिकारी कुत्र्याप्रमाणे ते तुटून पडतात आणि अशी शिवीगाळ करतात की ऐकवत नाही. मी पळून जाईन ह्या भीतीने माझ्यावर सक्त पहारा ठेवला आहे. कदाचित ह्या लग्नाची बातमी ऐकताच तुम्ही येथे याल म्हणून तुम्हाला घरात येऊ न देण्याचा बंदोबस्त पिताजींनी आणि मन्नारने केला आहे. त्याची नजर तर पिताजीच्या संपत्तीवर खिळलेली आहे. म्हणूनच माझ्याशी विवाह करण्याची इच्छा आहे त्याची. मी तर त्याला सरळच सांगून टाकलं आहे की मला त्याच्याविषयी तिरस्कार वाटतो. अशा अवस्थेत माझ्याशी जबरदस्तीने विवाह करून तो आयुष्यभर दुःखच पदरात घेईल, सुखी होणार नाही. यावर त्या नराधमानं उत्तर पाठविलं की मला तुझ्या मनाशी सध्या काहीच कर्तव्य नाही. नंतर यथायोग्य ते करीन. एकदा का संपत्ती माझ्या हातात पडली की नंतर तू खड्डयात का जाईनास. नंतर पाहिजे तर त्या 'तुरुंगाच्या पाहुण्या 'बरोबर समुद्रात का उडी घेईनास.

गेल्या काही दिवसापासून मी निद्रासुखाला पारखी झाली आहे. एकदा तर रात्रभर डोळयाला डोळा लागला नाही. या कुशीवरून त्या कुशीवर तळमळत होते. तेव्हा वाटलं की स्वप्नं पडलंय्. परंतु जागृत अवस्थेत स्वप्न कसं पडेल ? ते ना धड स्वप्न होतं, ना सत्य. परंतु डोळयासमोर अवश्य काही तरी दिसत होतं. अति भयंकर रौद्र-रूपात, रक्तासारखे लालभडक नेत्र, काळया ढगांसारखं शरीर, गळयात नरमुंडमाला, आणि हातात त्रिशूल घेऊन कालिकादेवी समोर प्रकट झाली. मी भयांकित होऊन उठले आणि 'माते ! माझं रक्षण कर !', असं म्हणत तिला प्रणाम केला. त्वरितच त्या भयंकर देवीचं रूपांतर एका सुंदर देवीत झालं. त्या अलौकिक सौंदर्याचं वर्णन मी काय करणार ? देवीच्या डोक्याभोवती चारी बाजूंना कोटिकोटि सूर्यप्रकाशासारखं तेजोमंडल होतं. सुविशाल नेत्रांतून करुणा ओथंबत होती. देवीनं मला अभय प्रदान करीत म्हटलं, "मुली ! तुझ्या आत्याच्या मुलाला मी माझ्या सेवेसाठी नेत आहे. ह्या जन्मात त्याची प्राप्ती तुला होणार नाही हे खरं, परंतु तू दुसऱ्या कोणाची ही पत्नी होणार नाहीस. ह्या जगात तुला आता कोणतेच सुख मिळणार नाही. तुमच्या घराच्या पिछाडीला वायव्य दिशेला असलेल्या एका कोपऱ्यात एक जडीबूटी तुला आढळेल. उद्या सकाळी स्नान करून, पूजाअर्चा संपताच त्या बूटीची दोन पानं तोडून घे आणि खाऊन टाक. विसरू नकोस हो." इतकं बोलून ती देवी पराशक्ती अंतर्धान पावली.

सकाळी उठताच मी ती बूटी पाहण्यासाठी गेले. आकाशातून एक कावळा खाली उतरत आला, त्या बूटीच्या पानावर त्याने आपली चोच मारली मात्र, तडफडून मरण

पावला. हे पाहताच मला त्या देवीच्या आज्ञेची उमज पडली.आज सकाळी दहा वाजता त्या जडीबूटीची दोन पानं खाऊन मी स्वर्गात जाईन. तेथेसुद्धा तुमची प्रतीक्षा करीत चिरकन्या बनून राहीन. तुम्ही आपला धर्म आणि कर्तव्य यांचं पूर्ण पालन करा. देवीमातेला समाधान पावताच ती तुम्हाला माझ्याजवळ आणून पोहोचवील. अच्छा तर मग ! आता मी आपला निरोप घेत आहे. राजा ! राजा ! मला विसरू नकोस हं ! वंदेमातरम्."

- हे पत्र वाचताक्षणीच मी मूर्च्छित होऊन पडलो.

3

मीनाचं शेवटचं पत्र मिळून आता दोन वर्षं झाली. ह्या कालावधीत मी जे काही सहन केलं ते विस्तारानं सांगायला लागलो तर पुराणाच्या पोथीएवढं होईल. म्हणून संक्षिप्त स्वरूपात सांगत आहे. ते पत्र मिळताच मी मोठ्या दुःखात बुडून गेलो. घर सोडून दिलं आणि भगवी वस्त्रे धारण करून साधू बनून उत्तर भारतात फिरत राहिलो. मात्र 'वंदेमातरम्' धर्माचा विसर पडू दिला नाही. परंतु हेही खरं की मी अशा कार्यातही सहभागी झालो नाही की सरकार मला कैद करून तुरुंगात डांबून ठेवील. जनतेत ऐक्य आणि संघटन असेल तर आपोआपच स्वातंत्र्य प्राप्ती होईल असं मला वाटत होतं. कुठंकुठं भाषणं ठोकत होतो. त्यामुळे पोलीस माझ्या मागावर असत. जनतेशी मिळून मिसळून तिच्या भल्यासाठी प्रयत्न करण्यात अडचणी येत राहिल्या. माझी भाषणे माझ्या आदर्शपूर्तीसाठी अनुकूल न ठरता प्रतिकूलच ठरली. मात्र माझ्या भाषणांनी मुग्ध झालेली जनता इतरांपेक्षा माझ्याकडे जास्त आदराची भावना ठेवू लागली हे पाहून मला अभिमान वाटू लागला.

"निसर्गदत्त गुणांमुळे कर्म होतं." "'मी करतो' असं मूर्ख समजतात." भगवद्गीतेच्या ह्या वचनाचं मी नेहमी मनन करीत असे. मला कधीकधी असं भयही वाटे की हा माझा अभिमान वाढता वाढता तो माझ्यावर इतका प्रभाव टाकील की मी निकामी होऊन बसेन. कोणत्याही आदरसत्काराची वा भेट-पुरस्काराची अपेक्षा न धरता मौनसेवा करण्यासाठीच देवीने मला जिवंत ठेवलं आहे, याचा बोध मला जेव्हा झाला तेव्हापासून मी भाषणबाजी सोडून दिली. यानंतर पोलिसांनी सुद्धा माझा मागोवा घेण्याचं सोडून दिलं. पायीपायी यात्रा करीत मी शेवटी लाहोरला पोहोचलो.

लाहोरमध्ये लाला लजपतराय यांच्यासारख्यांना भेटून मी धन्य झालो. त्यांची माझी प्रत्यक्ष भेट झाली. त्यांचा माझ्यावर विश्वासही बसला. त्यांनी सांगितलं की,

" हल्ली कोशलप्रदेशात मोठा दुष्काळ पडला आहे. दुष्काळग्रस्त लोकांत अन्न आणि कपडे वाटण्यासाठी मदत गोळा करीत आहे. कितीतरी नवजवान युवक माझ्याकडून पैसे घेऊन त्या दुर्भिक्षग्रस्त भागात राहून लोकांची सेवा करीत आहेत." शेवटी त्यांनी मला विचारलं,

" तुम्हीसुद्धा तेथे जाऊन लोकांची सेवा कराल काय ?"

अहो ! ज्या भागात प्रभू रामचंद्रानी राज्य केलं होतं ती ही पुनीतपावन भूमी. वाल्मीकीनी ज्या रामराज्याचं गुणगान केलं होतं तीच ही धरती. त्या धरतीवरचे लोक भुकेनं नग्नावस्थेत तडपत आहेत ? त्यांच्या सेवेसाठी मी जाईन काय, ही काय विचारण्याची गोष्ट आहे ? ते लोक तर मला पूजनीय आहेत. त्यांची सेवा करायची नसती तर हे ओझं वृथा कशासाठी वाहू ? लालाजीची अनुमती घेऊन मी तेथे गेलो आणि काही काळ सेवाकार्यात मग्न राहिलो. तेथे मी जे पाहिलं त्याबद्दल मी काय लिहू ? ठीक आहे, लिहितो. लक्ष द्या. देवलोकाबद्दल ऐकलंय् कधी ? तर मग—देवलोकाचं नरकलोकात रूपांतर झालं तर कस वाटेल ? तसं झालं होतं. श्रीरामचंद्राचं रामराज्य. तेथे पाहिलेल्या भयंकर दृश्यांचं मी आपणाला काय वर्णन करून सांगू ? त्या पुण्यभूमीची निंदा केल्यानं कदाचित थोडसं पापही लागेल मला. ह्या पापाव्यतिरिक्त काय मिळणार आहे मला ? तुमच्यापासून माझ्या मातृभूमीला काय लाभ होणार आहे ? उठून या... पाहा... किती दिवस विश्वास टाकीत बसून राहणार ! अरे अधमजातीवाल्यांनो ! पापिष्ठांनो ! ... अधिक काय सांगू ? एकदोन महिन्यातच लालाजींनी दुष्काळनिवारण कार्य बंद करण्याची आज्ञा केली.

कोशलप्रदेशात दुष्काळनिवारण कार्य करताना फार काळ माझ्या मनात जो एक विचार घर करून राहिला होता, तो पुन्हा उसळी मारून वर आला. आपल्या देशात उच्चवर्गीय समजल्या जाणाऱ्यांच्यात नीचजातीय लोकांच्या सुखदुःखाबाबत बेपर्वाईची आणि विन्मुखतेची जी भावना आहे ती पाहून मी निराश होत चाललो होतो. दक्षिण भारतीयांप्रमाणे उत्तर भारतातील खालच्या जातीचे लोक बहुत करून शेतकरी आहेत. कृषिकर्म करणारे हे लोक शास्त्राच्या दृष्टीने वैश्य ठरतील. परंतु ह्या लोकांपैकी कित्येक लोक गोमांसभक्षण वगैरे करणाऱ्यांपैकी असल्याने हिन्दुजातीतील लोक त्यांना खालच्या जातीतले मानतात. हिंदुधर्म आणि हिंदुसंस्कृतीत गोमाता आदरणीय आहे. हिंदु समाज आणि संस्कृती शेतीवर आधारलेली आहे. गाय, बैल हे शेतकामासाठी उपयोगी पडणारे प्राणी आहेत. म्हणून प्राचीन काळापासून हिंदूंनी गोमांस-भक्षण वर्ज्य केलं आहे. एका छोटयाशा जमातीलाच अभक्ष्यभक्षण वर्ज्य न मानताना पाहून त्यांना आपल्यापेक्षा अवनत आणि म्हणून अलग मानणं सुरू झालं. हे बिलकुल शास्त्रसंगत वर्तन आहे. परंतु दुष्काळ, प्लेग या सारख्या घातकी शत्रूंशी सामना करताना

उच्चनीच असा भेदभाव करणं हा आपला निव्वळ मूर्खपणा आहे. नीचजातीतील लोकांची आम्ही फार उपेक्षा केली आहे आणि त्यांच्या अवनतीला कारणीभूत ठरलो आहोत. त्याचं फळ आता आम्ही भोगत आहोत. **" हृदयमरिन्दिड चेय्यद कर्माङ्ल इगळंद पिरिदु पोमो "** ( जाणून बुजून केलेल्या कर्माचं फळ भोगल्याशिवाय सुटका कशी ? ) **" मुर्पहल् सेय्यिर पिर्पहल विळैयुम "** (करणी तशी भरणी). आम्ही चांभार आणि अस्पृश्यांना जी वागणूक दिली तशीच वागणूक आम्हाला विदेशांत मिळत आहे. आमचे शृंगेरीचे शंकराचार्य आणि वानमामलै जीयर स्वामी जर नेटाल, ट्रान्सवाल यांसारख्या देशात जातील तर त्याना शहराबाहेरील खालच्या जातीच्या लोकांच्या वस्तीतच राहावे लागेल. सर्वसाधारण लोक ज्या रस्त्यावरून चालतात, त्या रस्त्यावर त्यांना चालता येणार नाही. त्याना लांबूनच चालावं लागेल. पालखी किंवा गाडीची कल्पनासुद्धा त्यांनी करणं योग्य होणार नाही. थोडक्यात सांगायचं तर–आम्हीच आमच्यातील काही वर्गाला नीच लेखलं होतं. आता तर जग इतर देशवासियांना सोडून आमच्याच देशबांधवांना खालच्या प्रतीचे समजत आहेत. आम्ही आमच्यातीलच एका वर्गाला अस्पृश्य घोषित करून दुरावा निर्माण केला. आता तर वेदमार्गी आणि मुसलमान अशा दोन भागात खंडित झालेल्या आमच्या सर्व लोकांना सारं जग अस्पृश्य समजू लागलं आहे. जगातील प्रत्येक जातीत वर्गविग्रह आहे. परंतु वर्गभेदाची भावना मनात ठेवून कुठल्या तरी जातीला दुर्बल करून टाकलं तर तीच बाब घेऊन आम्हाला नीचवर्गीय दाखविणं विदेशीयांना सोपं होतं. आपापसातील फूट तिऱ्हाइतालाच लाभदायक ठरते.

१२०० वर्षापूर्वी जेव्हा मुसलमानांनी पंजाबात प्रवेश केला होता, तेव्हा आमच्यातील उच्चजातीच्या अत्याचारांपासून कंटाळलेल्या खालच्या जातीच्या लोकांनी त्यांचं स्वागतच केलं होतं आणि त्यांना जाऊन ते मिळाले होते, असं इतिहास सांगतो. त्यावेळी आमच्या जातीला जो रोग लागला होता त्यापासून आम्ही आजही मुक्त झालेलो नाही. दुष्काळ आणि प्लेगमध्ये प्रामुख्याने खालच्या जातीतील लोकच मृत्युमुखी पडतात. ह्या गोष्टीकडे उच्चवर्गीय लक्ष देत नाहीत. ह्याच्या उलट दूर देशातून आलेले इंग्रज पाद्री दुष्काळग्रस्त कंगाल लोकांना हरप्रकारची मदत देतात. त्याच्याबरोबरच शेकडो लोकांना, खास करून अनाथ मुलांना, आपल्या ख्रिस्ती धर्माची दीक्षाही देतात. हिंदूंची संख्या प्रतिवर्षी फार भयंकर गतीने कमी होत चालली आहे. मठाधिपती आणि महंत मंडळी आपली पोटं वाढविणं ही ज्ञानाचीच वृद्धी समजून आनंदित होत आहेत. हिन्दू लोक ! हिन्दू जनता ! आमचं रक्त, आमचं रक्तमांस, आमची हाडं, आमचे प्राण, हिन्दू जातीचे, हिंदुस्थानचे लोक कंगाल बनून, भुकेलेल्या, तहानलेल्या अवस्थेत मरू लागलेले आहेत, त्याची कोणी विचारपूसही करत नाही.

गोमांसभक्षणाच्या त्यांच्या सवयीपासून त्यांना परावृत्त करून स्वच्छ, नीट, राहायला शिकवून आपल्या समाजात मिळूनमिसळून राहायला दिलं पाहिजे. त्या लोकांना शिक्षण देऊन धर्म आणि भक्ती यांचं मर्म समजावून सांगून त्यांना आश्रय दिला पाहिजे. नाहीतर ते सर्व आमचे विरोधक आणि विपक्षीय होतील. ह्या दिशेने आपली स्वत:ची जी काही थोडी शक्ती आहे तोपर्यंत प्रयत्न करीत राहण्याची इच्छा माझ्या मनात निर्माण झाली. ह्याच दरम्यान कळलं की बंगालात अश्विनी कुमार नावाचे कोणी देशभक्त आहेत आणि ते उत्तर प्रदेशात ' नामशूद्र ' ( नावासाठीच फक्त शूद्र ) म्हणविल्या जाणाऱ्या खालच्या जातींच्या लोकांना हिंदू समाजात स्थान मिळवून देऊन त्यांची उन्नती करण्यासाठी झटत आहेत. माझ्या मनात त्यांना भेटण्याची इच्छा झाली.

## 4

कलकत्त्यात काही दिवस राहून मी पारिसालला पोहोचलो. तेथे जाऊन पत्ता शोधत-शोधत अश्विनीकुमार दत्तांच्याकडे पोहोचलो. दरवाज्यापाशी कुणी बंगाली बाबू उभे होते. त्यांना विचारलं, " अश्विनीबाबू येथेच आहेत ना ?" उत्तर मिळालं, " नाही. कालच काशीला गेले. " ' अरे देवा ! ' माझी परिस्थिती काठावर पोहोचूनसुद्धा मृत्युमुखी पडल्यासारखी झाली. माझ्या अंगावरील भगवी वस्त्रे पाहून त्या बाबूजींनी मला घरात नेलं, खायलाप्यायला दिलं आणि माझी ओळख विचारली, मी कोठून आलो इत्यादी विचारलं. मी त्यांना माझी सारी हकीकत कथन करून माझ्या येण्याचा उद्देश पण सांगितला. " हे पाहा बाबूजी ! जे लोक आमचा सहावा हिस्सा आहेत, त्यांना आम्ही अस्पृश्य ठेवलं तर परमेश्वर आम्हाला सद्‌गती देईल काय ?"— माझ्या तोंडून हे शब्द बाहेर पडताच त्या बाबूजींच्या मुखावर औदासीन्य पसरलं, नेत्र पाण्यानं डबडबले, वाटलं आता ते ओक्साबोक्शी रडणार. मनात म्हटलं, अस्पृश्यांच्या दयनीय अवस्थेमुळे हे इतके दु:खी होत आहेत. मी म्हटलं, " आपल्यासारखी सहृदय मंडळी अजून निघाली तर ह्या देशाचा उद्धार होऊन जाईल. "

" स्वामीजी ! आपण विचार केलात तसं दयाळू व करुणार्द्र हृदयदेवीनं अजून-पर्यंत मला दिलं नाही. उपेक्षित वर्गाच्या लोकांचा उद्धार करण्याची थोडीबहुत इच्छा आहे. अश्विनी बाबूजींच्या बरोबर मीही त्यांची थोडीफार सेवा केली आहे. परंतु आमच्यातील एक षष्ठांश लोकांची अशी दुर्गती होत आहे, हे माझ्या उदासीनतेचं खरं कारण नाही. आता आपल्या मुखातून जे वाक्य बाहेर पडलं, तेच वाक्य काही

दिवसांपूर्वी आलेली एक मद्रदेशीय स्त्री वारंवार उच्चारीत असे. आपले विचार ऐकताच मला त्या महिलेची आठवण झाली, आणि तिच्या स्थितीबद्दल वाईट वाटलं. अहो ! काय काय गुण तिचे ! काय रूप ! इतक्या लहान वयात देशासंबंधी काय श्रद्धा व भक्ती !" असं बोलता बोलता ते एकाएकी गप्प झाले. मग एकदोन वेळा माझ्याकडे निरखून पाहिलं. त्यांचं नाव सतीशबाबू असल्याचं त्यांनी अगोदरच सांगितलं होतं.

" सतीश बाबू ! असं काय पाहाताय माझ्याकडे ?" मी विचारलं.

ते म्हणाले, "स्वामीजी, मला क्षमा करा. आपण तर संन्याशी आहात. मला ज्ञात नाही की आपण कोणत्या प्रदेशाचे आहात. तरीसुद्धा आपला चेहरा पाहून असं वाटत की आपला चेहरा त्या युवतीच्या चेहऱ्याशी मिळताजुळता आहे. मी असं म्हणत नाही की तुम्हा दोघांचा चेहरा एकसारखाच आहे, परंतु का कुणास ठाऊक, आपल्या चेहऱ्यात तिचं रूप दिसत आहे."

मद्रदेशीय युवती म्हणताच माझं हृदय अधीर होऊन उठलं. नंतर त्यांनी जे काही सांगितलं, ते ऐकून माझ्या व्याकुळतेला सीमाच राहिली नाही. मी संन्याशाची वस्त्र ल्यालो होतो. पुष्कळ दिवसांपासून मी संन्याशाचं जीवन कंठीत होतो... अरे ! गोविंदा ! वेषभूषेत काय आहे...

मीना !... तिला जाऊन दोन वर्षांहून अधिक काळ गेला होता. माझ्या प्रियेने किती कष्ट झेलून प्राणत्याग केला होता ! पळभरात माझ्यावर मनाचं भूत सवार झालं आणि त्यानं प्रचंड खळबळ माजविली. हजारो कल्पना तांडवनृत्य करू लागल्या.

" सतीश बाबू ! मी सुद्धा मद्रदेशीयच आहे. आपण सांगत असलेल्या युवतीच्या कहाणीवरून मला माझ्या एका भावंडाची आठवण आली. सांगा ! ती कोण आहे ? नाव काय तिचं ? आता कुठं आहे ? येथे कोणत्या उद्देशानं आली होती ? तिच्याबद्दल आपल्याला दुःख का वाटतं ? तिला आता कोणता त्रास आहे ? जरा विस्तारानं सर्व गोष्टी सांगा मला."

सतीशबाबूंनी कहाणी सुरू केली. त्यांचं प्रत्येक वाक्य माझ्या हृदयात अग्नीत तापवलेल्या लोखंडाच्या तीराप्रमाणे घुसत होतं. त्यावेळी मला काय वाटत होतं याचं वर्णन करत राहिलो तर वाचकांना कंटाळवाणं वाटेल ह्या भीतीने त्यांनी जे काही सांगितलं तेच ऐकवतो. माझ्यातील मानसिक आंदोलनाची कल्पना तुम्ही करू शकाल.

सतीशबाबूंनी सांगितलं, " ती युवती तंजावरची होती. तिचं नाव मला माहीत नाही. आम्ही सारे तिला ' दीनमाता ' म्हणत असू. केवळ अश्विनीबाबूंना तिचं खरं नाव माहिती आहे. परंतु त्यांनी त्या देवीची कहाणी आम्हाला सुनवली आहे. ती पोलीस विभागातून निवृत्त झालेल्या एका अधिकाऱ्याची कन्या होती. तिच्या आत्याच्या

मुलाशी तिचा विवाह ठरला होता. तो युवक ' वंदेमारम् 'च्या भानगडीत पडला. त्यानंतर तिच्या पिताजींनी एका दुसऱ्या पोलिस इन्स्पेक्टरशी विवाह करून देण्याची तजवीज केली. ऐन मोक्यावर स्वप्नात आलेल्या देवीच्या आज्ञेवरून तिनं कोणती तरी जडीबूटी खाल्ली, ज्यामुळे तिला भयंकर ज्वर आला आणि विवाह थांबला. नंतर तिचे पिताजी स्वर्गवासी झाले. त्याच काळात तिचा प्रेमी ती मरण पावली असं समजून संन्यास घेण्यासाठी घर सोडून निघून गेला. "

अधीर मना ! धीर धर जरा ! तुटूनफुटून नकोस जाऊ. स्वतःवर ताबा ठेवण्याचा पूर्ण यत्न केला पण शेवटी हरलो. ओरडलो जोरात, " हाय ग मीना ! मीना ! " मग म्हणालो, " सतीशबाबू ! सांगा, आता तिच्यावर कोणतं संकट आलं आहे ? "

सतीशबाबू समजायचं ते समजले. म्हणाले, " आता कोणतंच नाही. सर्व कुशल आहे. "

" नाही–नाही ! तुम्ही माझ्यापासून काहीतरी लपविता आहात. खरंखरं कळलं तर मी दुःखी होईन, म्हणून तुम्ही मला सांगायला घाबरता आहात. ही यातना मला नरकासारखी वाटते. कृपया सांगा ना मला. " मी आग्रह करू लागलो. ह्यावर सतीश-बाबू थातुरमातुर सांगून वेळ मारून नेऊ लागले.

" नाही–मला खरंखरं सांगून टाका. भारतमातेची, भगवद्गीतेची शपथ आहे. सांगा. " मला माहीत होतं की सत्य आणि शपथ हे शब्द बंगाली लोकांना किती बंधनात ठेवतात, अगतिक करतात. माझे हे शब्द ऐकताच ते थोडेसे नाराज झाले.

" अरे ! नादान संन्याशा ! काय शपथ घातलीस रे ! ऐकतर मग ! आता खरंच सांगतो. ती युवती येथील नामशूद्रांच्या सेवेत दुष्काळ निवारणाचं सेवाकार्य करीत होती तेव्हा तिला थंडीची बाधा झाली. ताप चढला. डॉक्टरांनी सांगितलं की ती वाचणं कठीण आहे. वाचण्याची आशा फार कमी आहे. त्या युवतीची इच्छा होती की तिचा शेवटचा श्वास काशीत घ्यावा म्हणून अश्विनीबाबू तिला काशीला घेऊन गेले आहेत. आता सत्य सांगितलं, चल निघून जा. " सतीशबाबू म्हणाले.

" काशीला ? "

" हो. "

" काशीत कुठे ? "

" त्याच घाटावर."

" त्याच घाटावर कुठे ? "

" त्याच्याच जरा दक्षिण भागात ' नरवा ' नावाचं स्थान आहे. तेथे काही बंगले आणि बागबगीचे आहेत. त्यातील तैंपूर महाराजाच्या बंगल्यात अश्विनीबाब उतरले आहेत. "

मी म्हणालो, " रेल्वेचं भाडं द्या. "

त्यांनी दहाची नोट काढून माझ्या दिशेने फेकून दिली. मानापमानाची कुणाला चिंता ? नोट घेऊन मी तेथून तडक निघालो. साऱ्या मार्गात खायला हृदय आणि प्यायला अश्रू यांच्याशिवाय काही न घेता काशीला येऊन पोहोचलो.

5

काशीत हनुमान घाटावर माझ्या परिचितातील लोक आहेत. माझ्या मित्राचे बन्धू तेथेच राहतात. वाचकांपैकी कुणी काशीला गेलेले असल्यास मी सांगत असलेलं स्थान त्यांच्या ध्यानात येईल. तमिळनाडूचे लोक बहुतकरून हनुमान घाटावरच जातात. तेथे पश्चिमेकडे एक गल्ली आहे ना ? त्यात पूर्वपश्चिम कोपऱ्यातून तिसरा बंगला. त्याचं नाव आहे ' शिवमठ.' यात्रेसाठी आलेल्या मंडळीसाठी जी घरे बांधली आहेत, त्यांना काशीत ' मठ ' म्हणतात. मी शिवमठात गेलो. स्नान करून मठवाल्यांनी जे काही दिलं ते खाऊन, त्या मठातल्या एका मुलाला बरोबर घेऊन ताबडतोब नरवा मोहल्या-कडे निघालो. तेथे तैप्पूर राजाच्या बंगल्याचा पत्ता शोधून काढून बंगल्यात पोहोचलो. तोपर्यंत सात वाजले होते.

दारापाशी एक घोडागाडी उभी होती. गाडीत आंग्ल पोषाख परिधान केलेले एक बंगाली सद्गृहस्थ बसले होते. त्यांच्याजवळ एक वृद्ध आणि काही लोक उभे होते. अश्विनीकुमार दत्तांचे फोटो मी काही ठिकाणी पाहिले होते म्हणून त्याना ओळखू शकलो, की हेच ते अश्विनीकुमार. मला पाहून जवळच उभ्या असलेल्या एका व्यक्तीला ते म्हणाले, " कुणी संन्यासी आला आहे. त्याला वरांड्यात घेऊन जा. मी येतो इतक्यात." वरांड्यात दोन खुर्च्यांवर मी आणि माझ्या साथीला आलेला मुलगा दोघं बसलो. तेथून अश्विनीबाबू आणि ते सद्गृहस्थ यांच्यामधलं बोलणं स्पष्ट ऐकू येत होतं.

अश्विनीबाबू–" डॉक्टर ! कालच्यापेक्षा आज प्रकृती थोडी सुधारली आहे. तुम्हाला काय वाटतं ?"

डॉक्टर–" अशक्तपणा खूप आहे. अजून चोवीस तास भीती आहे–हा काळ टळून गेला की मग चिंता नाही. "

विषानं माखलेल्या बाणाप्रमाणे हे शब्द माझ्या कानात घुसले. मी ओरडलो– " मीना ! मीना ! ! "

गाडी निघून गेली.

माझं ओरडणं ऐकून अश्विनीबाबू आणि इतर मंडळी माझ्याकडे येऊ लागली. त्यांना येताना पाहून मी स्वतःला सावरलं आणि उभं राहून हात जोडले

" स्वामीजी ! कुठले आपण ? येथे येण्याचा उद्देश काय ? मघाशी आपण ओरड-लात का ? " बाबूजींनी हिंदुस्तानीत विचारलं.

" बाबूजी ! मी ना कोणी साधु आहे ना संन्यासी. दुर्भाग्यामुळे बनलेला चोर आहे. मीनाने आपल्याला गोविंदराजनचं नाव सांगितलं असेल तोच मी पापी."

ताबडतोब बाबूजींनी मला वरच्या मजल्यावरील एका खोलीत नेलं आणि म्हणाले, " काल मी कितीतरी वेळा आपल्यासंबंधी विचार करत होतो. मला वाटलंच की आपण येथे येणार."

नंतर मला आज्ञा झाली—' पूर्वेकडे तोंड करून बसा.' मी तसं केलं. दोन्ही डोळे बंद करून घेतले. ते माझ्या डोक्यावरून हात फिरवीत काहीतरी पुटपुटत होते. मला झोप आल्यासारखं वाटलं. मनात विचार आला— ' अरे ! मीनाला अजून पाहिलंसुद्धा नाही...माझी प्रिया आसन्नमरण पडली आहे. तिला पाहण्यापूर्वीच मला अशी झोप का येऊ लागली आहे ? हे माझ्यावर जादूटोणा तर करीत नसावेत ? माझ्या प्रियेचं दर्शन मला होण्यापासून ते परावृत्त तर करीत नाहीत ? नाही— ह्या मायाजाळापासून सुटका करून घेतली पाहिजे. डोळे उघडले पाहिजेत. मी उठण्याचा पूर्णपणे प्रयत्न करून पाहिला. ' हूं ' म्हणल्याचा आवाज ऐकू आला. डोळे उघडू शकलो नाही. बेहोषी वाढत चालली होती आणि लगेच मी निद्रावश झालो.

जेव्हा माझे डोळे उघडले, तेव्हा मला कळले की दोन दिवस मी निद्रामग्न होतो. जवळ बसलेल्या एका सेवकाला विचारलं, " मीना कुठंय् ? ती सुखरूप तर आहे ना ? " तो म्हणाला, " मला काहीच माहीत नाही." मी नेहमीसारखा असतो तर त्याला लाथ मारून, समोर येईल त्याला झोडपून त्याला पाडून तिच्याजवळ गेलो असतो. परंतु माझं शरीर फार थकल्यासारखं होतं, परंतु एक प्रकारची मनःशांती मी अनुभवीत होतो. मनातील सारी अस्वस्थता नष्ट झाली होती. लक्षात आलं की पारिसालच्या त्या वृद्धाचीच ही किमया आहे. अर्ध्या तासानंतर अश्विनीबाबू माझ्या खोलीत आले आणि माझ्यासमोर असलेल्या खुर्चीत बसले. सहजच माझे हात जोडले गेले.

' ओऽम् ' म्हणत त्यांनी आशीर्वाद दिले. म्हणाले, " हे ! बालसंन्यासी ! कपट संन्यासी ! अर्जुन संन्यासी ! तुझं नशीब खुललं आहे."

समजून चुकलं की मीना वाचली आहे. विचारलं, " मीना बरी झाली ? "

" अगदी पूर्ण बरी झाली. अजून पन्नास वर्षपर्यंत समुद्रात फेकलं तरी तिला मुळीच काही होणार नाही."

" आता मला जाऊ द्या तर मग. ती मृत्युमुखी पडेल ह्या भीतीनं मी आपलं व्रत

विसरून तिला पाहायला धावत येथे आलो. आता तिला भेटण्याची किंवा तिच्याबरोबर राहण्याची मला इच्छा नाही. मी निघून जातो."

अश्विनीबाबू मोठमोठ्याने हसले आणि जवळ उभ्या असलेल्या दरवानाला म्हणाले, " ह्यांच्यासाठी थोडं दूध आणा." दरवान हाततोंड धुण्यासाठी पाणी आणि प्यायला दूध घेऊन आला. आश्विनीबाबूंनी दिलेल्या त्या दुधाचं प्राशन करता करताच वाटू लागलं की मी कुट्रालमच्या झऱ्यात स्नान करीत आहे. माझा सारा थकवा पार पळून गेला. मी खूप आराम आणि शांतीचा अनुभव घेतला.

" आता बोला ! जाण्याची इच्छा आहे ? " स्मित करीत अश्विनीबाबू म्हणाले.

मी उत्तर दिले, " फक्त एकदाच तिला भेटून निघून जाईन."

एकाएकी अश्विनीबाबूंच्या स्मिताची जागा मैत्रीनं घेतली. ते म्हणाले, " बेटा ! तू मीनाशी विवाह कर. तुम्ही दोघं पतिपत्नी प्राचीनकाळचे ऋषी–ऋषिपत्नी जसे यज्ञ-याग करीत तसे आयुष्यभर मातेच्या सेवेत जीवनयज्ञ करीत राहा."

मी विचारलं, " कालीमातेच्या आज्ञेचं काय होईल ? ह्या जन्मात गोविंदराजनशी विवाह करावयाचा नाही, असा देवीनं मीनाला आदेश दिला आणि विषारी जडीबूटी खायला सांगितलं होतं." त्या गोष्टीचं मी स्मरण करून दिलं.

त्यावर ते म्हणाले, " ते सर्व मला माहीत आहे. कालीदेवीचा आदेश पूर्णपणे न समजून घेता मीनानं तुला पत्र लिहिलं होतं. मीनाला देवीनं जे काही सांगितलं त्याचा अर्थ काही वेगळाच होता. तो तर जीवनाच्या परिवर्तनासंबंधी इशारा होता. तिला विषारी बूटी खायला आदेश ह्यासाठी दिला होता की ताप येईल आणि पिताजींनी ठरविलेला विवाह होणार नाही. ज्वर येण्यापूर्वी तिचा पहिला जन्म होता आणि नंतरचा वेगळाच आहे. देवीचा संकेत स्पष्ट होता. परंतु न आवडलेल्या व्यक्तीशी विवाह करण्याच्या कल्पनेनेच मीना घाबरली होती, त्या घाबरलेल्या अवस्थेतच तिनं तुला पत्र लिहिलं आणि तूसुद्धा भावनाविवश होऊन संन्याशाची वस्त्रं परिधान केलीस. पण लक्षात ठेव, कोणत्याही गुरूनं तुला दीक्षा दिलेली नाही. जाऊ द्या. जे काही घडलं, ते तुम्हा दोघांच्या भल्यासाठीच घडलंय्. तुम्हा दोघांच्या हृदयशुद्धीसाठी हा वियोग अनिवार्य होता. ठीक आहे. मी आता जातो. आज संध्याकाळी चार वाजता, पुष्पवाटिकेत लतामंडपात मीना तुझी प्रतीक्षा करीत असेल." अश्विनीबाबू निघून गेले.

संध्याकाळ झाली. मी संन्याशाचा वेष बदलून नेहमीचा पोशाख परिधान केला. मी आणि माझी प्रिया लतामंडपात मीलनसुखाचा आनंद लुटत होतो. जणू काही माझ्या प्राणांनीच माझ्या प्रियेचं रूप धारण केलं होतं. आमचे अधर एकमेकांना भेटले. दोन जीव देवीच्या सेवेसाठी एकमेकांत गुंफले गेले.

निसर्गरूपी देवीमातेच्या मुखारविंदावर स्मित झळकले होते.

# असंच आपलं !

काल संध्याकाळी मी असाच आपला एकटा तिसऱ्या मजल्यावर बसलो होतो. माझ्या घराला दुसऱ्या मजल्यावरून तिसऱ्या मजल्यावर जायला जिना नाही. भाड्या-चेच घर आहे. घराचे मालक चेट्टियार यांना मी कितीतरी वेळा जिना करून देण्या-विषयी सांगितलं आहे. ते आज नाही, उद्या बघू, असं म्हणत टोलवाटोलवी करीत आले आहेत. तिसऱ्या मजल्यावर पोचणं जरा कठीणच होतं. एखाद्या उंचवटयावर उभं राहून तेथून चांगलं पुरुषभर उंचीवर उडी मारून चढावं लागतं. तिसऱ्या मजल्यावरील छताला धरून खालून वरच्या दिशेनं चढताना थोडा जरी हात सुटला तरी इतक्या उंचीवरून खाली पडून जबर मार बसण्याचा संभव असतो. परंतु मी एकांतप्रिय आहे म्हणून हा धोका पत्करून वर चढून जात असे आणि तासन् तास तेथे बसत असे. मार्गशीर्षाचा महिना होता, हवा बरीच थंड होती. ऊन्ह खाण्यासाठी ही जागा फार चांगली वाटली.

काल संध्याकाळी मी तेथे उन्हात बसलो होतो, तेव्हा गिट्टु कुळ्ळ स्वामी आणि वेणुमुदली दोघेही वर आले. त्या दोघांना दुसऱ्या मजल्यावर असलेल्या मोकळ्या जागेत उभं राहून मला हाक मारली. खाली उतरण्यासाठी मी धोतर करकचून बांधलं. इतक्यात कुळ्ळ स्वामींनी माझ्याकडे पाहात म्हटलं, "तुम्ही तिथंच थांबा. आम्हीच वर चढून येतो."

कदाचित् आपल्याला आठवत असेल की या स्वामींबद्दल मी पूर्वीसुद्धा लिहिलेलं आहे. हे कलियुगाचे जणू जडभरतच आहेत. महाज्ञानी ! सर्व प्राणिमात्रांवर दया दाखविणारे दयाळू आहेत. योगींद्र आहेत. राजयोगाद्वारे श्वास बंद करून घेणारे महान पुरुष आहेत. दिसायला भिक्षुकासारखे दिसतात. जुनी–फाटकी चिंधड्या झालेली वस्त्रं अंगावर घेऊन रस्त्यात फिरत असतात. मात्र स्त्रिया आणि मुलं यांचा मोठेपणा पुरेपूर ओळखत असत. कारण रस्त्यावर भटकतानासुद्धा स्त्रिया यांना हात जोडून नमस्कार करीत. मुलं तर आपल्या आईकडे जशी धावत जातील तशी ह्यांच्याकडे पळत येत आणि त्यांच्या पायांना लपेटत. तेसुद्धा त्यांच्या निरागस हास्याबरोबर त्यांचे लाड करीत, त्यांना जवळ घेत. परंतु इतरेजनांना मात्र यांचा महिमा ठाऊक नसावा.

उडी मारण्यापूर्वी ते उंचवटयावर चढले आणि तेथून उडी मारून वरच्या छतावर आले. त्यांचं पाहून वेणुमुदलीसुद्धा उडी मारण्यासाठी उंचवटयावर चढले. इथपर्यंत जमलं. पण उंच उडी मारून वरच्या छतावर येण्यापूर्वीच पाय निसटला आणि ते धाडकन् खाली आपटले. माझ्यासारखे ते असते तर आठदिवस तरी अंथरुणाला

खिळून पडले असते. परंतु वेणुमुदली अगदी धट्टेकट्टे होते. तगडे पैलवानच. म्हणून काही मिनिटातच उठले आणि परत वर यायला लागले. ते पाहून स्वामीजीच मला म्हणाले, "चला ! आपणच खाली उतरू या." मलाही ते पटलं आणि वर येऊ पाहणाऱ्या वेणु मुदलीना थाबवून आम्ही खाली उतरलो. दुसऱ्या मजल्यावरील मोकळ्या जागेत तीन खुर्च्या टाकून बसलो.

वेणुमुदलीनं माझ्याकडे पाहून विचारलं, "काय हो ! हनुमानाप्रमाणे वर चढून एकटे काय करीत होता वर ?"

मी म्हटलं, "सहजच बसलो होतो."

हे ऐकताच वेणुमुदलांचा पारा चढला. जोरजोरात ओरडू लागले, "सहज... सहज ! अहो, असं रिकामटेकडं बसल्यामुळंच हिंदुस्थानाचा सत्यानाश झाला आहे ना ?"

ह्या देशात ज्याला पाहावं तो 'सहजच' रिकामटेकडा बसला असतो. लाखाऱ्या संख्येत असलेले साधुसंन्यासी, पंडे, फकीर, स्वामीजी याच्या झुंडीच्या झुंडी निकामी बसलेल्या असतात. गाजा ओढणे, भीक मागणे, आळशी बनून बेकार इकडे तिकडे भटकत राहणे हाच यांचा धंदा. दोन वेळा खायला मिळालं की बस्. ह्या देशात कुणाला कुठलाही धंदा करण्याची सवयच नाही. जमीनदार, जहागीरदार, मठाधिपती, महंत, राजा, महाराजा वगैरेंचा एकच धंदा. तो म्हणजे 'सहज' बसणं. भाऊगर्दी करणं. हा आळश्यांचा आणि कामचोरांचा देश आहे."

अशा प्रकारे वेणुमुदली बडबडत राहिले. इकडे कुळ्ळ स्वामीजी पश्चिमेकडे तोंड करून **"सुम्मा इरुप्पटुवे सुट्ट्र पूरणम् एन्रेम्माल अरिदर केलिदो परापरमे"** (गप्प बसणं ही जीवनाची परिपूर्णता आहे असं समजणं आमच्यासाठी सुलभ कुठं आहे ? हे परमात्मा !) अशा अर्थाचं तायुमानवर ह्या तमिळ संतकवीचं पद गाऊ लागले.

वेणुमुदलीनं त्यांच्याकडे पाहात म्हटलं, "स्वामीजी ! कालिदासच्या मुखातून ऐकलं होतं की आपण मोठे राजयोगी आहात. मी आपल्याशी बोलत नाही, कालिदासलाच सांगेन. तुम्ही तर आपल्याला संन्याशी म्हणून घोषित करून हा जन्म निर्जीव वृक्षाप्रमाणे निष्फल घालविणाऱ्यांपैकी आहात. वृक्ष कशासाठी असतात ? वृक्ष तर इतरांना आपली फळं देतो. फुलं देतो. काष्ठं देतो. त्याची तुलना आपल्याशी करणं गैर ठरेल. आपल्यासारख्या लोकांकडून इतरांना हानी होते परंतु वृक्षापासून दुनियेला लाभ होतो, किती उपकार करत असतो तो !"

वेणुमुदली बोलतच राहिला. कुळ्ळस्वामीने तायुमानवरचं एक गीत गायला सुरवात केली–

**" सुम्मा इरुक्क सुखम् सुखमेन्द्र करुदियेल्लाम्**
**अम्मा निरंतरम् चोल्लवुम् केट्टू अरिविन्द्रिये,**
**पेम्मान् मवुनि मोळियैयुन् तप्पि एन् पेदम्मैय्याल**
**वेम्मायक् काट्टिल अलैन्देन अन्दो एन विधिवसमें । "**

नि:स्पृहपणे ब्रह्मस्थानी लीन राहण्यातच सुख असते. ह्या सुखाचा त्याग करून अन्य सासारिक सुखांना मानून, भगवान दक्षिणामूर्तीचा उपदेश विसरून आपल्या अज्ञानामुळे ह्या मायामय जगरूपी अरण्यात प्रारब्ध म्हणूनच भटकत राहिलो.)

वेणुमुदलीला मार लागला होता ना ! दुखण्यामुळे तो मनातल्या मनात चिडला होता. त्यावर स्वामीजीना असं हसतहसत गाताना पाहून त्याचा पारा एकदम चढला– " स्वामीजी ! आपण तर जुन्या पठडीतील आहात. आपल्याशी वादविवाद करण्याची इच्छा नाही माझी. माझ्या प्रतिभेची झेप आपल्याला काय माहीत ? मला बारा भाषा ज्ञात आहेत. तुम्हाला तर फक्त तमिळचेच ज्ञान आहे. हे महायुद्ध संपताच मी युरोप अमेरिकेत जाऊन तेथे हिंदुधर्माची संस्थापना करणार आहे. तुम्ही तर भीक मागून खाणाऱ्यापैकी, कुठल्याही चबुतऱ्यावर पडून राहणाऱ्या साधूपैकी आहात. आपल्या दोघांची तुलना होऊच शकत नाही. परंतु देशसेवेचा दम भरणाऱ्या ह्या कालिदासाला अशा प्रकारच्या आळशी निकामी साधूच्या संगतीत आपला समय वेचताना पाहून मला मोठं आश्चर्य वाटतं. वाटतं की आपल्याकडूनच त्यांनी असं ' ठेविले अनंते तैसेचि राहावे ' असा पाठ शिकून घेतला असावा. " वेणुमुदली व्याकरणशुद्ध पंडिती भाषेत बोलतच राहिले.

स्वामीजी तायुमानवरचं पद पुन्हा गाऊ लागले–

**" सुम्मा इरुक्क सुखम् उदयमागुमे,**
**इम माया योगम् इनि एनडा–तम्मररिविन्**
**सुट्टाले यागुमो सोल्ल् वेण्डाम**
**कर्मनिष्ठा सिरू पिल्लाय् नी ! "**

( हे, कर्मनिष्ठेत राहणाऱ्या अज्ञानी मना ! ब्रह्मज्ञानात लीन राहून ' तैसेच ' राहण्यानेच सुखाचा उदय होईल आणि सुखप्राप्ती होईल. तर मग ह्या मायादि-योगादि क्रिया कशाला पाहिजेत ? बुद्धिपूर्वक विचार करणेच जास्त श्रेयस्कर होय.)

वेणुमुदलीने माझ्याकडे पाहून विचारले, " कालिदासजी ! ह्या साधूला आपण किती दिवसांपासून ओळखता ? "

मी काहीच उत्तर दिले नाही. असाच गप्प राहिलो. कुळ्ळस्वामींनीच बोलायला सुरुवात केली.

खूप लांबलचक गोष्ट आहे ती. थोडक्यात सांगायची म्हटली तरी दोन भागांत

द्यावी लागेल. कदाचित् चार-पाच प्रकरणेसुद्धा होतील. कागद टंचाईच्या या जमान्यात इतकी मोठी गोष्ट कशाला सांगत राहू ? तुम्ही विचारलंत तर मला सांगावं लागेल की गोष्ट मोठी मनोरंजक आहे. अद्भुत आहे. अशी गोष्ट मी आतापर्यंत न लिहिली आहे, न वाचलेली आहे. तुम्हीसुद्धा ती वाचाल तर दिङ्मूढ होऊन जाल. कदाचित् हा–हू करत नाचायला लागाल. खरंच ! मी अशी अद्वितीय, अवर्णनीय गोष्ट ऐकली नाही. म्हणूनच ह्या जगात आतापर्यंत लिहिल्या गेलेल्या सर्व गोष्टींच्याहून निराळी अशी कथा मी आपल्याला ऐकवणार आहे. हा लेख बराच लांबला आहे म्हणून पुढच्या भागातच मी सुरुवात करीन. म्हणून थोडा धीर धरावा.

## 2

कुळ्ळस्वामी सांगायला लागले–" बान्धवहो, ऐका ! मी तर निकामी बसणाऱ्या लोकांच्याच बाजूचा आहे. काहीही काम न करणाऱ्या साधुसंन्याशांच्यामुळे ह्या देशाचा सर्वनाश ओढवला आहे असं तुम्ही म्हणालात ते योग्य नाही. अधर्म हेच देशाच्या पतनाचे कारण होय. केवळ संन्याशांनीच अधर्म केला असं नाही. गृहस्थांनी अधर्मपालन सुरू केलं त्यामुळे संन्याशांनाही अधर्माने घेरलं. आजसुद्धा सच्चे योगी–महात्मा ह्या देशात आढळतील. त्यांच्यामुळेच ह्या देशाचा सर्वनाश टळला आहे. आता तर सर्व जगच डळमळू लागलं आहे. मोठीमोठी साम्राज्ये पडत आहेत. परंतु हिंदुस्थान ऊर्ध्वमुखी होऊन उन्नतीच्या दिशेने वाटचाल करत आहे. स्वत: जगेन आणि जगालाही जगवीन अशी आशा आणि हिम्मत हिंदुस्थानच्या लोकांत जागृत झाली आहे. ह्यापूर्वीही अशा किती तरी प्रलयांतून तो बचावला आहे. काही दिवसांपूर्वी आपल्या नव्या प्रयोगशाळेचे उद्घाटन करताना श्री. जगदीशचंद्र बसू काय म्हणाले होते ? तुम्ही वाचलं होतं ? पापिलॉन आणि नाईल नदीच्या तटावरील विकसित झालेल्या संस्कृतीचा एकदा नाश होऊन त्या पुनर्जन्म पावल्या आहेत. परंतु हिंदुस्थानचा समाज आणि संस्कृती पूर्ववत जिवंत आहेत. कारण सर्व धर्मांचे विशिष्ट-मूळ मानला जाणारा जो आत्मपरित्याग तो ह्या देशातून पूर्णपणे नष्ट झाला नाही. अजूनही काही लोकांच्या अनुष्ठानात आढळतो असंच बसूंनी सांगितलं होतं." स्वामीजी पुढे बोलणार, इतक्यात वेणुमुदलीनं त्यांना अडवून विचारलं, " " स्वामीजी ! आपण इंग्रजी कुठं जाणता ? वृत्तपत्र कुठं वाचता ? मग जगदीशचंद्र बसूंनी जे सांगितलं ते आपल्याला कसं कळलं ?" स्वामीजी म्हणाले, " अनावश्यक गोष्टी विचारू नका. मी सांगतो ते लक्षपूर्वक ऐका. योगी पुरुषच हिंदुस्थानच्या

आत्म्याचं रक्षण करीत आले आहेत. ह्या भयंकर कलियुगात सर्व जगात उलथापालथ होत आहे. परंतु हिंदुस्थान ना विचलित झाला आहे ना नष्ट झाला आहे. स्वतः संभाळत, इतरांचं रक्षण करीत जीवनदान देण्याची शक्ती ह्या देशातील त्या योगीं-च्याच तपोबलामुळे प्राप्त झाली आहे." स्वामीजी मोठ्याने हसत बोलले. "नाना प्रकारच्या औषधी आणि पौरुष वाढवणाऱ्या वनस्पती खाऊन प्रत्येकजण शंभर–दीडशे बायकांनी भरलेल्या अंत:पुरात अडकलेले आणि विलासात रममाण झालेले, कुत्री एकमेकांवर तुटून पडतात, त्याप्रमाणे तुटून पडत लढत राहिले आणि हिमालयाच्या पलीकडून आलेल्या परकीयांचं आक्रमण होताच जे ठिसूळ भिंतीप्रमाणे ढासळून पडले, त्या राजांच्या पराक्रमावर हा देश आतापर्यंत जगला असं का मानता तुम्ही ? का असं वाटतं की ब्राह्मणाच्या ब्रह्मतेजामुळे हा देश अमर झाला आहे ? जो ब्राह्मण प्रत्येक दिवशी पहाट फुटताच कशाची ना कशाची तरी वाटच पहात असतो. कोण मरतंय ? कुठं आज जेवण मिळेल बर ? कोठे मर्तिक आहे, कोठे केशवपन केलं जातंय्... अशा प्रकारे नाना भानगडी आणि अर्थ न समजता वेदमंत्र म्हणणे ! तुम्ही असं समजता का की वैश्यांच्या लोभामुळे हा देश जीवित आहे ? किंवा शूद्रांच्या अविवेकामुळे वा नादानीमुळे ? पाचव्या: म्हणजे खालच्या जातींतील ह्या असल्या दशेमुळे का ह्या मातीला अमरत्व प्राप्त झालं आहे ? बोला ! बोला ना आता तुमचे विचार. हिंदुस्थानाला अमरत्व कशामुळे मिळालं आहे ?

"अरे वेणुमुदली ! जरा ध्यानात घ्या. तुम्ही सांगितलं होतं की युद्धसमाप्तीनंतर हिंदुधर्माची संस्थापना करायला तुम्ही अमेरिका आणि युरोपात जाणार. हिंदुस्थानातील योगी पुरुषांची महत्तासुद्धा तुम्हाला कळली नाही. तर तुम्ही हिंदुधर्माची तेथे काय संस्थापना करणार ? हा विचार मनात आला की मला खूप हसू येतं.

"वेणुमुदली, ऐका. हिंदुस्थान त्या महायोग्यांच्या मोठेपणावर आजपर्यंत जगत आला आहे. जोपर्यंत हे जग राहील तोपर्यंत हा देश अमर राहील. अरे वेणुमुदली–हे पाहा, हे पाहा ना !"

कुळ्ळस्वामींच्या मुखातून हे शब्द बाहेर पडतांनाच मी आणि वेणुमुदलीनं त्यांच्याकडे पाहिलं.

कुळ्ळ म्हणजेच बुटके स्वामीजी उंच उंच होत गेले. जे पावणे पाच फूट उंचीचे होते ते आता पावणे आठ फूट उंच झाले. एक नेत्र सूर्याचा आभास निर्माण करणारा होता. तर दुसरा नेत्र चंद्रासारखा प्रकाशमान. उजव्या बाजूनं पाहिलं तर त्यांचा चेहरा शंकरासारखा दिसत होता. डाव्या बाजूने पार्वतीदेवीसारखे दिसू लागले. वाकले तर विघ्नेश्वरासारखे दिसले. ताठ उभे राहिले तर भगवान विष्णूंचा चेहरा

त्यांच्यात दिसला. स्वामीजी म्हणाले, "हे वेणुमुदली ! ऐक ! मी हिंदुस्थानच्या समस्त योग्यांचा अधीश्वर आहे. योगेश्वर आहे. सर्व ऋषीमध्ये अग्रणी आहे. मी देवदेवतांचा अधिपती आहे. मीच ब्रह्मा आहे, विष्णू आहे, महेश आहे. हिंदुस्थानचा सर्वनाश होण्यापासून मी वाचवीन. सर्व भूमंडळात मी धर्माचं संस्थापन करीन.

"मी कृतःयुगाचा संस्थापक बनेन ! मीच परमपुरुष आहे. पूर्वी होऊन गेलेल्या आचार्यांनी कोणता संदेश आपल्याला दिला आहे ? सर्व जीवात्मे एक होत. म्हणून कावळ्यापासून ते कृमिकीटकापर्यंत सर्वांशी निर्दय होऊ नका. दयाशील बना—असंच सांगितलं आहे.

"हे वेणुमुदली ऐक—

"शैव धर्माचं आचरण करणाऱ्यांनी वैष्णवधर्म त्याज्य मानला तर वैष्णव धर्माचं आचरण करणाऱ्यांनी शैवधर्म निषिद्ध मानला.

"मी तर म्हणेन, कावळ्यांवर दया दाखवू नका. उलटे हात जोडा. हात जोडून प्रणाम करा. कृमिकीटकांना प्रणाम करा. हवेला आणि मातीला दंडवत घाला.

"वेदांनी जे सांगितले ते आचरणात आणणारा मी आहे. सर्व पुराणांना एकत्र आणून त्यांच्यातील एकत्वाला स्थापित करणारा मी आहे. हिंदुधर्माला प्रतिष्ठापित करणारा आहे मी.

"वेदाचं म्हणणं आहे की धरती, आकाश, वायू, सूर्यचंद्र, समस्त जीवजंतू, तुम्ही—आम्ही, सर्व ईश्वर होत. हे देवदेवताच होत. ह्यांच्याशिवाय दुसऱ्या देवता नाहीत. सभोवतालचं दृश्य जगत् नारायण आहे. हेच आपल्या हृदयात पक्कं रोवून त्याची आराधना करीत लीन होऊन त्याच्या ध्यानातच स्वतःला विसरून जायचं असतं.

"ऐका ! त्या अवस्थेत नारायण आमच्यात सचारेल. ह्या साधनेचा मार्ग अवलंबून मी मानवप्रवृत्तीतून मुक्त होऊन मी अमरत्व प्राप्त केलं आहे. म्हणून मी स्वतः देव बनलो आहे. देवांचा अधिपती आहे मी. माझं नाव विष्णु आहे. शिवशंकराचा मी पुत्र. मीच गणपती, मीच अल्ला, मी येहोवा. पवित्र आत्मा. समस्त जीवजंतू म्हणजे मीच.

"मीच पंचभूत, अहं सत्. कृतयुगाला मी आदेश दिला म्हणून कृतयुग येत आहे. प्रत्येक जीवानं इतर जीवांची हत्या न करता त्यांना देवतासमान मानलं आणि त्यांच्याप्रती श्रद्धा ठेवली तर तेच कृतयुग होय. मी असलं कृतयुग संस्थापित करणार आहे. हे वेणुमुदली ! मी तुझ्यासमोर उभा आहे, ओळख मला."

इतक्यात मला एक प्रकारची मूर्च्छा आली. अर्ध्या तासानंतर जेव्हा मी परत शुद्धीवर आलो तेव्हा मला दिसलं की जवळच वेणुमुदली पण मूर्च्छित पडला आहे. त्याच्यावर योग्य ते उपचार करून मी त्याला शुद्धीवर आणले.

वेणुमुदलीनं माझ्या पत्नीला विचारलं की कुळ्ळ स्वामी कुठं आहेत ? ती म्हणाली– " कुळ्ळ स्वामी खाली उतरून आले होते. मी त्यांना थोडी खीर आणि केळं दिलं. खाणंपिणं झाल्यावर त्यांनी मला आणि मुलांना अंगारा दिला आणि आशीर्वाद देऊन निघून गेले. मी त्यांना विचारले की तुम्ही लोक वर बसून काय बोलत होता ? ह्यावर ते म्हणाले, " तो मूर्ख वेणुमुदली माझ्याबरोबर हिंदुधर्मासंबंधी चर्चा करीत होता." असं म्हणत हसता हसता ते निघून गेले.

## अंधकार

आठशे वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. विद्यानगरी नावाच्या शहरात दृढचित्त नावाचा राजा होऊन गेला. वितुष्ट आल्यामुळे त्याच्या बांधवांपैकी काहींनी त्याला त्रास देण्यास सुरुवात केली. एकदा तो आपल्या महालात झोपला होता. शत्रुपक्षाने काही सेवकांना हाताशी धरलं आणि आत घुसण्यात यश मिळविलं. राजाचे हातपाय बांधून त्याला घेऊन गेले. जवळच पहाडी भागात एक गुम्फा होती. राजाला त्या गुहेत सोडलं आणि तो राजा बाहेर येऊ शकू नये म्हणून एक वजनदार शिळा तोंडाशी ठेवली. राजाला कोणतीतरी जडीबूटी हुंगायला देऊन बेहोश करण्यात आले होते, त्याचे डोळे उघडे राहू नयेत म्हणून.

जडीबूटीचा अंमल उतरल्यानंतर राजाने डोळे उघडले तेव्हा त्याला दिसले की त्याचे हातपाय बांधलेले आहेत आणि तो घनदाट अंधकारात आहे. मी कोठे आहे ?... त्याला कळू शकले नाही तो कोठे आहे ते. कुणी अशी दशा केली असावी ह्याचा त्याने विचार केला पण त्याच्या काहीच ध्यानात येईना. उठून उभे राहायचा प्रयत्न केला पण उठता आले नाही. तहानेने गळा सुकून गेला होता. डोळे शिणले होते. हृदयाची कंपने वाढली होती. तो ओरडला, " हे परमेश्वरा ! माझे प्राण घेऊन जाण्याचा निश्चय केला आहेस का ? "

" होय." आवाज आला.

" होय म्हणणारे आपण कोण ? " राजाने विचारले.

" मी यमराज ! तुमचे प्राण घेऊन जायला आलोय्. " अदृश्यवाणी म्हणाली. दृढचित्त म्हणाला, " मी तरुण आहे. माझी पत्नी बुद्धिमती प्रेमळ आहे, सिंहाच्या छाव्यासारखा वीरपुत्र आहे मला. ह्या सर्वांना आणि माझ्या राज्याला सोडून यायला

माझं मन तयार होत नाही. तुम्ही येथून निघून जा. "

अदृश्यवाणीने एक विकट हास्य केले.

" मला केव्हा घेऊन जाण्याचा इरादा आहे ? "–दृढचित्ताने विचारले.

" पहाट होण्याच्या आधी एक प्रहर. "

हे ऐकूनच दृढचित्त हताश होऊन गेला. त्याचं डोकं गरगरू लागलं. हातापायांना कंप सुटला. हृदयाचे ठोके वाढले. तेव्हा त्याला आपली आई जो मंत्र नेहमी जपत असे, आणि जो तिने त्यालाही सांगितला होता, त्याचं स्मरण झालं. त्याची आई मृत्यु-शय्येवर असताना तिने त्याला बोलावून कानात जो मंत्र सांगितला होता, त्या मंत्राचं त्याने स्मरण केलं. तिनं सांगितलं होतं, " पुत्रा ! कितीही मोठी आपत्ती आली तरी ह्या मंत्रोच्चारणाने ती जरूर टळेल. " राजाने तो मंत्र आता उच्चारला. ' करोमि ' ( करतो) हाच तो मंत्र. राजाने ' करोमि, करोमि, करोमि ' असे तीनदा म्हटले.

एक सर्प आला आणि त्याच्या पायाला डसला.

तो किंचाळून म्हणाला, " हे माते ! हेच का तुझ्या मंत्राचे फल ? "

" घाबरू नकोस, मंत्रोच्चार कर. मंत्रोच्चार करीत राहा. मंत्रोच्चार करीत राहा." आवाज आला.

तो आवाज त्याला आपल्या आईच्या आवाजासारखाच वाटला.

' करोमि,' ' करोमि,' ' करोमि '–तो जप करू लागला.

' कर,' ' कर,' ' कर '–आवाज आला.

राजाने ताबडतोब श्वास रोखून धरला आणि अतिमानवी वेगाने हातपाय झटकले. हातकड्या तुटून पडल्या. तलवार काढली. पुन्हा आवाज आला, ' कर ', ' कर ', ' कर '. ज्या बोटाला साप डसला होता ते बोट त्याने कापून टाकले.

' कर ', ' कर ' ' कर.'

शरीरावर जे वस्त्र होते, ते फाडून मातीत ते भरवून त्याने बोटावर पट्टी बांधली. जखमेतून खूप रक्त वाहू नये म्हणून.

आवाजाने आदेश दिला–' कर '.

तलवारीने त्याने बेड्या तोडल्या.

मग पुन्हा शरीर पूर्ववत् शिथिल पडले. थकवा जाणवू लागला. चक्कर आल्यासारखी वाटली. अंगात ताप चढला. तहानेने जीव कासावीस झाला.

" काय करू ? तहान सहन होत नाही."–तो पुटपुटला.

" मंत्रोच्चार कर "–आवाजाने आज्ञा केली.

" करोमि, करोमि, करोमि. "

" कर "–आज्ञा झाली.

" काय करू ? "

" हताश होऊ नकोस. कार्यरत राहा. "

" पण काय करू ?" त्याने पुनश्च विचारले.

" शिळा आहे ना ? त्यावर धडक मार. "

राजा उठला आणि गुहेच्या तोंडापाशी ठेवलेल्या शिळेला जोरात धडक दिली. त्याने विचार केला की डोक्याने ढुशी द्यावी लागली तरी पर्वा करायची नाही. त्याच्यात एवढे साहस संचारले होते. पण डोके मुळीच फुटले नाही. जे लोक गुहेचे तोंड बंद करून गेले होते, ते घाईगडबडीत शिळा तोंडाशी नीट बसवू शकले नव्हते. म्हणून मागून थोडासा धक्का बसताच ती शिळा ढकलली गेली आणि गुहेचे तोंड उघडे झाले. राजाने बाहेर येऊन पाहिले. सूर्य आकाशात तळपत होता. अंधाराचा स्पर्शही नव्हता. ' करोमि,' ' करोमि 'चा जप करत तो आपल्या राजधानीत पोहोचला. त्यानंतर मात्र त्याचा कोणीच शत्रू राहिला नाही.

## कुडमुड्या ज्योतिषी

वेदपुरात एक नवा कुडमुड्या ज्योतिषी आला आहे. डमरू वाजविण्यातील पस्तीस ताल आणि त्या तालांचेही विविध प्रकार तो वाजवून दाखवितो. तालविद्येत तो मोठा निपुण आहे. अनेक कपड्यांचं ओझं अंगावर घेऊन फिरत नाही तो. स्वच्छ पांढरे धोतर आणि शुभ्र कुडता घालतो. डोक्यावर लाल रंगाचे कापड पटक्यासारखे गुंडाळतो. त्या पगडी-कडे पाहिले की वाटते नेल्लूरचे तांदूळच बांधून आणले आहेत. कपाळावर कुंकवासारखं गोल गंध लावलेलं, मोठ्या मिशा आणि झुपकेदार कल्ले. गंभीर चेहेरा आणि गोरा रंग यांच्यामुळे त्याच्या कपाळावरील लालभडक गंध खूप छान दिसते. भरपूर उंची, सतेज, स्थूल शरीर, हैदराबादी चप्पल पायात.

काल सकाळी तो आमच्या गल्लीत आला. त्याने डमरूवर ताल धरला होता. मृदंग वाजविणाऱ्या कलावंतासारखा तालमेल दाखवत होता. मोठा हुशार आहे. डमरू वाज-विता वाजविता तो गाऊ लागला–

डुग डुग डुग डुग डुग––
भाग्याचा दिवस येत आहे, भाग्याचा दिवस येत आहे,
जाती एक होतील, झगडे नष्ट होतील;

म्हण ग म्हण शक्ती महाकाली;
वेदपूर वासियाना शुभ संदेश दे,
दारिद्रय पळून जाईल, संपत्ती पळत येईल;
विद्या वाढेल, पाप मिटेल;
शिक्षित व्यक्ती सांगतात की पाप बोलते खोटे,
पापाचा नाश होतो, हाय, विनाश होतो;
वेदपुराचा व्यापार वाढेल,
उद्योगधंदे वृद्धिगत होतील, मजूर सुखी राहतील,
शास्त्रोन्नती होईल; सूत्राचे ज्ञान होईल;
यंत्रे वाढतील, तंत्रे वाढतील,
मंत्रादि वाढतील......वाढतील
गुड्डु, गुड्डु, गुड्डु, गुड्डु...
साग ग सांग मलैयाळ भगवती;
अंदरी, वीरी, चंडिके, शूली,
गुड्डु, गुड्डु, गुड्डु, गुड्डु...

गच्चीत बसून मी हे गीत ऐकले. गमत वाटली. कुणी नवा कुडमुड्या असेल असे वाटल्यामुळे त्याला थांबण्यासाठी सागितले. तो थाबला. मी खाली उतरून आलो, त्याला जवळ बोलवून विचारले, "कुठला रे तू ?"- तो म्हणाला, "बाबूजी, कुड-मुड्याचा कुठला ठावठिकाणा ? कुठेतरी जन्मला, कुठेतरी पाळलापोसला गेला आणि कुठेकुठे भटकत फिरत आलो."

मी म्हटले, "अरे, मोठा अजबच दिसतो तू. मामुली कुडमुड्या ज्योतिष्यासारखा दिसत नाहीस. तुझी हकीकत जरा विस्ताराने सांग बघू. तुला भारीपैकी जरीचे काठ असलेलं धोतर देईन."

कुडमुड्याने सुरुवात केली, "बाबूजी ! मी कुठे जन्मलो मला ठाऊक नाही. आईचा चेहरासुद्धा आठवत नाही. बापाचा पेशाही हाच आहे. ते दाक्षिणात्य आहेत. मी जेव्हा दहा वर्षांचा होतो ना तेव्हा माझ्या बापानं मला तंजोरला नेलं आणि तिथं तेच देवी-रोगाचे बळी ठरले. तेव्हापासून मी हाच व्यवसाय करून पोट भरतोय्. नाना ठिकाणी हिंडतहिंडत शेवटी हैदराबादला पोहोचलो. मी त्यावेळी वीस एक वर्षांचा असेन. तिथं जॉन्सन नावाच्या एका गोऱ्या साहेबाला भेटलो. ते कोणत्यातरी कंपनीचे एजंट होते. मोठा भलामाणूस होता. आपल्या देशाच्या देवदासींना, नाचतमाशा दाखविणाऱ्यांना, विदूषकांना, जादूगारांना पगार देऊन त्यांना घेऊन तो कंपनी युरोपात नेऊन तिथल्या विविध देशात आपले तंबू लावून खेळतमाशा दाखवीत असे. प्रारब्धच म्हणायचं की मी

ह्या कंपनीत घुमलो. जॉन्सन साहेबाच्या कंपनीबरोबर मी इंग्लंड, फ्रान्स इत्यादी देशात जाऊन आलोय्. अमेरिकेलासुद्धा गेलो होतो. दोन वर्षांपूर्वी महायुद्धाला सुरुवात झाली आणि कंपनी बंद पडली. आम्हा सर्वांना पैसे देऊन हिंदुस्थानात पाठविण्यात आलं. मरेपर्यंत पोटापाण्याची चिंता नाही. तेवढे पैसे साठलेले आहेत. परंतु पिढीजात चालत आलेला व्यवसाय सोडण्यास मन तयार होत नाही. त्यायाला धरूनही ते होणार नाही, असा विचार करून हिंदुस्थानात आल्यावर अशा प्रकारे गावोगाव फिरत राहतोय्.

युरोपच्या देशात फिरत असताना इतरांप्रमाणे वेळ फुकट न दवडता मी तिथल्या भाषाही थोड्याफार शिकून घेतल्या. इंग्रजी बऱ्यापैकी येते मला. अजूनही काही भाषा थोड्याफार प्रमाणात येतात मला. बरीच पुस्तकेही वाचली आहेत. हिंदुस्थानात परतलो तेव्हा वाटू लागलं की कितीतरी बाबतीत आपण मागासलेले आहोत. मला आपला पिढीजात व्यवसाय करीत गावोगावी फिरून तिथल्या लोकांना आपल्या परीनं जितकं होईल तितकं सम्यक् ज्ञान द्यायचं, देशाच्या उन्नतीसंबंधी शिकवायचं असा मी निश्चय केला आहे. हेच माझं ध्येय आहे,"

मागच्या दिवाळीला जे धोतर खरेदी केले, चांगल्या कापडाचे होते ते. मी ते जरीकाठी धोतर त्याला देऊ केले 'छे छे. बाबूजी' म्हणत तो पुन्हा डमरू वाजवत निघून गेला.

> गुडु, गुडु, गुडु, गुडु……
> बाबू लोकांची हिम्मत वाढेल,
> आळस कमी होईल, तरतरी वाढेल,
> अष्ट लक्ष्मी, सुखसंपत्ती वाढवील,
> भयनाश होईल, पाप धुऊन जाईल,
> शास्त्राचरण होईल, जातिभेद नष्ट होतील,
> डोळे उघडतील, न्यायधर्म दिसतील,
> जुना वेडेपणा, झट्कन् निघून जाईल.
> वीरता वाढेल, उन्नती होईल,
> बोल ग शक्ती ! मलयाल भगवती !
> धर्माचा विजय होवो ! धर्माचा विजय होवो !

कुडमुड्या चालला. त्याच्या पाठीकडे पाहता पाहता, परमेश्वराचे स्मरण करीत मी हात जोडले.

# अर्जुनाचा संदेह

हस्तिनापूरला गुरु द्रोणाचार्यांजवळ पण्डुमहाराजांचे पुत्र आणि दुर्योधनादी कौरव विद्याध्ययन करीत होते तेव्हाची ही गोष्ट आहे. एके दिवशी संध्याकाळच्या वेळेला ते लोक शुद्ध हवा खात होते, तेव्हा अर्जुन कर्णाला म्हणाला, "हे कर्णा ! बोल युद्ध श्रेष्ठ की शांतता." (ही महाभारतातील एक उपकथा आहे. खरी आहे. कपोलकल्पित नाही).

कर्ण म्हणाला, "शांतताच श्रेष्ठ !"

अर्जुनाने विचारले, "का पण ? काय कारण ?"

कर्ण सांगू लागला, "अर्जुना ! अरे, युद्ध असेल तर मी तुझ्याशी लढेन. तुला कष्ट होतील. मी तर दयाळू आहे. तुला होणारे कष्ट मला पाहवणार नाहीत. दोघांनाही दु:खी कष्टी व्हावं लागेल. म्हणून शांतताच श्रेष्ठ."

"कर्णा ! मी हा प्रश्न आपल्या दोघांच्याच संदर्भात विचारला नाही. सर्वसाधारणपणे विचारलं होतं की युद्ध चांगले की शांतता ?" अर्जुन म्हणाला.

"सार्वजनिक बाबतीत मला रुची नाही." कर्णाने सांगितले.

अर्जुनाने मनोमन निश्चय केला की ह्या व्यक्तीला ठार मारलं पाहिजे. अर्जुनाने गुरु द्रोणाचार्यांना हाच प्रश्न विचारला.

द्रोणाचार्य म्हणाले, "युद्धच चांगले."

पार्थाने विचारले, "का ?"

द्रोणाचार्य बोलले, "हे ! विजया ! युद्धात धनप्राप्ती होईल, कीर्ती मिळेल, नाहीतर वीरगती प्राप्त होईल. शांततेत ह्या सर्व गोष्टी अनिश्चित असतात."

नंतर अर्जुन भीष्म पितामहांना भेटला. त्यांना विचारले, "पितामह, युद्ध चांगले की शांती ?" ह्यावर ते गंगापुत्र उत्तरले, "वत्सा अर्जुना ! शांतताच श्रेष्ठ आहे. युद्धामुळे क्षत्रियकुलांना महत्त्व मिळेल पण शांततेमुळे साऱ्या जगाला मोठेपणा प्राप्त होईल."

अर्जुन म्हणाला, "आपलं म्हणणं न्यायसंगत वाटत नाही."

पितामह म्हणाले, "वत्सा ! प्रथम कारण सांग आणि नंतर तुझा निश्चयही सांग."

"पितामह ! शांततेत कर्ण श्रेष्ठ आणि मी निकृष्ट आहे. युद्ध असेल तर सत्य प्रकट होईल."

ह्यावर पितामह भीष्म म्हणाले, "वत्सा, धर्म नेहमीच उन्नत राहील. युद्ध असो वा शांती, धर्माचाच नेहमी विजय होईल. म्हणून मनातून क्रोधादी विकार दूर करून शांतीची इच्छा धर. सारेच मानव तुझ्या बांधवाप्रमाणे आहेत. मानवांनी परस्परांप्रती

प्रेम राखलं पाहिजे. प्रेम हाच तारक मंत्र आहे. त्रिकालाची बाब सांगतोय् मी, प्रेमच तारक आहे." पितामहांच्या डोळ्यातून दोन अश्रू टपकले.

काही दिवसांनंतर वेदव्यास मुनी हस्तिनापुरात आले. अर्जुनाने त्यांच्याजवळ जाऊन आपला प्रश्न पुन्हा विचारला. मुनींनी सांगितले, "दोन्हीही चांगले. काळानुरूप त्यांचा वापर करावा.

काही वर्षांनंतर वनवासाच्या काळात दुर्योधनाकडे दूत म्हणून पाठविण्याच्या वेळी अर्जुनाने कृष्णाला विचारले, "कृष्णा ! तूच सांग- युद्ध बरे की शांतता ?"

कृष्ण म्हणाला, "आता तर शांतता चांगली वाटते. म्हणूनच तर शांततेचा दूत बनून मी हस्तिनापुराकडे चाललो आहे."

## लिंबाचे झाड

वसंत ऋतूत एके दिवशी प्रातःकाळीच मलयगिरीपर्वताच्या झाडीझुडुपातून एकटाच हिंडत होतो. बराच काळ हिंडल्यानंतर शरीर थकून गेले. विश्रांती घेण्याच्या इरादाने एका बागेत जाऊन लिंबाच्या झाडाखाली मी पहुडलो. मलयावरून येणारा वारा आल्हाददायक वाटत होता. थोडयाच वेळात माझे डोळे आपोआप मिटले गेले. मी निद्रादेवीच्या अधीन झालो. तेव्हा जे अपूर्व स्वप्न पाहिले तेच लिहून काढीत आहे.

निद्रिस्तावस्थेत असलेल्या माझ्या कानात, "मनुष्यप्राण्या, अरे मनुष्यप्राण्या ! अरे ऊठ ! ऊठ !" असा अमानवी आवाज घुमला. मी आवाज ऐकताच उठून बसलो. जागृत अवस्थेत नाही हं ! ती स्वप्नातीलच जागृतावस्था होती.

विचारले, "कोण आहे ते ?"

"मी हे लिंबाचे झाड. मीच तुला हाक मारली. ऊठ." उत्तर आले.

मी विचारात पडलो. "कुणास ठाऊक हा कोण आहे ? भूत, पिशाच्च असेल किंवा यक्ष, गंधर्व, किन्नर यांपैकीही आदिदेवता असेल. वनदेवतासुद्धा असेल. अन्यथा लिंबाचे झाड कसे बोलेल ? छे छे, भूतपिशाच्च या भाकड कल्पनाच आहेत. खरं तर माझे डोळेही उघडले नव्हते. स्वप्नास्वप्नात होतो ना मी. हा आवाज तर स्वप्निल अवस्थेतच कानावर पडला. हा नक्कीच काल्पनिक आहे," असा विचार करत होतो, तोच पुन्हा आवाज आला, "हे मानवा, अरे मानवा, ऊठ."

मी पुन्हा विचारले, "तू आहेस तरी कोण ?"

" मी आहे लिंबाचे झाड. माझ्याच सावलीत तू पहुडला आहेस. तुला काही विशिष्ट गोष्टींची समज देण्यासाठीच उठवत आहे. "

विचार केला, शेक्सपिअरने म्हटलेच आहे की जगात अशा अनेक गोष्टी आहेत की ज्यांचे ज्ञान आपल्याला नाही. कदाचित् वृक्षांकडेमुद्धा बोलण्याची शक्ती असेल आणि मला मात्र ते ज्ञान नसेल कदाचित्. ठीक आहे. ह्या झाडाबरोबर संभाषण करून आना-पर्यंत ज्ञात नसलेल्या गोष्टीचे ज्ञान करून घेऊ." मी डोळे उघडून उभा राहिलो.

(खरं तर मी उठलो नव्हतो. स्वप्नात असे वाटले की मी उभा आहे.) मी विचारले, " हे लिंबवृक्षा ! तुला ही मानवी भाषा कशी अवगत आहे ? मानवासारखं तोंड, गळा, टाळू, जीभ, दात, ओठ असल्याशिवाय मानवी भाषा उच्चारणे असंभवनीय आहे की नाही ? आमच्या मानवजातीतही ज्यांचे दात पडले आहेत त्यांचे उच्चार स्पष्ट नसतात. गळ्यात पडजीभ नसेल तर ते मुके होतात. अशा परिस्थितीत मानवाचे शरीर धारण केल्याशिवाय तू मानवी भाषा कशी बोलू शकतोस ?"

लिंबवृक्षाने उत्तर दिले, " ऐक ! मनुष्यमात्राला केवळ एकच मुख असते. परंतु माझे सारे शरीरच मुखमय आहे. मानवी भाषा बोलायला मनुष्यमात्रासारखे मुख वगैरे बाह्येंद्रियांची आवश्यकता असते असे तुम्ही समजता. साधारणतः ती आवश्यकही असतात. परंतु मी साधा वृक्ष नाही. मी नर अगस्त्यमुनीचा शिष्य आहे. अगस्त्यमुनी-शिवाय माझ्याइतकं तमिळभाषेचं ज्ञान दुसऱ्या कुणालाही नाही."

लिंबाचा वृक्ष पुढे बोलतच राहिला. " गतगोष्टी आरंभापासून सांगतो. ऐक. ध्यान देऊन ऐक. माझं वय आता तीस वर्षांचं आहे. मी युवावृक्ष आहे. तरुण आहे. पंधरा वर्षांपूर्वीची गोष्ट आहे ही. वसंत ऋतू होता. रात्रीची वेळ. थंडगार चांदणं चोहो-बाजूस पसरलं होतं. मी जागाच होतो. साधारणतः वनस्पतीसुद्धा मानवाप्रमाणे दिवस-भर जाग्या राहतात. रात्र होताच डुलक्या काढू लागतात. परंतु त्या रात्री का कुणास ठाऊक मला झोप आली नाही. निळे आकाश, चंद्र आणि चारी बाजूला पसरलेली वनराजी पाहात मी एका अलौकिक आनंदात मग्न होतो. तेव्हा षोडशवर्षीय एक सुंदर युवक आणि बारावर्षीय लावण्यवती युवती यांना नदीत जलक्रीडा करताना मी पाहिलं. थोड्याच वेळात मला कळलं की ते दोघेही साधेसुधे मनुष्यजीव नव्हेत. कारण पंख नसतानाही त्यांना अवकाशात उडताना, क्रीडा करताना मी पाहिलं, त्या दोघांचं बोलणं ऐकलं आणि ध्यानात आलं की ते कोण आहेत. ते दोघे होते, अगस्त्यमुनी आणि ताम्रवर्णीदेवी. ( ताम्रवर्णी तामिलनाडूची एक पवित्र नदी आहे ) सर्वसाधारणपणे अगस्त्यमुनी अंगठ्याइतकं छोटं रूप धारण करून असतात. ते कामरूपी आहेत. अर्थात् पाहिजे तेव्हा पाहिजे ते रूप धारण करू शकतात. ताम्रवर्णीदेवीसुद्धा वाटेल ते रूप घेऊ शकते. म्हणून ती दोघे अतिसुंदर मानुष्यमात्रांचे रूप धारण करून क्रीडा करत होती.

त्यांची क्रीडा सूर्योदयापर्यंत चालली होती. त्यानंतर ताम्रवर्णीदेवी अदृश्य झाली."

लिंबवृक्ष पुढे म्हणाला, "ऐक मानवा ! दिवसाचा प्रकाश दिसताच ताम्रवर्णी देवी अदृश्य झाली. एकटे अगस्त्यमुनी इथं आले आणि आता तू जिथं उभा आहेस तिथं लवंडून योगनिद्रेत लीन झाले. त्यावेळी मी अगस्त्यमुनींचा महिमा आणि यांची शक्ती पुरेपूर जाणून नव्हतो. त्यामुळे ते योगनिद्रेत आहेत हे मी समजू शकलो नाही. मी विचार केला की जलक्रीडा केल्याने श्रांत होऊन ते निजले असावेत. पहाट होऊन एखादा प्रहर लोटला असावा. ते पाहा ! तुझ्यासमोर एक चिंचेचे झाड आहे ना ! त्या झाडाखालच्या एका बिळातून फूत्कार टाकीत एक सर्प बाहेर आला आणि जिथं अगस्त्यमुनी निद्रा घेत होते त्या दिशेने निघाला. हे पाहताच मी घाबरलो. हा विषारी सर्प ह्या महान् तपस्वीना डसणार तर नाही ना ! कुठल्याही प्रकारे त्यांची झोपमोड केली तर ते आपल्या तपोबलाने त्याला वश करून घेतील असा विचार करून त्यांना जागे करण्यासाठी त्यांच्यावर पानांचा वर्षाव केला. पण त्यांना जाग आलीच नाही. सर्प त्यांच्या अगदी जवळ येऊन दोनदा आपला फणा उभारून होता. इतक्यात त्यांचे डोळे उघडले. त्यांनी सर्पाला अगदी अलगद उचललं — जणू काही तो एक दोरखंडच होता— आणि आपल्या गळ्याभोवती त्याला लपेटलं. तो सर्पसुद्धा एकदम शांत होऊन दोरखंडासारखा त्यांच्या मानेभोवती राहिला. जेथे तो डसला होता. तेथून रक्त ठिबकत होतं. मुनींनी थोडी माती घेतली आणि जखमेवर लावली. बघता बघता जखम भरून आली. हे पाहून मला मोठंच आश्चर्य वाटलं. मला ह्या गोष्टीचं वाईट वाटलं की इतक्या महापुरुषाशी दोन शब्द बोलण्याचं सौभाग्य मला नव्हतं. मी होतो वाचाहीन जड वृक्ष. तरीसुद्धा आपली श्रद्धा प्रकट करण्याच्या इराद्याने मी त्यांच्या चरणकमलांवर पुष्प आणि पत्र यांचा वर्षाव केला. त्यांनी मुख वर करून माझ्याकडे पाहिलं आणि म्हणाले, 'हे, लिंबवृक्षा !'

"ऐक मानवा ! ध्यान देऊन मी काय सांगत आहे, ते ऐक ! अगस्त्यमुनींनी मला संबोधताच आपोआपच माझ्या शाखारूपी मुखांतून 'मुनिवर ! काय आज्ञा आहे ?' असे शब्द तमिळभाषेत बाहेर पडले. माझं रोमरोम पुलकित होऊन उठलं. मी जन्मांत्रित होण्याचं मर्म जाणलं. आता मी लिंबवृक्ष राहिलो नसून मला मानवजन्म प्राप्त झाला आहे. शरीर बदललं नाही. जड शरीर बदललं न बदललं काय फरक पडणार आहे ? मी शरीर नाही. मी आत्मा आहे. मी ज्ञान आहे. मी बुद्धी आहे. एकाएकी लिंबवृक्षाची चित्तवृत्ती बदलून मानवी चित्रवृत्ती माझ्यात संचारल्या. मानवी चित्तवृत्ती माझ्यात न येती तर मानवी भाषा मी कशी बोलू शकलो असतो ? कोटयवधी जन्मानंतर मला जी फलप्राप्ती झाली असती ती ह्या महान कृपाप्रसादानं एका क्षणार्धात मिळाली. मी अत्यानंदानं त्यांच्या चरणांवर असंख्य फुलं आणि

पानं यांचा वर्षाव केला. खूष होऊन मुनी म्हणाले, ' हे लिंबवृक्षा ! काल मी जेव्हा रामानदीत ताम्रवर्णीबरोबर जलक्रीडा करत होतो, तेव्हा तू आम्हाला पाहून प्रसन्न झालास आणि आम्हाला आशीर्वाद दिलेस. मी सर्व ज्ञानदृष्टीनं जाणलं होतं. काही वेळापूर्वी मी जेव्हा योगसमाधीत होतो, तेव्हा ह्या सर्पाला येताना पाहून, माझं संरक्षण करण्याच्या हेतूने मला जाग आणण्यासाठी पानाफुलांचा माझ्यावर वर्षाव केलास. तू माझ्याशी जो स्नेह आणि श्रद्धा दाखविलीस त्याच्या मोबदल्यात मी तुला ऋषिबोध देऊ इच्छितो. याच्या योगाने तुला समस्त जीवाणूंच्या भाषांचं ज्ञान स्वभावतः प्राप्त होईल. हो, सर्व जीवजंतूंमध्ये स्वतःला पाहण्याची देवदृष्टी तुला प्राप्त होईल. तू जीवनमुक्त होशील. '

" हे मानवा ! ऐक ! मुनींच्या आशीर्वादानं त्या दिवशी त्यांनी दिलेल्या सर्व शक्ती प्राप्त करून, निश्चिंत होऊन जीवनमुक्त झाल्यासारखा आपले दिवस व्यतीत करत आहे. "

लिंबवृक्षाचं बोलणं ऐकून मीही त्याला दंडवत घातला. वृक्षाने विचारले, " बोल ! तुला काय पाहिजे ?" मी सांगितले, " ज्याप्रमाणे अगस्त्य मुनी तुला गुरुतुल्य आहेत तसा तू माझा गुरू हो. त्यांनी तुझ्यावर जशी जीवनमुक्त होण्याची कृपा केली तशीच कृपा तू मजवर कर अशी माझी विनंती आहे. "

लिंबवृक्ष म्हणाला, " तथास्तु ! "

आतापर्यंत माझी पूर्णपणे झोप झाली होती. मी उठून उभा राहिलो. चिमण्या, पोपट, मैना अशाप्रकारचे नाना रंगीबेरंगी पक्षी चिवचिवाट करत खेळत होते. खारी, सरडे इकडे तिकडे पळत होते. कावळे, घारी, गरुड, भ्रमर, कृमिकीटक, पतंग आदी कितीतरी प्रकारचे जीवाणू ह्या जीवनसागरात रंगरेली खेळत, रमतगमत, भटकत होते. दुरून कोठून तरी कोकिळ-कोकिळा प्रेमगीत गात होते.

कोकिळ गात होता—

तूच, तूच, तूच
तूच, तूच, तूच
राधे ... ग !

कोकिळा गात होती—

तूच, तूच, तूच
राधा कृष्ण, कृष्ण कृष्ण रे... !

लिंबवृक्ष आपल्या हिरव्यागार शाखा हलक्या हलक्या रीतीने हलवीत होता. मी विचार केला, " अरेच्चा ! काय आश्चर्यजनक स्वप्न पाहिलं मी !" उन्हाचा ताप वाढू लागला होता. भूकही चांगलीच लागली होती. लिंबाच्या वृक्षाला नमस्कार करून मी घराच्या दिशेने चालू लागलो.

# कांतामणी

" कांतामणी, तुझ्या वडिलांचं नाव काय बरं ? " आजीने विचारले. विहिरीच्या रहाटापाशी गप्पा चालल्या होत्या. उन्हाळ्याचे दिवस होते. सुप्रभाती आकाशावर आपल्या किरणांचे जाळे फेकून अरुणाचल विजयोन्मादाने हसत होता. समोर होता नीलपर्वत. हिरवीगार वृक्षवल्ली. चरणाऱ्या गाई. नाना लोक. काही गाढवंसुद्धा. आंग्ल कवी शेलीने म्हटले आहे की सूर्यकिरणे पडताक्षणी प्रत्येक वस्तू तेजस्वी होते. सुंदर दिसू लागते. मला तर प्रत्येक क्षणी, प्रत्येक वस्तू सुंदर दिसत असते. तरीही सूर्योदयाच्या समयी मानवीजीवन तरतरीत आणि उत्साहित असल्यामुळे सुप्रभाती सारे जग आल्हाददायक झालेले असते.

बागेच्या मधोमध विहीर होती. अरली, नवमल्लिका आणि गुलाबाच्या फुलझाडांनी बगिच्याचे सौंदर्य वृद्धिगत झाले होते. बागेच्या आसपास गल्लीबोळात राहणाऱ्या स्त्रिया विहिरीतून पाणी काढण्यासाठी येत असतात.

ज्या दिवसापासून ही कहाणी सुरू होते, त्यादिवशी सकाळी कांतामणी आणि तिच्या आजीशिवाय एक अंध वृद्धही तेथे होता. विहिरीतून पाणी उपसून स्नान करण्यास आरंभ केला होता. तसेच पोलिसाच्या नोकरीतून पदच्युत झालेले पार्थसारथी अय्यंगार जे सारा दिवस गावभर भटकत आणि संध्याकाळी मात्र रामनामाचा जप करीत तेही एका बाजूला उभे राहून आजीकडे निरखून पाहात होते.

विहिरीच्याजवळ एक मोडकळीला आलेली झोपडी आहे. तिच्या मागे आहे लिंबाची बाग. तिथे जडीबूटी भरपूर आढळते. मला एका साधूने सांगितले होते की तेथे अशीही एक वनस्पती आहे की जी खाल्ल्यामुळे भूक वाढते. ती वनस्पती तोडण्यासाठीच मी बागेत गेलो होतो. आकाशात चिमण्या चिवचिव करीत होत्या. कावळे कावकाव करीत होते. साऱ्या अवकाशात पक्ष्यांच्या आवाजाचा किलबिलाट होता. समोर एखाद्या स्वर्गीय पुतळ्याप्रमाणे दिसणारी कांतामणी उभी होती.

आजीने विचारले, " तुझ्या वडिलांचे नाव काय ? "

" पार्थसारथी अय्यंगार, " कांतामणीच्या मधुर आवाजात उत्तर आलं. जणू काय मधुर बासरीचाच आवाज तो. त्या वृद्धेने पोलीस अय्यंगारकडे असा जळजळीत कटाक्ष टाकला की त्यामुळे पार्थसारथी अय्यंगारचे हातपाय कापू लागले. पिकलेले केस आणि सुरकुतलेला चेहरा पाहता त्यांचे वय नव्वदीच्या आसपास वाटत होते पण शरीर मात्र अठरा वर्षांच्या शिपायाप्रमाणे धट्टकट्ट होते. असं ऐकलं होतं की वाघाची शिकार करण्यात ते तरबेज होते. त्यानी स्वतःच कितीतरी वेळा मला सांगितले होते की फूत्कार टाकणाऱ्या सर्पाचेसुद्धा त्यांना भय वाटत नाही. अशा शूरवीर पार्थसारथी

अय्यंगारना एका वृद्धेच्या केवळ दृष्टिक्षेपाने घामाघूम होताना पाहून मोठे आश्चर्य वाटले.

वृद्धेने पार्थसारथी अय्यंगारांच्याकडे अंगुलीनिर्देश करीत म्हटले, " मग हा जो ब्राह्मण उभा आहे, तोच तुझा पिता आहे तर ? "

दोन्ही हात आकाशाकडे उंचावून, आकाशवाणीलासुद्धा लज्जा वाटेल इतके मोहक स्मित करून कांतामणी म्हणाली, " छे, छे ! हे तर किती काळेकुट्ट आहेत, माझे पिता अगदी गोरेपान आहेत. लिंबाप्रमाणे चमकणारी कांती आहे त्यांची आणि हे तर बहिरे वृद्ध ! माझे वडील तरुण आहेत ! "

तेव्हा पोलीस अय्यंगारने कांतामणीकडे पाहात विचारले. " तुझे वडील कुठे काम करतात ? "

" माझे वडील शंकरनाथन् कोईलचे सब् इन्स्पेक्टर आहेत, " कांतामणी उत्तरली.

अय्यंगारने आपली मान खाली घातली. सर्पाला विजेचा कडकडाट जितका भयंकर वाटतो, तितकाच ' सब् इन्स्पेक्टर ' हा शब्द हल्ली त्यांना भयंकर वाटतो. इकडे आजी आणि कांतामणी यांच्यात बोलणे सुरूच होते.

" तुला भाऊ-बहिणी किती ? " आजीने विचारले. कांतामणी म्हणाली, " माझी अठरा वर्षाची एक बहीण आहे. गेल्याच महिन्यात ती आपल्या सासरी गेली. श्रीवैकुंठम-मध्ये राहते ती. पुढच्या महिन्यात माझीही ' पाठवणी ' होणार आहे. माझी धाकटी बहीणही लग्नाची झालीय्. आम्ही एकंदर तीन मुली. माझ्या वडिलांना पुत्र नसल्याने फार चिंता वाटते. काय करणार ? परमेश्वराची कृपादृष्टी असती तर असले दिवस पाहायला लागले नसते. ते मुलाचे पिता झाले असते. वडिलांनी जन्मकुंडली दाखविली. कुण्या दुष्ट ज्योतिष्याने सांगितले की माझ्या आईला पुत्रसंभव नाही. त्या दुष्टाच्या बोलण्याला वेदप्रमाण मानून माझा पिता, तो दुर्गुणी ब्राह्मण, पुढच्या महिन्यात मन्नारकोईलमधल्या दुसऱ्या कुणा बाईबरोबर लग्न करणार आहे. मुहूर्तपण काढून झालाय्. "

" मन्नारकोईलमध्ये तुझ्या बापाला मुलगी देणाऱ्याचं नाव ? " आजीबाईची पुन्हा पृच्छा.

" त्याचं नाव आहे गोविंदराज अय्यंगार. म्हणतात की बडा मिरासदार आहे. त्याचीच एकुलतीएक लेक माझी छोटी आई बनणार आहे. असं म्हणतात की ती अप्सरा-रंभासारखी सुंदर आहे आणि शिवाय डोक्यापासून पायापर्यंत नखशिखान्त दागिन्यांनी मढविली आहे. "

आजी म्हणाली, " अशा रूपवान, धनवान बेटीला द्वितीय पत्नी म्हणून देण्याचं कारण काय ? "

" त्या मुलीनं यौवनात पदार्पण करून तीन वर्षं झाली. तिच्या मातेचा मृत्यू झाला. रंगढंगात तर ती मेमसाहेबापेक्षा कमी नाही. म्हणूनच तर आतापर्यंत तिच्याशी विवाह करण्यासाठी कुणी आला नाही. कन्या मोठी झाली ही बाब एकदम गौण आहे असं म्हणून माझा पिता तिच्याशी विवाह करायला तयार झाला. खरं तर इतकी शहाणी मुलगी पत्नी म्हणून मिळत आहे यावरच ते खूष आहेत. आज सकाळीच माझे आई-वडील ह्या विषयावर चर्चा करत होते. आम्ही मंडळी ह्या गावाच्या धर्मशाळेत उतरलो आहोत. येऊन एक आठवडा झाला असेल. माझ्या आईनं सांगितलं, ' सर्व गाव एक-मुखानं बोलतंय् की त्या मन्नारगुडीच्या मुलीला वयात येऊन तीन वर्षे झालीत. ' ह्यावर पिताजी म्हणाले, ' म्हणून काय झालं ? ती मुलगी वयात आली आहे म्हणून मला द्विगुणित आनंद वाटतो. आपल्याला पैसा मिळेल. पुत्रप्राप्ती होईल. मुलगीसुद्धा सामान्य नाही. खूप सुंदर आहे. आय डोंट केअर अ डॅम अबाऊट शास्त्राज्. मी शास्त्राला कस्पटासमानसुद्धा लेखत नाही.' " —कांतामणी बोलत होती.

ह्या दोघांचे संभाषण मी ऐकत तर होतो परंतु माझी नजर सारखी पार्थसारथी अय्यंगारकडे लागली होती. त्याना पाहता पाहता एकाएकी माझ्या मनात एक विचार आला. तिथे उपस्थित असलेल्या मंडळीत केवळ कांतामणी अपरिचित होती, पार्थ-सारथी अय्यंगार आणि ती वृद्धा ह्या दोघांना मी ओळखत होतो. वृद्धा ब्राह्मण जातीची नव्हती, स्मार्त ब्राह्मणी होती. गावच्या मुन्सिफाची बहीण होती. मी असे ऐकले होते की यौवनात पार्थसारथी अय्यंगार आणि मुन्सिफाची ही बहीण यांचे एकमेकांवर प्रेम बसले होते. ह्या प्रेमप्रकरणामुळे अय्यंगार आणि मुन्सिफ हा दोघांत बऱ्याच वेळा खटके उडत आणि अशाच एका चकमकीत पार्थसारथी अय्यंगारच्या एका डोळ्याला जखम होऊन तो फुटला होता. ह्या भूतकालीन घटनेचे स्मरण होताना आणि त्या स्त्रियांचे संभाषण कानावर पडत असताना मी तेथे उभ्या असलेल्या अय्यंगारच्या चेहऱ्यावरील हावभाव टिपले. यावरून एका गोष्टीचे स्पष्टीकरण झाले. ती गोष्ट अशी की पार्थसारथी अय्यंगार जणू त्या वृद्धेला सुचवू इच्छित होते की तिच्यावरील त्यांचे प्रेम अजूनही कमी झालेले नाही. ते तेवढेच आहे. तसंच कांतामणी-सारखी रमणी तेथे उपस्थित असूनही ती वृद्धाच अधिक आकर्षक आणि रमणीय दिसते. परंतु मला मात्र वाटले की त्यांच्या हावभावात देखावा अधिक होता, प्रामा-णिकपणा कमी होता.

कारण ज्या ब्रह्मदेवाने आपल्या हातांनी कांतामणीची आणि त्या वृद्धेची निर्मिती केली, तोसुद्धा कांतामणीच्या सान्निध्यात त्या वृद्धेकडे दुर्लक्ष करील. अशा स्थितीत ह्या पोलीस अय्यंगारला तिथे उभे राहून तिच्याकडे निरखून पाहताना, प्रेमविह्वल होताना पाहून आणि तिची नजर आपल्याकडे आकर्षित करण्याचा प्रयत्न करताना पाहून

माझ्या स्वतःच्या डोळ्यांवरसुद्धा माझा विश्वास बसेनासा झाला. ह्यात अजून एक गोष्ट होती. मी वृक्षाच्या आडून अय्यंगारला निरखून पाहात असतानाच, ती वृद्धा आणि कांतामणीही त्याच्याकडे चोरटा दृष्टिक्षेप टाकीत होत्या. खरं तर स्त्रियांची श्रवणशक्ती सर्पाहून तिखट असते. त्यांची दृष्टी तर गिधाडापेक्षा तीक्ष्ण असते. म्हणूनच पार्थसारथी अय्यंगारच्या हृदयातील भाव जसे मी ओळखले तसे ते भाव ह्या स्त्रियांनीही ताडले होते हे मी त्यांच्या चेहऱ्यावरील भावांवरून जाणले.

तिघांनीही मला पाहिले नव्हते. वृक्षांच्या आड मी उभा होतो ना ! म्हणूनच ते मला पाहू शकले नसावेत.

ह्याच वेळेला तिथे हिंगाचा व्यापार करणारा एक मल्याळी युवक येऊन पोहोचला. त्याचे वय सुमारे वीस वर्षांचे असावे. हिंगाचा व्यापार हाच त्याचा व्यवसाय होता. ह्यापूर्वीही कितीतरी वेळा मी त्याला ह्या गावात व्यापार करताना पाहिले आहे. परंतु त्याच्यासंबंधी विशेष माहिती मिळविण्याचा प्रयत्न केला नव्हता. दिसायला तो मदनाचा पुतळाच होता. सुडौल रूप, काळेशार डोळे, सरळ नासिका, कुरळे केस, डोक्याच्या टोकाला शेंडी. खरंच सांगतो, त्या सुंदर पुरुषाला पाहून माझे मन पण साहजिकपणे त्याच्याकडे आकृष्ट झाले.

तो मल्याळी युवक विहिरीच्या काठावर येऊन बसला आणि त्याने तहान भागविण्यासाठी वृद्धेकडे पाणी मागितले. त्याला पाहताच कांतामणी एकाएकी कंपित होऊन उठली, हे माझ्या नजरेतून सुटू शकले नाही. त्या युवकाने डोळे वर करून एकदा कांतामणीकडे पाहिले मात्र, कांतामणीच्या कमरेवर विसावलेला घडा धडाड्दिशी जमिनीवर पडला. त्या घड्याला वाकून उचलताना कांतामणी सुस्कारा टाकून उद्गारली, "हाय ! काय करू ? बोटातून निसटून घडा पडला. माझी आई तर मला सुळावर चढवील. काय करू आता." तिने एक लांब सुस्कारा सोडला. छातीवरून पदर ढळला. तिची नजर समोरच्या पर्वतराईकडे रोखली होती.

ही कांतामणी त्या मल्याळी युवकावर मोहित झाली आहे, हे तर मी दुरूनसुद्धा ताडले. नंतर चौकशी करताना असे समजले की कांतामणीचे पिताजी पार्थसारथी अय्यंगार खूप दिवस केरळ राज्यात नोकरी करत होते. आणि किशोरावस्थेत असतानाच कांतामणीवर त्या तरुणाची प्रीती बसली होती, जी दिवसेंदिवस उमलतच होती. परंतु सब् इन्स्पेक्टर महाशयांनी धनाच्या लोभाने कंदलापुरम्च्या जमीनदाराचे दिवाण आणि निवृत्त डेप्युटी कलेक्टर कोलमपाढू श्रीनिवासचारीबरोबर ज्यांचे वय पंचावन्न वर्षांचे होते—आपल्या कन्येचा विवाह करून दिला. कांतामणी ह्या श्रीनिवासचारीबरोबर जीवन व्यतीत करायला तयार नव्हती. ह्या साऱ्या गोष्टी मला नंतर कळल्या.

तर ! आता त्या दिवशी विहिरीच्या रहाटाजवळ जे काही घडले ते सांगतो.

कातामणी घडा परत कमरेवर ठेवत "हाय ! काय करू ? माझी आई आता मला शिव्याची लाखोली वाहील," असं पुटपुटत निघून गेली. परंतु ती सरळ धर्मशाळेत–जिथे तिचे आईवडील होते तिथे–गेली नाही. उलटी पश्चिमेकडे गेली. जिथून एक नदी वाहत असे. तहान भागविल्यानंतर तो मल्याळी युवकसुद्धा नदीकिनाऱ्याच्या रोखाने गेला. इतक्यात संध्यावंदन करण्यासाठी उशीर झाला होता म्हणून मीही सरळ घरी परतलो. त्या रात्री गावचे पुरोहित सुंदरशास्त्री माझ्याकडे आले. आल्याबरोबर ओरडले, "ऐकलं तुम्ही ? आश्चर्यजनक घटना घडली ! अगदी आश्चर्यजनक !"

मी म्हटले, "काय झालं ? पहिल्यांदा काय झालं ते तर सांगा. नंतर आरडाओरड केली तरी चालेल."

"धर्मशाळेत शंकरनाथ नकोईलहून आलेले सब् इन्स्पेक्टर गोविंदराज अय्यंगार उतरले आहेत ना ! त्याची एक मुलगी आहे. असं म्हणतात की मोठी लावण्यवती आहे ती. इतकी सुंदर की रंभा, तिलोत्तमा यांच्यासारख्या अप्सरानी हिच्या पायाजवळ बसावं. तिचं नाव आहे कांतामणी. हाय्, नाव घेताच हृदय धडधडू लागलं.... काय रसीलं नाव आहे ! कांतामणी, कांतामणी... "

सुंदरशास्त्री अशा प्रकारे कांतामणीच्या सौंदर्याचं वर्णन करतच राहिले असते पण मी त्यांना मध्येच अडविले, "अच्छा ! काय झालं ते तर बोला !"

"आज सकाळपासून तिला शोधताहेत–पण ती कुठं गेलीय याचा पत्ता लागला नाही. त्याच संध्याकाळी अम्बासमुद्रमहून तार आली की कांतामणीने एका मल्याळी युवकाबरोबर चर्चमध्ये जाऊन विवाह केला आहे."

काही दिवसानंतर अजून एक आश्चर्यजनक घटना घडली. निवृत्त, पांढऱ्या केसांचे पार्थसारथी अय्यंगार आणि विहिरीच्या रहाटावर त्यांचा प्रेमविह्वल दृष्टिक्षेप लाभणारी ती वृद्धा हे दोघे रंगूनला पळून गेले. असेही ऐकले की त्या विधवा वृद्धेने आपले केसही वाढवले आणि अय्यंगारला नाट्टू कोट्टै चेट्टियारजवळ नोकरीही मिळाली आहे आणि दोघेही पतिपत्नी होऊन मोठ्या मजेत आपले दिवस व्यतीत करीत आहेत.

## उज्जयिनी—

सम्राट विक्रमादित्याने आपली प्रिया श्रीमुखी हिला म्हटले, " प्रिये ! आम्ही शाक्त-धर्माची दीक्षा घेतली आहे. माझी शक्ती तूच आहेस. तू जर मृत्यू पावशील तर मी सुद्धा तुझ्या चितेवर चढेन." तेव्हा ती म्हणाली, " उज्जयिनीच्या महाकालीच्या कृपे-मुळे आपले आयुष्य हजार वर्षे आहे. आपण चिरायु आहात. मीसुद्धा नऊशेनऊ वर्षे जिवंत राहीन."

" तर मग माझी आयुर्मर्यादाही नवशेनऊ वर्षे म्हणायची–" विक्रमादित्यने एक मोठा सुस्कारा टाकला. श्रीमुखी उत्तरली–

" कांत ! आपण माझे पुत्र आहात ! माझे म्हणणे ऐका ! धर्माची प्रतिष्ठापना नारीकडून झाली आहे. पूजा, तपस्या, व्रतवैकल्य, उपवास, गृह, अन्न, आहार, विद्यालय आदि सर्व काही म्हणजे नारीची देणगी. नारी आपली अर्धांगिनी आहे असं न मानता, ती आपल्या अधीन राहावी, पण तिला आपलाच एक हिस्सा मानणार नाही, प्रेमपूर्वक वर्तन करणार नाही, आपली मानणार नाही, असं पुरुषमात्र चिरकाल बोलत आला आहे. नारी ह्याचाच सूड घेत आहे. ती पुरुषाचा सूड घेऊन स्वतः त्याच दुःखात बुडून नष्ट होते. शिव आणि शक्ती यांच्याप्रमाणे पुरुष जेव्हा नारीला अर्धांगिनी म्हणून स्वीकारतो तेव्हा पुरुषाला शक्तीची साथ मिळते. कलियुगाच्या अंताच्या समयी हेच पूर्णरूपाने सिद्ध होईल."

" तर मग आपली देवी महाकालीचं नाव काय होणार ?" विक्रमादित्याने विचारले.

श्रीमुखी म्हणाली, " महाकालीचे नाव नित्य कल्याणी उज्जयिनी आहे."

" कोण हिचे साक्षी आहेत ?" विक्रमादित्याने विचारले.

" साऱ्या देवदेवता. पंचभूते, मानव, पशू, पक्षी, कृमिकीटक आदि जीवजंतू...सगळे साक्षी आहेत."

" असं ?" म्हणून विक्रमादित्य गप्प बसला.

दुसऱ्या दिवशी दोघेही मंदिरात गेले. तेथे देवीच्या मुकुटावर हीरककणांनी ' नित्य कल्याणी उज्जयिनी ' असं कोंदलं होतं. दोघेही ते पाहून आनंदित झाले आणि त्यांनी देवीची पूजा केली. विक्रमादित्याने आपल्या राजमहालात एक स्तंभ उभा केला आणि त्यावर कोरलं– " नारीचं रक्षण करणं म्हणजेच डोळ्याचं रक्षण करणं. नारी डोळस असते. नारी माता असते."

ह्या कथेचा उल्लेख शाक्त धर्मशास्त्रात आहे. लोककल्याणाच्या भावनेने प्रेरित होऊन मी ती येथे सांगितली आहे.

## सागर—

एक दिवस संध्याकाळी वेदपुरम्च्या समुद्रकिनाऱ्यावर, एकांतात पहुडलो होतो. दिवसभर दूरवर पायी चालत गेलो होतो त्यामुळे आलेल्या थकावटीने झोप लागली. त्यावेळी जे स्वप्न पाहिले त्याचेच वर्णन करतो.

समुद्राच्या मध्यावर एक द्वीप आहे. त्या द्वीपात एक भव्य आणि विशाल राजमहाल, आजूबाजूला सुंदर फुलबाग. त्यात खळखळत वाहणारे दोन निर्झर, निर्झराच्या जवळ हिरव्यागार तृणावर एक षोडश वर्षीय कन्या बसली होती. मला पाहताक्षणीच ती उठून राजमहालाच्या दिशेने पळून गेली. मी तिचा पाठलाग केला. मार्गात एक भलामोठा सर्प लवंडलेला होता. मला पाहताच आपला फणा उभारून मला डसण्यासाठी आला. मी पळू लागलो. तो माझा पाठलाग करू लागला. पळतपळत मी समुद्रकिनारी आलो. सर्प अगदी माझ्या पायाजवळ आला तेव्हा मात्र मी समुद्रात उडी टाकली. समुद्रात होणाऱ्या प्रचंड वादळामुळे लाटा तीन ताडवृक्षांइतकी उंची गाठत होत्या आणि तितक्याच उंचीवरून खाली कोसळत होत्या. कसाबसा मी लाटांतून बचावलो. बऱ्याच काळानंतर लाटा शांत झाल्या. मी पोहतच राहिलो. परंतु किनारा सापडेना. हात इतके थकले की पोहणे दुष्कर झाले. कुलदेवतेचे स्मरण करू लागलो. तेव्हा एक वृद्ध नाव चालवत चालवत माझ्यानजीक आला. त्याला पाहताच मी गयवया पडून म्हटले, " बन्धो ! मला आपल्या नावेत घे. वादळाने मला फार थकविले रे." वृद्धाने मला आपल्या नावेत घेतले. आमची नाव पुढेपुढे सरकत होती. बराच काळ आम्ही नाव चालवत राहिलो, परंतु किनारा काही दिसत नव्हता. मी विचारले, " बन्धो ! सांग, पार पोचायला अजून किती वेळ लागेल ?" वृद्धाने थोडे सातूचे पीठ आणि एक घोटभर पाणी प्यायला दिले. विश्रांती घेणारा मी डुलकी खाऊ लागलो. अर्थात (स्वप्नातली झोप !) जेव्हा डोळे उघडले तेव्हा दिसले—किनारा जवळ येत होता. मला किनाऱ्यावर उतरवून तो वृद्ध परत समुद्राच्या दिशेने नाव वल्हवत निघून गेला.

मी त्याला खूप काही विचारले. परंतु त्याने मात्र एकाही प्रश्नाचे उत्तर दिले नाही. डोळ्यापुढून नाहीसा होईपर्यंत त्याला मी पाहातच राहिलो. नंतर पुन्हा द्वीपाच्या दिशेने निघालो. थोडेसे अंतर चालल्यानंतर पुन्हा तोच राजमहाल दिसला. तीच फुलबाग, तेच निर्झर, निर्झराच्या काठावर हिरव्या गवतात ती मुलगी पूर्वीसारखीच बसलेली होती. मला पाहताच ती परत राजमहालाच्या दिशेने पळू लागली. ह्यावेळी मी तिचा पाठलाग केला नाही. जर पाठलाग केला असता तर तो साप रस्त्यात आडवा आला असता; त्याच्या केवळ कल्पनेनेच मी इतका भयभीत झालो की समुद्राच्या

दिशेने पळू लागलो. पळता पळता अनेक वेळा मागे वळून पाहिले की सर्प आपला पाठलाग तर करीत नाही ना. किनाऱ्यावर पोहोचलो तेव्हा मनात विचार आला की कुठल्याही प्रकारे हे द्वीप सोडून निघून गेले पाहिजे. त्याबरोबर असाही विचार मनात आला की ती मुलगी कोण आहे हे समजल्यानंतरच हे द्वीप सोडायचे. मी खूप थकलेलो होतो, भूकही भरपूर लागली होती. म्हणून खायला काही मिळेल तर बरं होईल ह्या आशेने चारीबाजूला नजर टाकली. किनाऱ्याकिनाऱ्याने खूप दूरवर चालत राहिलो. इतक्यात समोर एक झोपडी दिसली. मी झोपडीत शिरलो. झोपडीत विघ्नेश्वराची एक मूर्ती ठेवलेली होती. त्या दगडाच्या मूर्तीसमोर एका पत्रावळीवर भात, भाजी, खीर, पक्वान्न वाढून ठेवलेले होते. जवळच एका घड्यात पाणी, फुले, चंदन इत्यादी पूजेची सामग्री होती. मी भुकेने बेजार झालो होतो. मी विचार केला की वाढून ठेवलेले अन्न खाऊ या. असाही विचार मनात आला की मागच्या जन्मी मी कोणते पाप केले होते कुणास ठाऊक, ज्याच्यामुळे या निर्जन द्वीपावर भटकावे लागत आहे. आता पोटाची आग विझविण्यासाठी पूजेसाठी ठेवलेल्या वस्तूंचे अपहरण केले तर पापाचे ओझे आणखीनच वाढेल. म्हणूनच निश्चय केला की असले काम कधीही करणार नाही. परंतु भूक सहन करता येईना. विचार केला की स्वतःच पूजा करावी, नैवेद्य दाखवावा आणि नंतर तो खावा. स्नान करण्यासाठी जागा शोधत बाहेर आलो. थोडे दूर आल्यानंतर एक छोटासा निर्झर दिसला. त्याच्या पाण्यात स्नान करून, संध्यादी नित्यनैमित्यिक कर्म आटोपून परत झोपडीत आलो तो काय आश्चर्य ! झोपडीत तर केवळ विघ्नेश्वराची मूर्तीच होती. भात, भाजी, खीर, वडे, फूल, चंदन...काहीही दिसत नव्हते. माझी निराशा कशी वर्णावी ? " हे विघ्नेश्वरा ! वेदपुरीत परतताच तुझ्या चरणी तेहेतीस नारळ अर्पण करीन. पण ह्या संकटाच्या वेळी माझी मदत कर," अशी प्रार्थना केली.

येथेच माझे स्वप्न भंग पावले. नीटसे आठवणीत राहिले नाही. बऱ्याच ठिकाणी गडबडही झाली. वाटले, मी पुन्हा समुद्रावर तरंगत आहे आणि युगप्रलयच होत आहे जणू काही माझे हातपाय थंड पडले. डोळ्यांपुढं अंधार पसरला. शुद्धच हरपली. वाटू लागले की वाऱ्याचे झोतच्या झोत समुद्राच्या पाण्यातून थेंबथेंब अलग करत आहेत. वादळी वाऱ्यामुळे माझे शरीर चेंडूप्रमाणे हेलकावत होते. मी पुन्हा कुलदेवतेचे स्मरण केले आणि विघ्नेश्वराची प्रार्थना केली–" हे विघ्नेश्वर ! मला वेदपुरीच्या किनाऱ्याला पोचवशील तर तीन हजार तीनशे नारळ तुला अर्पण करीन. माझे रक्षण कर, माझे रक्षण कर." थोड्या वेळाने वादळ शांत झाले. एक नाव माझ्या दिशेने येताना दिसली. नाव वर्णनातीत होती. मयूराच्या आकाराची. सुवर्णरंगाची ती नाव राजहंसाच्या मस्त चालीत तरंगत माझ्याजवळ आली तेव्हा मला दिसले की एक

योद्धा त्या नावेत बसला आहे. अग्नीच्या तेजाप्रमाणे त्याचा चेहेरा तळपत होता. नावेला पाहताच मी हात जोडले. त्याने नाविकाला आज्ञा दिली की मला नावेत घेतले जावे. नाविकाने मला नावेत घेतले. नावेत पाऊल टाकताच माझा शारीरिक आणि मानसिक सारा थकवा पळून गेला. स्वतःकडे पाहिले तेव्हा दिसले की मी स्वतः राजशाही पोशाखात होतो. हो, मी सोळा वर्षांच्या किशोराप्रमाणे दिसत होतो. नावेत जो योद्धा बसला होता, त्याच्या हातात शूलाप्रमाणे तीक्ष्ण हत्यार होते.

आता मात्र माझे डोळे उघडले. आजूबाजूला पाहिले तर वेदपुरीचा समुद्र किनारा होता. सायंकाळची वेळ होती. किनाऱ्यावरील वाळूत मी पहुडलो होतो.

माझ्या डोळ्यांवर माझा विश्वास बसेना. खूपदा डोळे चोळून पाहिले. तेव्हा ध्यानात आले की ते द्वीप, ते वादळ... सर्व काही स्वप्न होते. त्या द्वीपात मला पाहून पळून गेलेली मुलगी मात्र नजरेसमोर दिसत होती. नावेत बसलेल्या योद्धयाचा चेहराही आठवत होता... शेवटी मी घरी परतलो.

वेदपुरीत ' मौन स्वामी ' नावाचे एक साधू माझ्याबरोबर राहतात. त्यांना माझ्या स्वप्नाची सारी हकीकत सांगून विचारले की ती मुलगी कोण असावी ? त्यांनी सांगितले, " कुणी तुमचे रक्षण केले हे तुम्हाला कळले नाही. त्या मुलीचे तुमच्यावर प्रेम बसले होते. दुसऱ्यांदा नावेत जो योद्धा दिसला त्याच्या हातात शूलासारखे आयुध पाहिले होते ना ! तेच तुम्हाला त्या मुलीसारखे वाटले. चिंतासागरात ज्या मुलीने तुम्हाला बुडविले तिनेच शूलायुधाचे रूप घेऊन तुमचे रक्षण केले."

मी ओळखले की शक्तिदेवता हीच शूलायुध आहे. तीच आमची सच्ची साथीदारीण आहे. शक्य तितक्या लवकर एक शुभतिथी हुडकून वेदपुरीत प्रतिष्ठापित असलेल्या विघ्नेश्वराला तीन हजार तीनशे नारळ अर्पण करावयाचे, असा निश्चय मी केला.

## तलवारीचे युद्ध

मार्गशीर्ष महिन्याचा शेवटचा आठवडा. भरपूर थंडी आहे. वेदपुरी ही समुद्राकाठा-वरची वस्ती ना, म्हणून जास्त थंडी आहे. रात्री थंडीची भीती वाटून आरोग्यासंबंधीचे नियम धाब्यावर बसवून मी आपल्या खोलीच्या चारही खिडक्या बंद करून निजलो होतो.

उजाडायला अजून दोन घटिकांचा तरी अवधी असेल पण माझी एकाएकी झोपमोड

झाली. ह्याचे कारण थंडीच होती. हाडे वाजतील इतका थंड वारा होता. उत्तरेकडची खिडकी वाहणाऱ्या वाऱ्यामुळे आपोआपच उघडली. उठून ती बंद करण्याची इच्छा होती. पण आळसामुळे मला उठता आले नाही. अशा थंडीत कोण रजईतून बाहेर पडून खिडकी बंद करील ? मनातल्या मनात अस्वस्थ होत मी पडून राहिलो. उठलो नाही. इतक्यात जोराचा पाऊस आला. धो धो पाणी पडू लागले. थंडीमुळे दातही वाजू लागले.

शेवटी कंटाळून मी खिडकी बंद करण्यासाठी उठलो.

त्याच वेळेस एक भटजीबुवा शंखध्वनी करीत, गात आले. मार्गशीर्षात दरवर्षी एक वल्कुवन मध्यरात्रीच्या सुमारास तिरुवाचकम्ची पदे गात, शंख वाजवत, शेखंडी मारत (एक प्रकारचा बाजा) वेदपुरीच्या गल्लीबोळात फिरत असे. तोच ह्या वर्षीही आला असेल असे समजून मी क्षणभरही त्यांच्याकडे लक्ष दिले नाही. पण कुणाच्या तरी गाण्याचा मधुर आवाज कानावर पडला. वाहवा ! हा वल्कुवनचा आवाज नाही तर ! कुणी नवा आवाज वाटतोय्–असा विचार करून थंडीचा विचार न करता मी काही काळ खिडकीजवळ उभा राहिलो. बाहेर मुसळधार पाऊस पडत होता. तर खोलीच्या आत माझे हातपाय थंडीने कापत होते.

तो भटजी मात्र वसंत ऋतूतील रम्य सायंकाळी एखादा राजकुमार बगीच्यामध्ये हवा खात फिरेल तसा मुसळधार पावसात मोठ्या मस्तीत पायी चालला होता. एवढेच नाही, तर मोठ्या उत्साहाने ' तिरुवाचकम् ' गात होता.

**" पूसुवदुम् वेण्णीरू, पूण्पट्टुम पोंगरवम्,**
**पेसुवदुम् तिरुवायाल्, मरै पोलुम् कानेडी । "**

हे पद अशा रागात तो म्हणत होता की ते अजून माझ्या स्मृतिपटलावरून पुसले गेले नाही. ते गाणे मानवी गळ्यातून आले असे वाटत नव्हते–देवांनी गाईलेले वाटले. मी उच्च रवात पुकारले, " अहो भटजी ! जरा थांबा. " तो थांबला. मी विचारले," " असं वाटतंय की मागच्या वर्षी सुप्रभाती गात जो येत असे, तो तुम्ही नक्कीच नाही. मग तुम्ही कोण सांगा बरं."

उत्तर आले, " मागील वर्षी येणाऱ्या गायकाचा मुलगा. तिरुच्चाकल गात होतो."

मी उमजलो, हा जरा धीट आहे, विचारले, " तुझं नाव काय ?

" नेट्टै माडन. "

" बरंय् !. तुम्ही जाऊ शकता. "

तो दोन पावले पुढे गेला, पुन्हा परत फिरला आणि विचारले, " ऐय्यरे आहे का नाव आपलं ?"

" माझं नाव कालिदास आहे. "

" ओहो ! तर मासिकांत गोष्टी लिहिणारे कालिदास आपणच का ? "

अरेच्या, हा मासिकेसुद्धा वाचतो काय !– असे आश्चर्यचकित होऊन त्याला विचारले,

" बन्धु नेट्टूर माडा ! कुणाकडून तुम्ही संगीताचे शिक्षण घेतले ? आजपर्यंत तुम्ही कुठे होता ? "

नेट्टूर माडन म्हणाला, " ऐय्यरे, मी कोसळणाऱ्या पावसात उभा आहे. आपण घरातून बोलता आहात. जरा बाहेर उतरून या ना. बाहेरच्या चबुतऱ्यावर बसून बोलू या. पुष्कळ दिवसांपासून मी आपल्याला काही प्रश्न विचारणार होतो. या ना बाहेर ! "

अरे, कोण हा ! मोठा विचित्रच माणूस दिसतोय्–असा अचंबा वाटून मी बाहेर येण्याची बाब मानली. तो पण पायऱ्या चढून वर आला आणि चबुतऱ्यावर बसला. खाली उतरतांना मी एक कंदील पेटवून घेऊन गेलो. त्याच्याही हातात कंदील होता. बसल्याबरोबर आम्ही एकमेकांकडे निरखून पाहून घेतले. त्याचे डोके भादरलेले होते. शरीर मुडौल. पण कमावलेले. मांसलपणा मुळीच नव्हता. छाती उघडी होती, फक्त कमरेभोवती एक धोतर होते. उघडे शरीर भिजून चिंब झाले होते. पण त्याने ते पुसले देखील नाही. त्याच्या चेहऱ्यावर थंडीचा काहीही परिणाम दिसत नव्हता. त्याच्याकडे पाहिल्यावर का कुणास ठाऊक मला हंसपक्ष्याची आठवण आली. हो ना, काही वेळापूर्वी पावसात त्याला चालताना पाहूनही हाच विचार मनात आला होता, की " वा ! हंस पक्ष्याच्या चालीसारखी मस्त चाल आहे ह्याची ! "...त्याला जवळून पाहतानाही असाच विचार मनात आला. मंदिरातील भगवानाचे वाहन हंस, किती शांत, किती गंभीर, किती सुंदर वाटते ! तितकंच शांत, गंभीर आणि आकर्षक याचं मुखमंडळ आहे. मी म्हटले, " तुम्ही म्हणत होता की खूप दिवसापासून काही विचारणार होतात. बोला तर, काय विचारायचे आहे ? "

नेट्टूर माडन म्हणाला, " आपल्याला काही विचारायचंय् असं नाही म्हणालो मी. एवढंच आहे की मी आपल्याशी संभाषण करू इच्छितो. आपणच मला प्रश्न विचारा. मी उत्तरं देईन. संभाषणाचा हाच प्रकार मला आवडतो. "

हे कसले संकट आले, असा विचार करून मी माझा पूर्वीचाच प्रश्न पुन्हा विचारला, " इतके दिवस कुठं होता, संगीत कुठं शिकला ? " इत्यादी.

" अरिवूरचे वैणिक रघुनाथ भट्टर् यांचे पुत्र आंजनेय भट्टर् यांच्याकडून मी संगीत शिकलो. आतापर्यंत तेथेच राहिलो," नेट्टूर माडन म्हणाला.

" बन्धु, नेट्टूर माडा ! तुम्ही तर जातीनं वल्कुवन. रघुनाथ भट्टर्, आंजनेय भट्टर् ही नावं ऐकल्यावर वाटतं की ते ब्राह्मण असावेत. तुमच्या जातीचे लोक ब्राह्मणांकडे गेले

तेव्हा लोकानी भ्रष्ट झाल्याची गडबड केली असेल ना ! मग अशा परिस्थितीत तुम्ही त्यांच्याकडून संगीत कसे शिकून घेतले ? "

" जर आपल्याला प्रश्नाचं उत्तर हवं असेल तर मला आपली सारी कथा आपल्याला ऐकविली पाहिजे. आपल्याकडे ऐकण्याचं धैर्य आहे ना ! "

" जरूर ऐकेन. " मी आपली सम्मती दर्शविली.

" सव्वीस वर्षांपूर्वी वेदपुरीत माझा जन्म झाला. जेव्हा मी चार वर्षांचा होतो तेव्हा दारिद्र्याला कंटाळून माझ्या बापाने मला एका सर्कस कंपनीला विकले. त्याच दिवशी कंपनीत मी एक अति रोमहर्षक खेळ करून दाखविला. माझे वय साधारणपणे बारा वर्षांचे असेल, तेव्हा मी अरिवूरला आलो. कंपनीचे मालक महाराष्ट्रीय ब्राह्मण होते. त्यांची माझ्यावर खूप मर्जी होती. पहाडी भागातील अरिवूर ही एका बड्या जमीनदाराची राजधानी आहे. त्या शहरात आमच्या कंपनीने दोन महिने खेळ केले. कंपनीच्या मालकाचे–रायरजीचे–बरेच वय झाले होते. म्हणून त्यांनी विचार केला की लवकरच कंपनी बंद करून पंढरपूरला जाऊ आणि तेथे एक घर खरेदी करून उरलेले आयुष्य परमेश्वराच्या चिंतनात व्यतीत करू. जमीनदाराची व त्यांची दाट मैत्री जमली होती. जमीनदारांना त्यावेळी एका तलवारबाजीत निपुण असलेल्या युवकाची अंगरक्षक म्हणून आवश्यकता होती. माझ्या मालकांनी माझी शिफारस केली. याच वेळेस माझा पिता आणि कंपनीचे मालक यांच्यामध्ये पत्रव्यवहार चालला होता. माझा पिता मला भेटण्यासाठी अनेक वेळा येत असे. शेवटी जमीनदार राजमहालात मला खायलाप्यायला देऊन माझं मुलासारखं पालनपोषण करत होते. तिथंच त्याच जमीनदाराच्या पदरी असलेल्या आंजनेय भट्टर् यांच्याकडून मी संगीताचे शिक्षण घेतले. योगाभ्यास केला. तलवारबाजीत तर विशेष नाव कमावलं. मला सहा भाषा येतात. गाणं, नाचणं, मृदंग वाजवणं, घोड्यावर बसणं, हत्तीवर बसणं, जादूचे प्रयोग करणे, मल्लयुद्ध...अशा नाना विद्या मला ज्ञात आहेत. "

आतापर्यंत उजाडलं होतं. सूर्योदयाच्या प्रकाशात तो खूपच सुंदर आणि रूपवान् दिसला.

मी त्याच्याकडे पाहून म्हटले, " आज सकाळचं जेवण माझ्याकडेच कर. तलवार-बाजीतील तुझे कौशल्य मलाही थोडंसं दाखव. " तो तयार होता. नंतर म्हणाला, " तलवार चालविण्यात माझी बरोबरी करणारा ह्या शहरात केवळ एकच इसम आहे. मी घरी जाऊन तलवार घेऊन, येताना त्याला पण बरोबर घेऊन येईन. "

नेट्टै माडन गेला आणि जवळजवळ पाच वाजता परतला. वाटलं होतं की तो नंगी तलवार म्हणजे अस्सल तलवारी घेऊन येईल पण त्याने तर धार गेलेल्या सर्कशीत वापरतात तशल्या तलवारी आणल्या. म्हणाला, " माझ्या प्रतिद्वंद्व्याला घेऊन येतो

म्हणालो होतो ना म्हणून त्या इसमाला खूप वेळ शोधलं पण तो काही भेटलाच नाही. म्हणून आज मी एकटाच तलवार कौशल्य दाखवितो." मी होकार भरला आणि त्याला इडली वगैरे आणून दिली. तो खात असतानाच योगेश्वर महाराज कुळ्ळस्वामी तेथे आले. त्यांना पाहताच नेट्टै माडन उठून उभा राहिला आणि म्हणाला, "जय राम ! राम राम महाराज !" त्यांनी सुद्धा 'राम राम' असे म्हटले. मग दोघेही मल्याळम् भाषेत बराच वेळ बोलत राहिले. मला मल्याळी भाषा समजत नाही म्हणून मी ते काय बोलत होते इकडे लक्ष दिलं नाही. कुळ्ळस्वामी मला गुरुस्थानी होते, म्हणून त्यांच्यासाठी दुकानातून केळी मागविली आणि त्यांना दूध व केळी दिली. दोघांनीही खाऊन घेतलं. मग मी पानाची चंची हातात घेऊन, "चला, आपण छतावर पूजामंडप आहे, तिथं जाऊ" असं म्हणून त्यांना वर घेऊन आलो. दोघंही वर आले. त्या दोघांना झोपाळ्यावर बसविलं आणि पान लावून दिलं. ते संपविण्यापूर्वीच नेट्टै माडनने बाहेरच्या अंगणातून एक खुर्ची आणली. तिच्यावर चढून झोपाळ्याची लोखंडी साखळी सोडली. झोपाळ्याची बैठक आणि ती साखळी त्याने भिंतीला चिकटून एका कोपऱ्यात ठेवून दिली. आणि मग माझ्याजवळ येऊन म्हणाला, "तलवार चालविण्यात माझ्याशी स्पर्धा करू शकणारा ह्या शहरात एकच आहे असं म्हटलं होतं ना मी ? तो दुसरा कोणी नसून हेच स्वामी आहेत." त्याने स्वामीकडे निर्देश केला. आश्चर्याने मी चकितच झालो.

क्षणभरात दोघेही तलवारी उचलून त्या चालवू लागले. बराच वेळ ते आपले पवित्रे बदलत लढत राहिले. मी चकितच होऊन बसलो होतो. इतक्या अद्‌भुत रीतीने ते तलवारी फिरवत की कुणालाही जखम झाली नाही. पण माझ्या हृदयात मात्र सारखी धडधड होत होती की कुणाचं तरी डोकं उडणार !

शेवटी दोघांनी तलवारी खाली ठेवल्या. काडीइतकासुद्धा थकवा दिसला नाही. दोघेही पूर्वीप्रमाणे मल्याळममध्ये बडबड करू लागले. थोड्या वेळानं नेट्टै माडन निरोप घेऊन निघून गेला. स्वामीजींनी माझ्याकडे पाहून म्हटलं, "बन्धो, कालिदास ! हा नेट्टै माडन तर राजयोगाच्या साहाय्यानं चित्रसिद्धी करून बसलाय्. तलवारीच्या युद्धाच्या साहाय्याने योगसिद्धीचा मार्ग परमेश्वराने सांगितला आहे. ह्या अख्ख्या भूमंडलावर तरी ह्याच्या बरोबरीने तलवार चालविणारा नसेल. परंतु हा अहिंसाव्रत धारण करणारा महायोगी आहे. आपल्याला दंश करायला आलेल्या सर्पालाही न मारणारा. असं व्रत घेतलंय त्यानं. महान असल्यामुळेच घातक अस्त्र आणि नागडी तलवार यांना तो हातानं स्पर्शही करीत नाही. परंतु ह्या विद्येला वश करण्यासाठी हठयोगाच्या आसनांपैकी एक मानून तुमच्या सारख्या रसिकमंडळीपुढे सर्कसच्या नकली तलवारीच्या मदतीने आपलं अद्‌भुत कौशल्य तो दाखवितो. आपल्या शहरात

वल्कुवन कुळात अशा महान व्यक्तीला पाहून तुम्हाला आश्चर्य वाटेल. पण विस्मित होऊ नका. हिंदुस्थानांतील साधुसंतांकडे आदराच्या भावनेनं पाहा. भगवं वस्त्र पाहिलं की हात जोडावेत. कोणत्या बिळात कोणता सर्प बसला असेल कोण जाणे? तुम्हाला तर अजून कितीतरी महान विभूती दर्शन देतील."

दरिद्री हिंदुस्थानच्या मोठेपणाचे स्मरण करून घेताना स्वामीजींकडे पाहत हात जोडले आणि म्हटले, "वंदेमातरम्."

'जीवेत्' असा आशीर्वाद देत स्वामीजींनी सुद्धा निरोप घेतला.

## द्वितीय खंड—नारी

1. नारी
2. तमिळनाडूत नवजागृती
3. पतिव्रता
4. नारीस्वातंत्र्य
5. तमिळनाडूचा समाज आणि संस्कृती

## नारी

वेदपुरीच्या धर्मवीथीत पंडित ब्रह्मराय अय्यर नावाचे एक ब्राह्मण राहतात. ते शाक्त संप्रदायाचे आहेत. शाक्तपूजक मद्यमांसाहारी असतात, परंतु पंडितजी यांचे सेवन करीत नाहीत. ते कट्टर शाकाहारी आहेत. तुम्ही एखाद्या बकरी लामांस खायला लावू शकाल परंतु यांना मात्र नाही. इंग्रजी आणि फ्रेंच ह्या दोन्ही भाषांचे ते पंडित आहेत. थोडेफार संस्कृतचेही अध्ययन त्यांनी केले आहे. भगवद्गीता, वाल्मीकी रामायण, कुमारसंभव ह्या तीनही ग्रंथांचे त्यांनी अध्ययन केले आहे. वेदान्तातही त्यांना रुची आहे. जेव्हा केव्हा कीर्तन, पुराणवाचन, प्रवचन असते, त्याला पंडितजी अवश्य जातात. परंतु बहुधा निराश होऊनच परत येत. मग तर जवळजवळ महिनाभर त्या प्रवचनकारावर किंवा कीर्तनकारावर आपल्या मित्रमंडळीमध्ये तोंडसुख घेत. म्हणत— "जुन्या जमान्यात हिंदुस्थानचे लोक बुद्धिमान आणि ज्ञानात अग्रेसर ठरले होते. नजिकच्या भविष्यकाळातही निश्चितच ह्या देशाची उन्नती होणार आहे, यात काही संशय नाही. पण... सांप्रतची स्थिती किती निराशाजनक आहे ! हे लोक पुराणिक बनून कीर्तन करण्याचा आव आणतात. त्यातील नव्वद टक्के स्वयंपाकी बनण्याच्या लायकीचे आहेत. कारकुनी सोडून उपदेश पाजायला निघालेत लेकाचे ! हीच तर चिंतेची आणि संकटाची बाब आहे. ओह् ! कसली डोकेदुखी आहे ही ! हाय... आज—ह्या घडीला मी पाहतोय्—हिंदुस्थानचे लोक पक्के मूर्ख आणि अडाणी होऊन बसले आहेत. साऱ्या राष्ट्राची बुद्धी कुजून गेली आहे. यांच्या अकलेला वाळवी लागली आहे. हिंदुस्थानच्या लोकांची ही दुर्गती पाहून माझं रक्त उसळून येतं. पटकोनिया देशचे ह्या शतकातील लोकसुद्धा इतके मूर्ख आणि बेअक्कल नसतील," पंडितजी अशा प्रकारे आपल्या देशवासीयांच्या बुद्धीच्या दिवाळखोरीची कीव करीत.

ह्या ब्रह्मरायांचा तमिळभाषेचाही थोडाबहुत अभ्यास होता. युरोपचे काही शास्त्रग्रंथ

तमिळभाषेत त्यांनी अनुवादिले आहेत. कधी कधी ते कविताही करत. ह्या कविता ना धड उत्कृष्ट म्हणता येतील ना धड टाकाऊ. अगदी सहजप्रकारे त्या वाचता–समजता येण्यासारख्या होत्या. त्यांना संगीताचे ज्ञान खूप होत पण गाता मात्र येत नसे. आवाजच मुळी मधुर नव्हता. तालविषयात मात्र निपुण होते. बडी बडी मृदंग वाजविणारी मंडळी ह्यांना भीत असत. ह्या गल्लीत बोलले तर तिसऱ्या गल्लीत ह्यांचा आवाज घुमत असे. दुपारी शाळेचे काम आटोपले की सरळ घरी येत असत, आणि सायंकाळी सहा वाजल्यापासून आठ वाजेपर्यंत आपल्या घराच्या कठड्यावर मित्रांबरोबर गप्पा-टप्पा करीत, अर्थात गातही असत. नंतर भोजन करायला जात. भोजन संपवून हात वाळण्यापूर्वी कठड्यावर येऊन आरडाओरडा करत. म्हणून आसपास राहणाऱ्यांनी ह्यांच्या चबुतऱ्याचं नाव ' गर्जन पाठशाला ' असं ठेवलं होतं. दररोज चारपाच तरी व्यक्ती ह्या ' गर्जन पाठशाले 'त उपस्थित असावयाच्या आणि त्यांचा आरडाओरडा ऐकायच्या. हा श्रोतृगण अजून बहिरा कसा झाला नाही, याचं बहुतांना आश्चर्य वाटत असे.

पंडितजींबरोबर माझी मैत्री होती. ' गर्जन शाळेत ' त्यांच्या कथा ऐकायला मी नेहमी जात असे. परंतु त्यांची एक गोष्ट मात्र मी कधीच मानली नाही ती म्हणजे हिंदुस्थानचे लोक पूर्णपणे मूर्ख आहेत. याव्यतिरिक्त त्यांचे अनेक विचार मला तर्कसंगत वाटत.

चार दिवसापूर्वी, रविवारी, रिमझिम पाऊस पडत होता म्हणून मी बाहेर फिरायला गेलो नाही, पण ' गर्जन शाळे 'त जाऊन बसलो. तेथे पंडितजी उच्चरवात गरजत होते. श्रोत्यांमध्ये पुढील मंडळी होती–

1. **वीरासामी नायक्कर**–हत्तीसारखं शरीर. सरकारी नोकरी. वय तेहतीस वर्षांचेच परंतु ह्या वयातच डोक्यावर टक्कल पडलेलं. जीवनाचं व्यावहारिक ज्ञान भरपूर. बोलणं कमी. राग आला की थोडीशी तपकीर नाकात भरतात, इतकंच.

2. **कोंकण भट्टर**–हे पेरुमाल ( भगवान विष्णू) च्या मंदिराचे पुजारी होते. साडे-सात फूट उंच. यांना कुणीही वाटलं तर शिव्या द्याव्यात, वाटलं तर धोतर पकडून ओढावं. वीरासामी नायकर दर पंधरा मिनिटांनी यांच्या डोक्यावर टपली मारत. परंतु भट्टरना कधीही राग येत नसे. असं वाटतं की ह्यांच्या जन्मकुंडलीत रागीट स्वभावाच्या ग्रहांचे योग नसावेत.

3. **नारायण चेट्टियार**–पैसेवाली आसामी. वामनमूर्ती. सावकारीचा म्हणजे पैसे देण्याघेण्याचा व्यवसाय आणि ' गर्जनशाळे 'तील उपस्थिती, ह्या दोन गोष्टींव्यतिरिक्त इतर कुठल्याही बाबीकडे ध्यान नाही. प्रत्येक सप्ताहात शुक्रवारी विघ्नेश्वराच्या मंदिरात जातात. ह्याशिवाय बाहेर येणंजाणं नाही. लोक ह्यांना अंतःपुराचा चेट्टियार म्हणतात.

4. **गुरुसामी भागवतर्**–संगीतज्ञ. बालकांना संगीत आणि पेटी वाजवणं शिकवतात. आवाज मोठा आहे.

अशा वेळी मी जाऊन बसलो तेव्हा पुरोहित ब्रह्मरायर थोडेसे खूष झाले. म्हणाले, " यावे, यावे... आपल्या आवडत्या विषयावर चर्चा होत आहे."

" कोणता विषय आहे ?" मी विचारले.

" स्त्रियांविषयी चर्चा चालल्ीय्."

" स्त्रियांविषयी ? ठीक आहे. चालू दे पुढे."

पंडितजी खड्या आवाजात बोलू लागले, खरं तर गरजू लागले–

" मी आतापर्यंत जे सांगितलं, ते पुन्हा थोडक्यात पुन्हा एकदा शक्तिदासवाना सांगेन तेव्हाच विषयाची संगती लागेल," असं म्हणून त्यानी सर्व पुनश्च सागण्यास सुरुवात केली.

वीरसामी नायक्करनं नाकात तपकीर कोंबली आणि कोकण भट्टरच्या डोक्यावर टप्पू मारला.

मी म्हणालो, " आता टिगल एकदम बंद. पंडितजी आपल व्याख्यान सुरू करतील..."

गरजणं सुरू झाल––

" भारत देशात पुरुषानाही मत देण्याचा अधिकार नाही. म्हणजेच जनतेच्या इच्छेनुरूप प्रतिनिधी निवडून लोकसभेच्यातर्फे शासन करण्याचा अधिकार हिंदुस्थानच्या लोकांना नाही. हिंदुस्थानातील लोक बुद्धीने जरा कमी आहेत. आमच्या देशाच्या पुरुषांनासुद्धा जो अधिकार नाही तो काही देशात स्त्रियानासुद्धा मिळालेला आहे. म्हणजेच राज्यकारभारासंबंधी प्रश्नांचा निर्णय घेण्याचा अधिकार तिथल्या स्त्रियांनासुद्धा आहे.

ऑस्ट्रेलिया, न्यूझीलँड, डेनमार्क, नॉर्वे, अमेरिकेचा अर्धाअधिक भाग, कॅनडा, इत्यादी देशांत स्त्रियांना मताधिकार आहे. इंग्लंडातही ही प्रथा अंमलात आणण्याचा प्रयत्न होत आहे. माजी मंत्री आस्क्विथ जे पूर्वी ह्या गोष्टीला विरोध करत होते, तेही हल्ली हल्ली ह्याच्या बाजूने ठीक आहे, जाऊ द्या या गोष्टी...

तुर्कस्तान ठाऊकच आहे तुम्हा मंडळींना. कालपरवापर्यंत तिथं पडदा पाळला जात होता. कस्तुरीला बंद डब्यात ठेवतात ना ? डबी उघडली तर सुगंध उडेल ह्या भीतीनं बंद ठेवतात. हो ना ? तसंच आपल्या देशातही काही जातीत ही प्रथा आहे. हिंदू स्त्री जवळ जवळ गुलामगिरीच्या अवस्थेत आहे. अर्थात आपण त्यांना घरात बंद करून नाही ठेवत आणि समजा ठेवलं तरी काय फरक पडणार आहे ? गुलामाला पाणी आणायला पाठवणं, खुल्या सडकेवर जाऊ देणं किंवा खोलीत कैद्यासारखं बंद करून ठेवणं, यात काय फरक आहे ? कुठल्याही अवस्थेत गुलाम तो गुलामच. ही मानवी जीवनाच्या दोन अवस्था आहेत. आपल्या इच्छेप्रमाणे, जे पाहिजे तसं करणं, फायद्या-

तोटयाची जबाबदारी स्वतःकडे घेणं, ही आहे एक अवस्था. हिलाच स्वातंत्र्य म्हणतात. असं नसणं, मग ते स्वेच्छेनं असो वा नसो, दुसऱ्यांच्या इच्छेप्रमाणे चालण्याची सक्ती असणं, तीच गुलामगिरी. आपण आपल्या स्त्रियांना याच अवस्थेत ठेवलं आहे, नुसत्या गप्पा मारून काय उपयोग ? आमच्या स्त्रिया परतंत्र आहेत, गुलाम आहेत, ह्यात काहीही संशय नाही. हिंदुस्थानात पुरुषाना मतदानाचा अधिकार नाही, स्त्रिया तर ह्या पुरुषांच्या गुलाम, आजकाल तुर्कस्तानच्या स्त्रियांची स्थितीही भारतीय स्त्रियांपेक्षा अधिक चांगली आहे, मिस् अलिसन् नावाच्या आंग्ल महिलेने ह्या विषयावर एक पुस्तक लिहिले आहे. कालच्या एका नियतकालिकात त्या पुस्तकाची समीक्षा आली आहे. समीक्षक सिलोन देशाचा कुणी बौद्ध आहे. त्यांचं नाव जिनराजदास आहे. त्यांनी एका आंग्लमहिलेशी विवाह केला आहे.

त्यांनी सांगितलंय् की तुर्कस्तानच्या स्त्रिया शिक्षण, राजकारण आदीत उत्साहाने भाग घेऊन सर्व क्षेत्रांत भरपूर प्रगती करत आहेत– असं त्या पुस्तकात लिहिलं आहे– अरे, अरे ! रामा, राघवा, केशवा, विश्वामित्रा...... क्षमस्व. संध्यावंदनाचे मंत्र थोडे विसरलो."

अशा रीतीने आपल्या व्याख्यानात थोडासा दम घेण्यासाठी त्यांनी थोडा विनोद केला तेव्हा त्याचे प्रमुख शिष्यवर्य कोकणभट्टर मोठयांदा हसले. वीरासामी नायक्कर तत्परतेने त्याच्या डोक्यावर टप्पू मारता झाला आणि स्वतःच्या नाकात त्याने तपकीर कोंबली.

पंडितजींनी पुन्हा सुरुवात केली—" मुलगी वयात आल्याबरोबर तिच्या इच्छेनुसार विवाह करायचा असतो. जर पुरुष तिच्यावर अन्याय करील आणि अन्याय असहनीय असेल तर त्या स्त्रीला कायद्याने त्याच्यापासून विभक्त होण्याचा अधिकार असला पाहिजे. लोकांनीही ह्या अशा घटनेसाठी तिची हेटाळणी करता कामा नये. स्त्री स्वाव-लंबी नाही. स्वतःचं पोट स्वतः भरू शकत नाही ती. याविषयी स्त्रीस्वातंत्र्यवादी पाश्चिमात्य देशवासीयांच्याशी माझा मतभेद आहे—नोकरी करून स्वतःचं पोट भर-ण्याची पाळी स्त्रियांवर येऊ नये असं मला वाटतं. स्त्रीला पितृसंपत्तीत वाटा मिळाला पाहिजे. जर ती विवाहित असेल तर पतीच्या संपत्तीचा वारस ती व्हायला पाहिजे. (पत्नीच्या हातात पैसा देऊ नये—असं म्हणणारे पुरुषही म्हणतात.) स्त्रीला आपल्या इच्छेप्रमाणे वागण्याची मुभा पाहिजे. सार्वजनिक ठिकाणी स्त्रीकडे आदराने पाहिले जावे. जो पुरुष असं करणार नाही, त्याच्याशी इतर गृहस्थाश्रमीयांनी संबंध तोडले पाहिजेत. त्याच्याशी बोलणंसुद्धा वर्ज्य केलं तरी चालेल. रस्त्यावर, बाजारात, रेल्वेत, बसमध्ये, अगदी काशी शहरातसुद्धा का होईना, जर स्त्रिया एकटया जातील तर पुरुषांचे त्यांच्याशी वागणे आदरपूर्वक असावे. परंतु अशी व्यवस्था करणं आजच्या

परिस्थितीत तरी ह्या देशात शक्य नाही. काय करणार ? हिंदुस्थानात नव्वद टक्के लोक निरक्षर आहेत- अडाणी आहेत. ते जाऊ द्यात खड्यात. पण सुशिक्षित, सभ्य आणि मोठेपणाचं जीवन जगण्याऱ्या लोकांत अशी शिस्त आणायची आहे की स्त्री स्वेच्छेने बोलेल, बाहेर हिंडू फिरू शकेल, हे जर प्रत्यक्षात आणायचं असेल तर पुरुषांना शिक्षा केली पाहिजे. नालायक माणसांना शिक्षा करून काय फायदा ? हो ना ! किती दिवस हा देश जुन्या कचऱ्यात कुजत राहणार आहे ? कृमिकीटकांप्रमाणे स्त्री-पुरुष सारखेच जन्माला येतात. ह्यामध्ये एक मालक होतो आणि दुसरा गुलाम ? छे ! कसले दरिद्री लोक आहेत ?"

ह्याच वेळेला माझी मुलगी जेवण तयार झालं म्हणून सांगायला आणि जेवायला चला म्हणून निरोप घेऊन पळत आली. कोकण भट्टरने मला विचारले, "मग, ब्रह्मराय पंडिताच्या विचारांच्या संदर्भात तुमचं मत काय आहे ?"

मी काही बोलायच्या आत वीरासामी नायक्करने भट्टरच्या डोक्यावर टप्पू मारला आणि ओरडला, "अहो, तुम्ही चूप बसाना !" मी सांगितलं की अखिल जगताच्या पंचायती करण्याची मला आवश्यकता नाही. ज्याला जे कार्य आवश्यक वाटतं बस्- ओम ! शक्ती ! 'ओम शक्ती'चं उद्घाटन करावं, ते कार्य तडीस जाईल, एवढंच मी जाणतो.

'हे मात्र खरं.' पंडितानी सुद्धा होकार दिला, मग काय ? 'गर्जन पाठशाळे'तील सर्वांनी ते मान्य केले, मी पण जेवण करायला गेलो.

## तमिळनाडूत नवजागृती

प्राणिहत्या होणे अनिष्ट आहे. मद्यमांसभक्षण केल्याने बहुतांश लोकांचे नुकसानच होते. शाकाहारी असणे ही ब्राह्मणांना अभिमानास्पद बाब आहे. असे राहणे ही एक तपस्याच होय. अशा प्रकारचे अनुष्ठान कृतायुगाला मूलाधार ठरले असे मानले जाते.

तरीही, ज्याचे आचरण आपण करू शकत नाही, ते इतरांना आचरताना पाहून घृणा व्यक्त करणे ही अयोग्य बाब आहे.

खाणेपिणे, कपडेलत्ते, लग्न यासारख्या बाबतीत अन्धविश्वासामुळे किंवा रूढि-प्रियतेमुळे बंधने लादणे वा नियंत्रण करणे ह्यात काही मथितार्थ नाही.

अखिल जगतातील मानवजात एक आहे. "अरेरे ! ह्या युद्धात किती युरोपिअन

हकनाक प्राणाला मुकत आहेत " असा विचार मनात येतो त्या वेळी डोळ्यातून अश्रू गळतात. मी स्वातंत्र्यसंग्रामाचा नुसता समर्थकच आहे असे नाही, तर माझे विचार जहाल मतप्रणालीचे आहेत. तरीसुद्धा युरोपातील लोकांच्या अशा विनाकारण मृत्यूचे मला वाईट वाटते. समस्त मानवकुल एक आहे, त्यांची जातही एकच आहे.

सर्व मानव बन्धुमात्र आहेत. एकाच जीविततत्त्वातून निर्माण झालेले आहेत. अशा अवस्थेत जर आपण एकाच घरात निरर्थक विचारांच्या भिंती खड्या करून " माझी जात वेगळी आहे, माझ्या मेव्हण्याची वेगळी ! आमच्या सहभोजनाने माझी जात भ्रष्ट होईल " असे म्हणणे किती मूर्खपणाचे होईल, हे समजावण्यासाठीच लिहीत आहे एवढेच.

तमिळनाडूत जातींबद्दलचे मूर्ख विचार आणि निरर्थक बंधने धडाधड तुटत चालली आहेत. तुटून अगदी चक्काचूर होत आहेत.

ह्यापुढची पायरी आहे—स्त्री-स्वातंत्र्य !

तमिळनाडूत ह्या आंदोलनाचे नेतृत्व जज्ज सदाशिव अय्यर याची सहधर्मचारिणी श्रीमती मंगलांबिका करत आहेत. श्रीमती ॲनी बेझंट यांचे उदाहरण ह्या विषयात त्यांना प्रेरक ठरले आहे.

ह्या दोन व्यक्तीमुळे भारत देशात स्त्री जातीला स्वातंत्र्य मिळण्याची शक्यता निर्माण झाली आहे. तमिळनाडू ह्या दोघांचा चिरकालापर्यंत ऋणी राहील. स्त्रियांचेही आपले स्वतःचे असे जीवन आहे, हृदय आहे, बुद्धी आहे, पंचेंद्रिये आहेत; त्या कोणी मृतवत यंत्रे नाहीत. किंवा सजीव असलेल्या वृक्षांच्या फांद्या नाहीत. जसा पुरुष, तशीच स्त्री. स्त्रीसुद्धा सप्राण व सजीव असते. शारीरिक दृष्ट्या भेद असेल पण दोघांचाही आत्मा एकच आहे, हाच माझ्या विधानांचा उद्देश आहे.

स्त्री ही आपल्याला आवडेल त्या पुरुषाशी विवाहबद्ध होऊ शकते. विवाहित स्त्री ही आपल्या नवऱ्याची गुलाम मुळीच नसते. त्याची ती जीवनसाथी असते. त्याच्या जीवनाचा आधार असते. जशी शिवाची पार्वती, विष्णूची लक्ष्मी, त्याचप्रमाणे स्त्री ही पुरुषाच्या जीवनाचा एक अविभाज्य घटक असते. त्याची अर्धांगिनी असते. शिव आणि विष्णू यांचे परस्परात युद्ध झाले अशा भाकडकथा ऐकविणाऱ्या पुराणातसुद्धा विष्णूने लक्ष्मीला मार दिला किंवा शंकराने पार्वतीला बंद करून ठेवले होते अशा कथा नाहीत. शंकराने स्त्रीला अर्धांगिनी बनविले. भगवान विष्णूने तिला आपल्या हृदयात स्थान दिले. ब्रह्माने आपल्या जिव्हेवर तिला ठेविले. सर्व सृष्टीचा मूलाधार परमात्मा आहे आणि प्रकृती व पुरुष हे त्या परमात्म्याचेच दोन अंश. दोघेही एकमेकांना पूरक, दोघेही समान. खरे तर स्त्रीलाच एक तसूभर उंच स्थानावर लेखणे योग्य ठरेल.

आजकाल केवळ तमिळनाडूतच नव्हे तर साऱ्या जगात स्त्रीला कमी लेखण्याची

आणि पुरुषाला श्रेष्ठ मानण्याची जी एक प्रथा पडलेली आहे, ती पूर्णपणे चुकीची आहे. सर्व दु:खांचे ते मूळ आहे. अन्यायाची खाण आहे. कलियुगाच्या आविर्भावाचा तो आधार आहे.

तमिळनाडूच्या बुद्धिजीवी वर्गाच्या हे ध्यानात आले आहे, तसंच स्त्री–स्वातंत्र्याचे आंदोलन तर दिवसेंदिवस प्रखर होत चालले आहे, हे पाहून मला अतिशय आनंद होत आहे. ह्या विषयात तमिळनाडू जगाचा मार्गदर्शक ठरेल यात काही संशय नाही.

पुढचा विषय आहे जातिभेद. भारत देशात, विशेषत: तमिळनाडूत अनंतकाळपासून जातिभेद पाळले जात आहेत, हे सर्वज्ञातच आहे. रामानुजांनी तमिळनाडूतच जन्म घेतला होता ना ? आलवार आणि नायनमारो यांचा जन्मसुद्धा ह्याच मातीत झाला. अस्पृश्य चांभार नायनमारोला परमेश्वराच्या- पंक्तीत मंदिरात बसविण्याचे श्रेय तमिळनाडूलाच मिळाले ना ? चिदंबरमच्या मंदिरात भगवान नटराजाचीच नव्हे तर भगवान विष्णूचीही प्रतिष्ठापना केली आहे. श्रीरंगममध्ये भगवान विष्णूला एक देवी बनवून–नाच्चियार देवीच्या नावाने–आराधना केली जाते. महान रामलिंग स्वामींनी म्हटले आहे–" प्रत्येक धर्म वंदनीय आहे."

जर अखिल जगतातून जातिभेद समूळ नष्ट करून सर्वधर्मीय समन्वयवादाच्या सिद्धांताची प्रतिष्ठापना करावयाची असेल तर तमिळनाडू हे या गोष्टीसाठी फार उपयुक्त क्षेत्र ठरेल. धर्मभेद आणि जातिभेद याना विरोध करून अखिल जगताला एकेश्वराची आराधना करण्याचा संदेश देणारे आणि एकेश्वरवादाचाच पुरस्कार करण्याच्या महान व्यक्ती तमिळनाडूमध्ये होऊन गेल्या. ह्यावरूनच मी म्हटले की जगात नवजागृतीचे किरण तमिळनाडूमधूनच निघतील.

भगिनीनो ! जेथे आपल्याला पूर्ण समतेचे हक्क प्राप्त नाहीत, तेथे आपण पुरुषांची साथ करू नये. असे करताना आपल्या पतीकडून आणि पुरुषवर्गाकडून जे जुलूम व अत्याचार भोगावे लागले, कष्ट सहन करावे लागले, तरीही घाबरू नका. भगिनींनो ! जो जन्माला आला आहे तो एक ना एक दिवस मरणारच. आज मरेल, फार तर उद्या. धर्मासाठी प्राण देणारेही मरतातच. इतरही मरतात. म्हणूनच भगिनींनो, घाबरण्याची आवश्यकता नाही. स्त्रीस्वातंत्र्यप्राप्तीसाठी धर्मयुद्धाला आरंभ करा. आपण अवश्य विजयी होऊ. दैवीशक्ती आपल्याला साहाय्य देईल.

वंदे मातरम् ।

# पतिव्रता

आजच्या युगात अनेक असत्याचे भांडे फुटत चालले आहे. किती तरी जुन्या समजुती चक्काचूर होऊन विखरल्या जात आहेत. अन्याय आणि अधर्म यांचे तुकडे तुकडे होत आहेत. कितीएक अत्याचारी रसातळाला जात आहेत.

आजच्या युगात कुठल्यातरी भयाने भयभीत होऊन आपण ज्याला म्हणून सत्य मानतो ते लपवून ठेवण्याचा प्रयत्न करण्यात काही हशील नाही. वृत्तपत्रे, नियतकालिके ही आज सत्याची अभिव्यक्ती करणारी उपयुक्त साधने आहेत. संपादकमंडळी सत्याचे खरेखुरे आश्रयदाते होत चालले आहेत.

प्रत्येकाची अशी इच्छा असते की स्त्रिया पतिव्रता असाव्यात. पण खरी अडचण हीच असते की पुरुष योग्य आणि चारित्र्यवान नसतात. प्रत्येक पुरुष आपली पत्नी आणि कन्या-यांच्या पातिव्रत्याबद्दल कमालीचे औत्सुक्य आणि श्रद्धा बाळगून असतो पण परस्त्रीच्या पातिव्रत्याबद्दल त्याच नजरेने तो पाहत नाही. प्रत्येक जण आपल्या, आपल्या जातीच्या स्त्रियांच्या पातिव्रत्यावर विश्वास बाळगून असतो.

स्त्रीपुरुष एकमेकांशी सचोटीने वागतील तर कल्याण होईल. पतिव्रतेच्या अंगी मोठे तेज आणि शक्ती असते. सावित्रीने यमदेवाच्या हातातून आपल्या पतीची सुटका केली होती. ह्या कहाणीत सत्य अंतर्निहित आहे. पण एखादी स्त्री पतिव्रता नाही ह्यासाठी तिची हत्या करणे, तिला त्रास देणे, मारपीट करणे, तिला जातीतून वाळीत टाकणे, किंवा लोकांच्या निंदेचे व चेष्टेचे पात्र बनवून असहाय परिस्थितीत रस्त्यावर मरू देणे हा शुद्ध अन्याय आहे.

अरे मूर्खांनो ! पुरुष जर चारित्र्यहीन असतील तर स्त्रिया पतिव्रता कशा राहतील ? एक हिशेब मनातल्या मनात करून पाहा. समजा, एका शहराची लोकसंख्या एक लाख आहे. त्यात पन्नास हजार स्त्रिया आहेत. पन्नास हजार पुरुष आहेत. समजा की त्यातील पंचेचाळीस हजार पुरुष परस्त्रीची इच्छा बाळगून आहेत. तर मग कमीतकमी पंचेचाळीस हजार स्त्रियांना परपुरुषांच्या वासनेचे बळी व्हावे लागणार. यातील वीस हजार पुरुष कुठल्यातरी मार्गाने आपली इच्छापूर्ती करण्यात सफल होतील असे मानले, तरी वीस हजार स्त्रियांना असहायपणे व्यभिचारिणी व्हावे लागेल. ह्या वीस हजारांत केवळ शंभर स्त्रियाच बहिष्कृत ठरल्या जातील. बाकीच्या आपापल्या पतींच्याबरोबर जीवन कंठत राहतील. त्यांच्या पतिदेवांना हे कळणारही नाही की आपली पत्नी व्यभिचारिणी आहे. एखादा असाही असेल की जो जाणूनबुजून गप्प बसत असेल.

हे जर गृहीत धरले तर शवटी असे ध्यानात यईल की बहुतांश लोक चारित्र्यहीन स्त्रियांबरोबर जीवन कंठतात. अशा प्रकारे पातिव्रत्यरक्षणाचा हेतू म्हणजेच पुरुषां-

कडून स्त्रियांची मारझोड, त्याना यातना देणे इत्यादी भरपूर प्रमाणात चालत आलेले आहे. छे ! छे ! किती अपमानजनक माघार आहे ही पुरुषांची ! अन्याय आणि अत्याचार करून काहीही लभ्यांश होत नसतो.

तू माझ्यावर प्रेम का करीत नाहीस ? आपले प्रेम दाखवत का नाहीस ? असे म्हणत पत्नीचे हाड मोडण्याने काय मतलब साधणार आहे ? कुठल्याही पुरुषात याच्यापेक्षा अधिक मूर्खपणा दुसरा असू शकेल काय ?

आपल्या नजरेत भरलेली वस्तू आवडणे, तिच्याकडे आकर्षित होणे व तिच्या प्राप्तीची इच्छा धरणे हे अगदी नैसर्गिक आहे. मानव पोपटाला सुंदर मानतो परंतु बेडकाला कुरूप लेखतो. मग समजा, मानवाला मारपीट करण्याची, शिव्या देण्याची आणि त्याला तुरुंगात टाकण्याची शक्ती बेडकांना प्राप्त झाली तर आपण त्याला न्यायसम्मत मानाल काय ? सांगा.

काही देशात परकीय येऊन अन्यायपूर्ण शासन करतात. ते म्हणतात की प्रजेने त्यांच्याकडे राज्यकर्त्यांच्या नजरेने पाहून राजभक्ती दाखविली पाहिजे. जे अशी राजभक्ती दाखविणार नाहीत त्यांना तुरुंगात डांबले जाईल, जगातील राजनीतिज्ञ अशा राज्यशासकांची निंदाच करतील.

स्त्रियांवर पुरुषांचे निरंकुश स्वामित्व असणे हे अन्यायी, जुलुमी राज्यशासनासारखेच आहे. ही गोष्ट तळहातावरील रेषेइतकी स्पष्ट आहे. जबरदस्ती करून ' माझ्यावर प्रेम करा ' असे सांगणे हे लज्जास्पद वाटत नाही काय ?

जर पुरुषाला वाटत असेल की पत्नीने त्याच्यावर खरे प्रेम करावे तर पुरुषानेसुद्धा तिच्यावर अतूट श्रद्धा ठेवली पाहिजे. भक्तिभाव दाखविल्यानेच भक्तिभाव मिळतो. एखाद दुसरी व्यक्ती भयभीत होऊन आपल्या कह्यात राहील असे मानणारा राजा असो, गुरू असो, किंवा पुरुष, तो महामूर्खच असला पाहिजे. त्याची इच्छा कधीच सफल होणार नाही, भयभीत मानवाचे प्राण बाह्यत: गुलामाप्रमाणे वर्तन करतील पण हृदयात तो विद्रोहाची भावनाच जपत असणार.

भयभीत होऊन प्रेम वृद्धिगत होत नसते.

# नारी-स्वातंत्र्य

काही दिवसांपूर्वी ' रॉयटर 'कडून तार आली होती की इंग्लंडमध्ये स्त्रियांना मताधिकार दिला गेला आहे. ' स्वदेशमित्रन् ' पत्रिकेत ह्या घटनेवर ' स्त्रियांचा विजय ' या शीर्षकाखाली संपादकीय टिपण पण प्रकाशित झाले. काल सायंकाळी मी जेव्हा माझे मित्र वेदांतशिरोमणी रामरायर आणि इतर काही लोकांच्याबरोबर बसलो होतो तेव्हा त्याच तारखेची ' स्वदेशमित्रन् ' पत्रिका हातात घेऊन मोट्टूवीथी गोपाल अय्यरची पत्नी वेदवल्ली तिथे आली.

वेदवल्लीचे वय चाळीस वर्षाच्या आसपास असेल. ती उच्चशिक्षित असून तमिळ आणि इंग्रजीचे तिचे अध्ययन आहे. थोडेफार संस्कृतसुद्धा ती जाणते. तिचे पती गोपाल अय्यर सरकारी नोकरीत अधिकारी होते. आता निवृत्त झाले आहेत. धनवान असल्यामुळे गोपाल अय्यर, आपली पत्नी आणि चार मुलाबाळांसह मोठ्या आरामात जीवन कंठीत होते. वेदवल्लीला त्यांनी पूर्ण स्वातंत्र्य दिले आहे. ती तिला वाटेल तिथे जाऊ शकते. ज्याच्याशी बोलावेसे वाटेल त्याच्याशी बातचीत करू शकते. घरी स्वयंपाक आणि इतर कामाला एक वृद्ध बाईही ठेवली आहे. तीच घरचे सर्व काम संभाळते. पुस्तके, वृत्तपत्रे, नियतकालिके आणि शास्त्र यांच्यासंबंधी बोलण्यात आणि सार्वजनिक सभा इत्यादीत वेदवल्ली आपला सारा वेळ खर्ची टाकते.

मी रामरायर वगैरेंना वेदव्यासकृत ब्रह्मसूत्रांवर शंकराचार्यांनी लिहिलेले अद्वैतभाष्य वाचून दाखवीत होतो आणि त्यावर चर्चा करत होतो.

त्याच वेळेला वेदवल्ली आली. आम्ही तिला बसण्यासाठी खुर्ची दिली. ती बसली आणि तिने प्यायला पाणी मागितले. मी जवळच बसलेल्या मुलीला पाणी आणण्यासाठी पिटाळले. वेदवल्लीने मला विचारले, " कोणत्या ग्रंथावर विचारविमर्श चाललाय् ?" मी म्हणालो, " शंकराचार्यांच्या भाष्यावर." ती हसली. म्हणाली, " अच्छा ! शांकरभाष्य ! भले शाबास ! भारतीयांसाठी स्वराज्याची मागणी करून ॲनी बेझंट स्वतःच एका जाळ्यात अडकल्या आहेत. त्या स्वतः तर आंग्ल स्त्री आहेत. परंतु इकडे आमच्या देशाचे शूरवीर, नरशार्दूल, शांकरभाष्याचा अभ्यास करून, त्याचं सार काढीत आहेत. शाबास ! शाबास !"

बस्, हे ऐकताच रामरायरचा पारा एकदम चढला. ताडकन् म्हणाला, " अहो ! जरा थांबाल तरी की नाही ! असं समजू नका की फक्त आपणच राजकीय बाबीच्या जाणकार आहात. "

" इंग्लंडमध्ये स्त्रियांना मताधिकार दिला गेलाय् " असे म्हणून वेदवल्लीने ' स्वदेशमित्रन् ' चा अंक रामरायरच्या चेहऱ्याच्या दिशेने फेकला. रामरायरने झट्दिशी तो

अडवला आणि खाली पडलेला अंक उचलून मुकाट्याने टेबलावर ठेवून दिला. छताकडे नजर लावली आणि चिंतामग्न होऊन बसले. इतक्यात मुलीने पाणी आणले. वेदवल्लीने आपली तहान भागविली. मग म्हणाली, " रामरायरमहाशय ! छताकडे पाहात काय बसलात ? तिथं काही लिहून ठेवलं आहे काय ? 'ब्रह्म सत्यं, जगन्मिथ्या'... म्हणूनच पंडितमंडळीनी खोट्याखोट्या गोष्टीवरच चर्चा करीत बसणेच योग्य– असं काहीसं लिहिलं असेल ? "

रामरायरचा चेहरा एकदम लालबुद झाला. त्यानी आपल्या मिशांना पीळ दिला. दाढीवरून हात फिरविला. नंतर जोरजोरात हसत सुटले.

श्रीमती ॲनी बेझंट यांचा राजकारणप्रवेश, स्वदेशी आंदोलनात त्यांचा पुढाकार, त्यांची ' वंदे मातरम् हाच जीवनमंत्र ' आहे अशी घोषणा...वगैरे गोष्टींशी रामरायर सहमत नव्हते. वेदाभ्यासीनी परब्रह्माचीच उपासना करीत राहावे, लौकिक विषयांकडे जरासुद्धा लक्ष पुरवू नये, असे त्यांचे मत होते.

वेदवल्ली रामरायरकडे पाहत म्हणाली, " प्रत्येक गोष्टीत ॲनी बेझंट जे सांगतात तेच सत्य आहे, प्रामाणिक आहे, असं आपण गळा फाडफाडून ओरडत होता ना ? आता स्वराज्यच श्रेष्ठ आहे असे म्हणताच त्याची निंदा करताहात तुम्ही. आहाहा ! कशी ही पुरुषांची जात ! स्त्रियांत जितकं सामर्थ्य आहे त्याच्या एक चतुर्थांशसुद्धा पुरुषात उरलेलं नाही. पुरुषांपेक्षा स्त्रियांचं आयुष्यमान अधिक असल्यामुळे शारीरिक दृष्टीनेही त्या सबल आहेत, ही गोष्ट सर्व देशांत सिद्ध झालेली आहे. तिची बुद्धी अधिक आहे हे तर उघडच आहे. काल आमच्या घरी एक आजोबा सांगत होते की एका मायावी हरिणाला खरं समजून सीता फसली होती. मी विचारले, " त्या सीतेचं म्हणणं खरं मानून त्या हरिणाची शिकार करायला गेलेल्या रामाची बुद्धी सीतेच्या बुद्धीपेक्षा कमी की अधिक ?" आजोबा खाली मान घालून बसले. जणू काही तोंडात मोदक भरले आहेत अशा प्रकारे गपचूप बसले. प्रत्येक बाबतीत स्त्री ही उत्तम आहे, श्रेष्ठ आहे, यात काहीही शंका नाही. "

" बडबड करण्यात स्त्रिया फार प्रवीण असतात, " रामरायर म्हणाले.

" आमच्या पुरुषमंडळीत एकही असा नाही की जो ॲनी बेझंटशी बरोबरी करू शकेल. त्यांनी गव्हर्नरसाहेबांबरोबरही संभाषण केले आहे. बोला ! तुम्ही गव्हर्नरसाहेबां-बरोबर बातचीत करू शकाल ?" वेदवल्लीने विचारले.

हे ऐकताच रामरायर उठून उभे राहिले, म्हणाले, " बरंय् ! मी जातो आता." मी दोन्ही पक्षांना शांत केले आणि शेवटी असे ठरले की वेदवल्लीने सर्वसामान्य पुरुषां-विरुद्ध जे पाहिजे ते बोलावे पण रामरायरांकडे अंगुलिनिर्देश करीत एक शब्दही बोलायचा नाही.

वेदवल्लीचे भाषण पुढे सुरू झाले---

जोपर्यंत हिंदुस्थानच्या स्त्रिया राजकारणात उतरत नाहीत तोपर्यंत पुरुषांनाही स्वातंत्र्य मिळणं संभवनीय नाही. जुन्या जमान्यात भारतवर्षात पुरुषांची जी अवस्था होती, त्यासंबंधी मी अनेक कहाण्या वाचल्या आहेत. परंतु आजच्या पुरुषवर्गासंबंधी तसं काहीही बोलता येत नाही. हिंदुस्थानातील महिला राजकारणात पडतील तर त्या ॲनी बेझंटबाईंबरोबर कार्य करतील. येथील पुरुषमंडळी वेदांतचिंतन आणि गुमास्तेगिरीच्याच कामाला लायक आहेत. देशाच्या कल्याणासाठी, साहसाने आपले ध्येय गाठण्यासाठी आवश्यक असलेली अथक परिश्रमाची कास आणि प्रतिभा इथल्या पुरुषात मुळातच कमी आहे. सरोजिनी नायडू किती साहसपूर्ण आवेशात बोलतात ? पाहिलंय् आपण ? मला तरी वाटतं की जगात कोणत्याही पुरुषापेक्षा स्त्रीची बुद्धी आणि धैर्य जास्त असते. इतर देशांची गोष्ट सोडा, आपल्या देशातील स्त्रीमध्ये जितकं धैर्य आणि बुद्धी दिसते, तितकी पुरुषात नाही. पाहा ना, इंग्लंडमध्ये कसे पुरुषांना वश करून मताधिकार प्राप्त करून घेतला गेला ?

त्यामुळे आता तर... पुढच्या वेळेस कॉंग्रेसवाले स्वराज्याची मागणी करण्यासाठी इंग्लंडला जातील तेव्हा तेथील पुरुषांकडे प्रार्थना करून भागायचं नाही तर तेथील स्त्रियांचीही विनवणी केली पाहिजे. म्हणूनच येथून केवळ पुरुषांचे दल जाऊन चालणार नाही. तेथील स्त्रिया येथील पुरुषांकडे आदरपूर्ण दृष्टीने पाहणार नाहीत. म्हणून कॉंग्रेसनं स्त्रियांचं प्रतिनिधीमंडळ पाठविणंच अधिक रास्त ठरेल. मला स्वतःला इंग्रजी येतं. मला पाठविलं तर तिथल्या स्त्रियांना येथील परिस्थिती समजावून सांगेन आणि त्यांच्या सहकार्याने भारताला मताधिकार मिळवून देईन मी. हो ना, स्त्रीची महनीयता स्त्रीच जाणू शकेल. तुमच्यासारख्या लोकांना सांगून काय उपयोग ?"

रामरायर म्हणाले, "ठीक आहे ! आता दुसऱ्या कुठल्या तरी विषयावर बोलू या."

अशा प्रकारे रामरायरना विषय बदलताना पाहून वेदवल्लीपण नाराज झाली. म्हणाली, "मी यांच्याकडे अंगुलिनिर्देश करून काहीही बोलले नव्हते. त्यामुळे ह्यांनी गप्प बसायला हवे होते की नाही ? चर्चा सुरू व्हावयाच्या वेळी जी अट घातली होती ती इतक्या लवकर हे विसरले." असे म्हणून ती निघून गेली.

मी तिला खूप समजावले पण ती बधली नाही. ती म्हणाली, "ज्या सभेत ते आहेत तिथं मी असणार नाही." वेदवल्ली गेल्यानंतर रामरायर काहीबाही पुटपुटत राहिले.

मी विचारले, "काय म्हणत होता आपण ?"

"काही नाही ! स्त्रियांना स्वातंत्र्य देणं नितान्त आवश्यक आहे !"

आम्ही परत शांकरभाष्यावर चर्चा करू लागलो.

कुठल्याही प्रकारचे गुलाम का असेनात, त्यांना स्वातंत्र्य दिले की युगप्रलय होईल, ब्रह्मांड तुटूनफुटून जाईल. जगाचा सर्वनाश ओढवेल—

असे म्हणणे अशा प्रशासकांचे आहे की जे गुलामांवर हुकूमत गाजवीत आहेत.

वीस–तीस वर्षांपूर्वी तमिळनाडूत काही लोकांचे म्हणणे होते की स्त्रियांत शिक्षण-प्रसार झाला की त्या चारित्र्यहीन बनतील. आता तर तमिळनाडूमध्ये स्त्रीशिक्षणप्रसार इतका झाला आहे परंतु ब्रह्मांड मात्र तुटूनफुटून गेले नाही. आजपर्यंत सुरक्षित आहे. परंतु आता बरेचसे लोक भयग्रस्त आहेत की जर स्त्रीला पूर्ण स्वातंत्र्य दिले गेले तर सप्तपाताळ भूलोकावर तुटून पडतील, धूमकेतूसारखे ग्रह–नक्षत्र मध्ये पडून नाश पावतील. 'मद्रास–मेल' च्या आंग्ल संपादकाला जाऊन विचारा की भारताला स्वातंत्र्य दिले तर काय होईल ? ते एक दीर्घ नि:श्वास टाकून म्हणतील–" जर भारताला स्वातंत्र्य दिलं तर पंजाबी लोक रजपुतांना मारतील, मग रजपूत महाराष्ट्राच्या लोकांना जीवानिशी मारतील, मग तर महाराष्ट्राची मराठेमंडळी तेलुगू, मल्याळी, कानडी लोकांना खतम करतील. मल्याळी तमिळ ब्राह्मणांचे आणि तमिळ द्राविडी ब्राह्मणांचे तुकडे तुकडे करून टाकतील. अशा अवस्थेत द्राविड लोक बंगाल्यांची हाडं मोडून त्यांच्या माळा बनवून गळयात घालतील."

हाच प्रश्न जज्ज अय्यर, केशवपिल्ले, चिदंबर पिल्ले यांच्यासारख्यांना विचारला तर ते म्हणतील, " अशी कोणतीही मोठी विपत्ती येणार नाही. स्वराज्य मिळाले तर आमचे कष्ट कमी होतील, दुष्काळ पडला तर तो निभावून नेण्याची क्षमता आमच्यात येईल. दुष्काळामुळे कुणी मृत्युमुखी पडणार नाही. दुसरं काही नाही."

स्त्रीला स्वातंत्र्य दिले तर समाजात खळबळ माजेल असे म्हणणारे आपल्या नजरेसमोर त्यांचे स्वतंत्र जीवन पाहणे पसंत करू इच्छित नाहीत. म्हणूनच मत्सराने ते असे बोलतात. इतकेच. स्वातंत्र्य म्हणजे काय ? स्वातंत्र्य दिले तर स्त्रियांची स्थिती कशी होईल ? स्त्रीला स्वातंत्र्य कशासाठी द्यायचे ? तिला घरातून बाहेर हाकलून द्यावे काय ? शेवटी काय करावे लागेल ? अशा प्रकारच्या शंका निर्माण होतात. अशा शंका ज्या वेळी निर्माण होतात त्या वेळी हाच विचार करायचा की स्वातंत्र्याचा खरा अर्थ काय आहे ? याचे उत्तर देणे तसे सोपे आहे.

दुसऱ्यावर आघात न करणे, न मारणे, न पिटणे, शिव्या न देणे, त्याच्या मेहनतीचे फळ आपण न चाखणे ! शिवाय—स्वत:च्या इच्छेप्रमाणे जो जे चाहील ते करू देणे ! अशा स्थितीत जो असेल तो स्वत:ला 'स्वतंत्र' समजू शकेल. हर्बर्ट स्पेन्सरने म्हटले आहे, की दुसऱ्यांना क्षती न पोहोचवता जो स्वच्छेने कार्य करू शकतो, तोच स्वतंत्र होय.

ह्या विचाराच्या अनुषंगाने पाहिले तर जगातील बहुंताश पुरुषही स्वतंत्र नाहीत. परंतु ह्या ' स्वातंत्र्या 'च्या प्राप्तीसाठी प्रत्येक देशाचा पुरुषवर्ग झगडा करीत आहे. एकमेकांचे गुलाम होऊन राहणे, हे पुरुष मंडळीला असह्य वाटते, अन्यायकारी वाटते. परंतु ह्यापेक्षा हजारपटीने अधिक दुःख स्त्रीवर्गाला गुलामगिरीत ठेवल्याने होते.

परतंत्र, गुलाम देशातमुद्धा पुरुष–( गुप्त पोलिसाच्या नजरेत आले नाही तर )–स्वेच्छेने जेथे जावेसे वाटेल तेथे जाऊ शकतात. हिंडू फिरू शकतात. एकटे जाणे नियमबाह्य नाही. परंतु असे देशसुद्धा आहेत की जेथे स्त्री आपल्या इच्छेने एकटी हिंडू फिरू शकत नाही. आपल्या देशातील अधिकांश भागात हीच परिस्थिती आहे, यामुळे मला फार दुःख होते.

अहो ! स्त्रीला एकटे बाहेर पडू दिले तर अनर्थ होईल, ब्रह्मांड कोसळेल, कोठलाही नियम अथवा बंधन राहणार नाही, लोक पशुसमान होतील–असे तमिळनाडूचे काही सनातनी लोक मानतात, ते योग्य नाही. युरोप आणि अमेरिकेत स्त्रिया मनमाने हिंडतात, फिरतात म्हणून तेथे भूकंप होत नाहीत. आपल्यातील पुष्कळ लोक श्रीमती ॲनी बेझंट याचे नाव मोठ्या आदरपूर्वक उच्चारतात, त्यांची प्रशंसाही करतात. मग जर मी म्हणालो की त्यांच्यासारख्या आपल्या स्त्रियासुद्धा राहाव्यात, तर लगेच माझे म्हणणे खोडून काढले जाईल. ह्याचे कारण काय ? युरोपीय महिलांपेक्षा आपल्या महिला अविश्वसनीय आहेत काय ?

युरोपियनांचे उदाहरण आपल्या संदर्भात गैरलागू होईल. आपण आर्य आहोत, द्रविड आहोत. ते तर युरोपचे आहेत. अशा प्रकारची अडचण काही निर्माण करू शकतील.

ठीक आहे. भारतात महाराष्ट्रीय महिला स्वेच्छेनुसार आचरण करू शकतात. पण तमिळनाडूत नाही. असे का ?

स्त्री–स्वातंत्र्याच्या संदर्भात प्रमुख गोष्टी–प्रारंभीच्या पायऱ्या म्हणा हवं तर—पुढीलप्रमाणे आहेत :

१. वयात येईपर्यंत स्त्रीचा विवाह करता कामा नये.
२. तिच्या इच्छेविरुद्ध कुणाशीही तिचा विवाह करण्याची जबरदस्ती होता कामा नये.
३. विवाहोत्तरसुद्धा जर ती आपल्या पतीबरोबरचे संबंध तोडून टाकू इच्छित असेल तर तिला अनुमती दिली पाहिजे. तिचा घडोघडी अपमान ह्या गोष्टीसाठी करू नये.
४. पित्याच्या संपत्तीत मुलींचाही योग्य हिस्सा असला पाहिजे.
५. पतीच्या मृत्यूनंतर जर कुणी स्त्री पुनर्विवाह करू इच्छित असेल तर तिला विरोध होऊ नये.

६. कुमारिका राहून जर कुणी स्त्री व्यापार अथवा दुसरा एखादा व्यवसाय करून अभिमानाचे जीवन जगू इच्छित असेल तर तिला स्वेच्छेने पोटापाण्याचा व्यवसाय निवडण्याची संधी मिळाली पाहिजे.
७. पतीशिवाय अन्य पुरुषाला न भेटणे, त्याच्याशी न बोलणे अशा मत्सराने प्रेरित होऊन केलेल्या नियमांना तिलांजली दिली जावी.
८. उच्च शिक्षणाच्या सर्व क्षेत्रांत स्त्रियांना पुरुषांबरोबर स्थान मिळावे.
९. योग्यताप्राप्त स्त्री जर सरकारी नोकरी करू इच्छित असेल तर त्याला कायद्याची आडकाठी नसावी.
१०. पुरुषांनाही जेथे राजकीय हक्कांपासून वंचित राहावे लागत आहे, अशा तमिळनाडूतील स्त्रीवर्गाच्या राजकीय हक्कासंबंधी काही बोलणे निरर्थकच ठरेल. तरीसुद्धा, जर नजीकच्या भविष्यकाळात स्वातंत्र्य मिळाले तर स्त्रियांनाही तितकेच राजकीय हक्क दिले जावेत. आंग्लमहिला ॲनी बेझंट यांनी गतवर्षी कॉंग्रेस अधिवेशनाचे अध्यक्षपद भूषविले होते, हे विसरता कामा नये.

अशा तऱ्हेने आपण स्त्रियांच्या उन्नतीचा मार्ग दाखविला तर त्या आपल्या प्रयत्नांची शिकस्त करून पूर्ण स्वातंत्र्य मिळवून मानवजातीची सुरक्षा करतील. तसेच प्राचीन काळच्या ऋषिपत्नीप्रमाणे उन्नत स्थानावर आपल्या महिलाही पोहोचू शकतील. स्त्रियांना पशुतुल्य लेखून मनुष्य म्हणून राहण्याचा आपला प्रयत्न म्हणजे निव्वळ मूर्खपणा होय.

नारीची उन्नती झाली नाही तर नराची उन्नतीही होणार नाही.

## तमिळनाडूचा समाज आणि संस्कृती–

तामिळी लोकांच्या सभ्यतेबद्दल मी आपल्या मागच्या लेखात काही गोष्टींचा उल्लेख केला. आता त्याच मुद्द्यांवर विस्ताराने येथे लिहीत आहे. प्राचीन काळी तामिळ संस्कृतीत स्त्रियांना अधिक स्वातंत्र्य मिळत असे. ह्याचे महत्त्वाचे कारण होते– तमिळनाडूची भौगोलिक दृष्ट्या तटबंदी करणाऱ्या केरळ प्रदेशातील लोकांची राहणी आणि तामिळ समाज यांचा अगदी निकट संपर्क. केरळी लोकांत स्त्रीला जास्त महत्त्व दिले जाते.

अतिप्राचीन तमिळ भाषा आणि जवळजवळ तितकीच प्राचीन मल्याळी भाषा खरे तर एकच. त्या काळात पण चेर्‌नाडू (आताचे केरळ) तमिळनाडूचाच एक भाग मानले

जाई. सर्व चेर राजेमंडळी तामिळीच होती ते तमिळनाडूच्याच राजांमध्येच गणले जात असत. भाषेप्रमाणेच संस्कृतीच्या दृष्टिकोणातूनसुद्धा अतिप्राचीन काळची तमिळ संस्कृती आणि केरळीय संस्कृती एकच होत्या.

त्या काळापासून पहाडांनी घेरलेला केरळप्रदेश शक्य होईल तितके प्राचीन तमिळ संस्कृतीचे रक्षणच करत आला आहे. पहाडीच्या इकडच्या भागाची पूर्वेकडील मैदानावर जोपासलेली तमिळ संस्कृती, तेलुगू आणि तत्सम उत्तर भारतीय संस्कृतीमुळे प्रभावित झाल्यामुळे दिवसेंदिवस बदलत गेली आणि हिंदुस्थानच्या आम संस्कृतीचे ती अनुकरण करू लागली.

परंतु केरळीयांनी मात्र आपली संस्कृती, आपल्या रीतीभाती बदलल्या नाहीत. साधारणत: सर्व जगातील पहाडी प्रदेशांत राहणाऱ्या लोकांना वाघ, चित्ता, अस्वल, कोल्हा वगैरे वन्य प्राण्यांपासून संरक्षण करत, पर्वतराईवरील उन्हाळा, थंडी, पाऊस आणि वणवा यांच्यापासून बचाव करत मोठ्या कष्टाने जीवन कंठावे लागते. म्हणूनच हे लोक पठारावर राहणाऱ्या लोकांप्रमाणे आपल्या स्त्रियांच्या बाबतीत इतके अनुदार आणि कठोर होत नसावेत. अगदी उलट म्हणजे आदरपूर्वक, प्रेमपूर्ण आणि दयाशील व्यवहार असतो त्यांचा. युरोपात स्वित्झर्लंड ह्या देशाच्या पर्वतमय भागातील स्त्रियांना इतर प्रदेशांतील स्त्रियांपेक्षा अधिक स्वातंत्र्य आहे. त्या अगदी पूर्ण स्वातंत्र्य उपभोगत जीवन जगत असतात.

केरळ देशात स्त्रिया नुसत्याच स्वतंत्र आहेत असे नाही तर वडिलोपार्जित संपत्तीचा वाटाही त्यांना मिळतो. केरळीय संस्कृतीच्या संपर्कामुळे प्रभावित होऊन तमिळनाडूतसुद्धा इतर प्रांतातील स्त्रियांपेक्षा अधिक स्वातंत्र्य मिळत आहे. इस्लामी संस्कृतीच्या प्रभावामुळे उत्तरभारतातील कुलीन मुस्लिम कुटुंबातील स्त्रियांना बुरखा घालण्याची प्रथा अवलंबावी लागली होती, पण त्यावेळीसुद्धा तामिळनाडूच्या संस्कृतीच्या प्रभावामुळे तेलुगू आणि कन्नड प्रदेशांतसुद्धा बुरखा पद्धतीचे अनुकरण झाले नाही.

अखिल जगतात स्त्रीसंबंधीचे कायदेकानू पुरुषानेच ठरविले. ह्या शास्त्राचा रचयिता तोच आहे. राजकारणासंबंधी गोष्टीत जरी तमिळनाडूच्या स्त्रिया एका मर्यादेपर्यंत पुरुषांनी केलेल्या नियमांच्या अधीन असल्या तरी सार्वजनिक नीतिमत्तेसंबंधीच्या गोष्टीत 'औवेयार'ची नीतिवचने व नीतिग्रंथ हेच तमिळनाडूत प्रमाण ठरले. पुरुषवर्गातील सुशिक्षित लोकच समाजासंबंधी असलेल्या आणि सार्वजनिक हिताच्यासाठी वलकुवरचे कुरळ, नालडियार ह्यांना प्रमाण मानतात. अशिक्षित आणि अर्धशिक्षित वर्गाच्या लोकांत स्त्रीपुरुषांसाठी औवेयारची नीतितत्त्वेच मार्गदर्शक ठरतात. सामान्यरूपाने गेल्या दोन हजार वर्षांपासून तमिळनाडूच्या जनतेला औवेयारचे नीतिग्रंथच प्रमाणभूत वाटतात.

असे समजणे अयोग्य ठरेल की सर्वसामान्य जनताच फक्त औवैयारच्या नीति-

वचनांना मानते आणि शिक्षित लोक आणि राजेरजवाडे त्यांची उपेक्षा करतात. शिक्षित लोक, राजेमंडळी, तमिळभाषा बोलणारे... या सर्वांना कुरळ, नालडियार या ग्रंथांपेक्षा औवैयारच्या ग्रंथासंबंधी अधिक श्रद्धा आणि आदर वाटतो. परंतु काही लोकांचे म्हणणे असे आहे की दोन हजार वर्षांपूर्वीचे हे नीतिग्रंथ औवैयारने लिहिलेले नाहीत. जवळजवळ एक हजार वर्षांपूर्वी दुसरी एक औवैयार होऊन गेली तिने हे रचले आहेत.

औवैयार ही केवळ लेखिकाच होती असे नाही तर ती कुशल राजकारणपटू पण होती. तिला तमिळनाडूच्या राजामहाराजांकडून मोठमोठे सन्मानही प्राप्त झाले होते आणि राजदूत होण्याचे भाग्यही लाभले होते. ह्याच्याशिवाय ती मोठी ज्ञानी होती. योगसिद्धीच्या द्वारे तिने आपले शरीर वृद्धापकाळ, रोगराई आणि मृत्यू यांच्यापासून चिरकाळपर्यंत दूर ठेवले होते.

**" मासंद्र कोळगं मनत्तमैन्दक्काल**
**ईसनैक्काट्टुम उडम्बु."**

म्हणजेच " कपटकारस्थान, भयदोष आणि वैरभाव यांतून मुक्त होऊन, हृदयात केवळ पवित्र विचारच असले तर शरीर दैवीशक्ती अर्थात् अमरत्व मिळवू शकेल," ह्या दोह्याची कवयित्री औवैयार आहे. तिच्या जीवनाकडे दृष्टिक्षेप केला तर कळून येते की वरील सिद्धांताचे पालन ती यथाशक्ति करीत होती.

मागच्या लेखात लिहिले होते की कोणत्याही देशाच्या संस्कृतीचा परिचय त्या देशात निर्माण झालेल्या साहित्यकृतींमुळे होतो. उदाहरणार्थ, शेक्सपिअरसारख्या महाकवीच्या साहित्यकृती आंग्ल संस्कृतीचे मानदंड समजल्या जातात. मेकॉले नावाच्या एका इंग्रजाचे म्हणणे आहे– " भले आम्ही भारतावरचा आमचा अधिकार सोडायला तयार होऊ, परंतु शेक्सपिअरला मात्र कधीही सोडायला तयार नाही."

आम्ही सुद्धा कवी कंबन, तिरुवळ्ळुवर, क्ष्लितिकारम्‌चा रचयिता इलंगो अडिकळ यांना हेच गौरवाचे स्थान देऊ शकतो. यांच्याव्यतिरिक्त इतर काही कवींचीही नावे घेऊ शकतो. परंतु कंबन आणि तिरुवळ्ळुवर यांच्याहून श्रेष्ठ मानल्या गेलेल्या औवैय्यारचे नाव विशेष उल्लेखनीय ठरेल. जर आपल्याला कोणी विचारले की– तमिळनाडूच्या अमूल्य अशा ठेव्यातून तुम्ही काय सोडायला तयार व्हाल ? औवैयारची ग्रंथसंपदा की इतर कुठलाही निधी ? तर आम्हाला त्वरित उत्तर द्यायला हवे की— इतर कुठलाही ठेवा, वा धन लुटले गेले तरी चालेल, काही फरक पडणार नाही कारण तमिळनाडू ते धन परत संचयित करण्यास समर्थ ठरेल पण औवैयारच्या ग्रंथांना सोडण्यास कदापिही तयार नाही. तो एक असा अमोल ठेवा आहे की ज्याची पुनर्निर्मिती असंभवनीय आहे. तमिळ समाज आणि संस्कृतीसंबंधी अद्वितीय असा साठा असलेले

एका तमिळ महिलेचे ग्रंथ जे ज्योतिर्मय अमर दिव्याप्रमाणे आहेत त्या दिव्याशी नाते सांगता येणे ही आमच्या देशातील स्त्रियाना किती हर्षाची बाब आहे ! हो ना ? तमिळनाडूच्या स्त्रियांसाठी तर ही केवळ अभिमानास्पद बाबच नसून, त्यांचे संरक्षण करणारीही आहे...ज्या मातीत औवेयारने जन्म घेतला, त्याच मातीत जन्म घेतलेल्या ह्या स्त्रियांना पुरुषापेक्षा स्त्रीची बुद्धी कमी प्रतीची आहे असे म्हणून कुणी कमी लेखू शकत नाही. उदाहरणासाठी इंग्लंडचेच पाहा. तेथे पुरुषांबरोबरीने स्त्रियांना मताधिकार देण्याला विरोध करणाऱ्याचा दावा आहे की स्त्रियांची बुद्धी आणि ज्ञानप्रतिभा पुरुषांपेक्षा निसर्गतःच कमी आहे, म्हणून त्या केवळ गृहकृत्यासंबंधीच्या कामाला योग्य आहेत. राजकारणादी गोष्टी सांभाळण्याची क्षमता त्यांच्यात नसते. ह्या मताच्या पुष्टिप्रीत्यर्थ ते शेक्सपिअरचा हवाला देतात. म्हणतात— " शेक्सपिअरशी स्पर्धा करील अशी प्रतिभाशाली कवयित्री एक तरी आपल्या देशात जन्मली का ? नाही ना ? ह्यावरूनच स्पष्ट होते की स्त्रिया बुद्धी आणि प्रतिभा दोन्हीत पुरुषांपेक्षा कमी आहेत."

ही तर्कसंगती तमिळ भाषेच्या संदर्भात लागू पडत नाही. किंबहुना ह्याच्या अगदी उलट तमिळनाडूच्या स्त्रिया दावा करू शकतील की औवैयारच्या तोडीची कविता आणि नीतिशास्त्राची रचना करणाऱ्या पुरुषाचा जन्म का झाला नाही ? ह्यावरून असे निदान काढता येईल की निसर्गतः पुरुषाचीच बुद्धी आणि प्रतिभा स्त्रीच्या तुलनेत कमी आहे.

थोर आत्मज्ञानी औवैयारद्वारा रचित ' **औवै कुरळ्** ' नावाचा ग्रंथ तमिळनाडूतील योगी आणि सिद्ध पुरुषांच्या दृष्टिकोणातून उपनिषदांशी तुलना करू शकतो. योगशास्त्र आणि मोक्षशास्त्र यांच्या दृष्टीतून हा ग्रंथ विशेष अभ्यसनीय आहे. ह्याशिवाय ' योगानुभूती ' वर लिहिताना लोकांची अशी विचारधारणा असते की ह्या अनुभूतीचे विवरण करताना क्लिष्ट, गूढ आणि असाधारण शब्दांचा किंवा वाक्यांचा वापर अनिवार्य ठरतो. परंतु औवैयारचे ग्रंथ सर्वसाधारण व्यक्तीला समजतील इतक्या साध्या आणि सोप्या भाषेत लिहिले गेले आहेत. मोजक्या शब्दांत मार्मिक सत्यांची अभिव्यक्ती काव्य आणि कला या क्षेत्रात उन्नत प्रतिभेच्या साहाय्यानेच शक्य आहे. औवैयार ह्या बाबतीत अद्वितीय होती. प्रतिभावान् कवीसुद्धा अतिशय सूक्ष्म आणि मार्मिक अश्या बाबी अगदी सर्वांना समजतील अशा भाषेत मांडता येणे हे असामान्य प्रतिभेचे लक्षण मानतात. अशा प्रतिभेला तेही अलौकिक देणगी समजतात. ज्या कवीजवळ अशी अलौकिक प्रतिभा नसते त्यांना असे करणे असंभवनीय वाटते. काव्याच्या क्षेत्रातसुद्धा कवित्वाच्या बाबतीत औवैयारला प्रतिस्पर्धीच नाही.

पुरुषार्थ म्हणजेच मानवजन्म प्राप्त झाल्यामुळे धर्म, अर्थ. काम, मोक्ष ह्या चार अर्थांची प्राप्ती. त्यातील ' वीडु ' म्हणून ओळखला जाणारा मोक्ष, मन आणि वचन

यांचे अगोचर होणे यासंबंधीचा साकल्याने विचार करण्याऐवजी मोक्षप्राप्तीचे साधन असलेल्या ईश्वरभक्तीसंबंधी पहिल्या अध्यायात सांगून इतर तिन्ही पुरुषार्थांची व्याख्या तिरुवळ्ळुवरने आपल्या त्रिखंडात्मक 'मुप्पाल' नावाच्या तिरुक्कुळात केली आहे. एक हजार तीनशे तीस 'कुरळा'तील छोटचा पदांत तिरुवळ्ळुवरने धर्म, अर्थ, काम आदि तिन्ही पुरुषार्थतत्त्वाचे जे प्रतिपादन केले आहे ते त्याच्या अलौकिक प्रतिभेचेच लक्षण मानले जाते. ह्यावर औवैयारने 'मोक्षा' सकट चारी पुरुषार्थांना एका छोटचा 'वेणबा' (तमिळ काव्याचा एक छंदप्रकार) मध्ये अवगुंठित केले. तो अद्भुत् 'वेणबा' अशा प्रकारे आहे–

**" ईवलरम् : तीथिनैविट्टिडल, पोरुल, एंगजानुरुम, कादलित्तवर करुत्तोरुमित्तू आदरवु पट्टदे इन्बम्; परनै निनैन्दुइम् मूनुरुम विट्टदे पेरिइन्बवीडू."**

अर्थ अशा प्रकारे आहे—" दानशीलता—म्हणजेच जगातील लोकांच्या उपकारासाठी आपले धन—धन तसेच प्राण—अर्पण करणे; आपल्या तनाने, वचनाने, शरीर आणि मनाने, कर्माने दुसऱ्यांचे दुःख दूर करून त्यांचे हित करणे; धन देणे म्हणजेच दानशीलता, असा चुकीचा अर्थ काही लोक लावतात. दुसऱ्यासाठी आपले प्राण वेचणे, ही सुद्धा दानशीलताच. धनोपार्जनासारख्या आधिभौतिक सुखांच्या प्राप्तीसाठी स्वतः योग्यता मिळविण्यासाठी शिक्षण देणे हे दानशीलतेचे लक्षण नव्हे काय ?"

कुठलीही अपेक्षा न ठेवता इतरांचे कष्ट निवारण करण्यासाठी जी मदत केली जाते ती सुद्धा दानशीलताच आहे. हाच मानवमात्राचा ह्या जीवनातील धर्म आणि कर्तव्य होय. आता सांगा, आर्य कुणाला म्हणावे ? दुराचरण अथवा दुष्कर्म न करता, आपल्या बुद्धी आणि शारीरिक श्रमाने मिळवलेले अन्न, वस्त्र व जीवनावश्यक वस्तू, घोडागाडया, अलंकार, वाजंत्री, शिलामूर्ती आदि भोगविलासाच्या वस्तू, आणि त्या भोगण्यासाठी घरदार, बागबगीचा इत्यादी, तसेच ह्या वस्तू प्राप्त करण्याच्या हेतूसाठी मानवनिर्मित विनिमयाचे साधनरूपात स्वीकृत, सोन्याचांदीची नाणी, कागदी नोटा आदि धन म्हणजे अर्थ मानले जाते. सत्कर्माने मिळविलेले धनच सुखदायक असते, दुष्कर्म करून मिळविलेले धन वेगवेगळया दुःखांचेच कारण बनते. म्हणूनच दुष्प्रवृत्तींचा त्याग करून सत्कर्माने जे धन मिळविले जाईल तेच 'अर्थ' म्हणवून घेण्यास प्राप्त ठरेल. दुष्कर्मांच्या द्वारा जो धनसंचय होईल तो दुःखाचे भांडार ठरेल—असे औवैयारने सांगितले आहे.

आता '**इन्बम्**' साठी औवैयारने जी परिभाषा योजिली आहे, ती महत्त्वाची आहे. आपल्या पूर्वजांनी प्रेमाच्या सुखाला 'इन्बम्' म्हटले. धनसंचय करून धर्माची कास धरताना अगदी अल्प प्रमाणात सुखप्राप्ती होईल परंतु प्रेमामुळे मिळणाऱ्या सुखासाठी, त्याचा आनंद द्विगुणित करण्यासाठी उपयोग होईल, म्हणून एका विशिष्ट मर्यादेपर्यंत

त्यात सुख मानता येईल. मनुष्यप्राणी स्वादिष्ठ पदार्थ खाणे, सुगम आणि मधुर संगीत श्रवण करणे, सुवासिक फुलांचा सुगंध घेणे आदि पंचेंद्रियांच्या सुखद अनुभवांचा अभिलाषी होऊन असे अनुभव घेण्यासाठी खूपच धडपडतो. अधिकारसुख, कीर्तिसुख... अशा असंख्य छोटयामोठया सुखांच्या मागे पळत राहतो. त्यांच्या प्राप्तीसाठी प्रयत्नांची पराकाष्ठा करतो. परंतु ही सर्व क्षणभंगुर अल्प अशी सुखे आहेत असे मानून आपल्या पूर्वजांनी त्यांचा ' इन्बम् ' ह्या गटात समावेश केलेला नव्हता. कीर्ती आणि अधिकार आदींना ' धर्म ' आणि ' अर्थ ' याचे फलित म्हणून गणले होते. इंद्रियसुखे, गोड पक्वान्नांचे सेवन, मधुर फलाचा आहार, सुगंधित फुलांचा गंध आदी-पासून मन लवकरच उदासीन होईल. या व्यतिरिक्त केवळ शारीरिक सुख मिळविण्याचे जे मार्ग आहेत, ते आत्मिक सुखाच्या प्राप्तीत फारशी मदत करू शकत नाहीत–म्हणून त्यांना ' इन्बम् ' म्हणजे कामखंडात समाविष्ट केलेले नाही. (तमिळमध्ये वासना-रहित सुखाला ' इन्बम् ' म्हणतात.)

" कंडु केट्टु उंडुयित्तुंरंरियु मैपुलनुम्
ओण्तोडीळ कण्णवुळ."

ह्या पदाचा (= कुरळाचा) अर्थ असा आहे–" पंचेंद्रियाच्या सुखाची उपलब्धी प्रकाशमान रूप, स्पर्श, गंध, रस, शब्द आदि आभूषणांनी सजलेल्या ह्या नारी-मध्येच आहे."

प्रेमसुख–म्हणजे ' इन्बम् '–मन, प्राण आणि आत्मा याना एकसाथ सुख मिळाल्याने त्या सुखाची अनुभूती सर्व आधिभौतिक सुखांत विशिष्ट आणि अलौकिक अशा प्रकारची असते. म्हणून मानवजन्म घेऊन एखाद्या व्यक्तीला ज्या पुरुषार्थाची प्राप्ती करावयाची आहे, त्यासंबंधी विचार करताना आपल्या पूर्वजांनी प्रेमसुखालाच ' इन्बम् ' असे संबोधिले आहे. सर्वसाधारणपणे ' इन्बम् 'च्या नावाने जे सुख विशेष मानले गेले आहे, ती सुखद अनुभूती म्हणजे प्रेमानुभूतीच आहे. या अलौकिक अनुभूतीला निश्चल रूपाने भोगण्याचा, अनुभवण्याचा मार्ग कोणता, हे औवैयारने सुंदर, मधुर परंतु योग्य शब्दांत सांगितले आहे.

औवैयारने म्हटले आहे की, पुरुषाचे स्त्रीवर, स्त्रीचे पुरुषावर प्रेम असावे आणि ती दोघे मन, वचन, कर्म यांच्याद्वारे पातिव्रत्य सांभाळून एकमेकांशी दृढ राहतील तर एक-मन होऊन परस्परांवर अनुरक्त होऊन मीलनसुख लुटतील; त्या त्यांच्या मीलनानु-भूतीला ' इन्बम् ' म्हणता येईल.

आता ' मोक्ष ' (= वीडु) चा अर्थ काय, ह्यासंबंधी विचार करू या. परमेश्वराची आपल्या हृदयसिंहासनावर प्रतिष्ठापना करून, ' स्व 'त्वाची भावना त्यजून, ईश्वरी इच्छेला प्रमाण मानून वर उल्लेखिलेल्या तीनही पुरुषार्थांपासून अलिप्त राहणे म्हणजेच

'मोक्ष' ! ही 'मुक्ती' प्राप्त करण्यामुळे कोणी तीनही पुरुषार्थांपासून वंचित होईल असे मानणे चुकीचे ठरेल. जोपर्यंत शरीरात प्राण आहेत तोपर्यंत ईश्वरदत्त शक्ती कुणालाही निष्क्रिय होऊ देणार नाही.

भगवद्गीतेत भगवानांनी सांगितले आहे की कुणीही पुरुष (मनाने, वचनाने, तनाने) एक क्षणभर का होईना काहीही न करता राहू शकत नाही. निसर्गत: प्राप्त गुणांमुळे प्रत्येक जण नाइलाजाने सतत कर्मरतच राहतो.

औवैयारच्या ग्रंथातील उद्धृतांच्या साहाय्याने, तिची वचने आणि सुभाषिते सांगत कवयित्रीच्या प्रतिभेसंबंधी काही सांगावयाचे तर खूप पृष्ठे खर्ची टाकावी लागतील. माझा लेख तर आताच किती तरी मोठा झाला आहे. ह्या महान् प्रतिभाशाली कवयित्रीसंबंधी आजच्या पिढीने माहिती करून घेण्यासारख्या महत्त्वपूर्ण आणि अत्यावश्यक वाटणाऱ्या बाबींपैकी अजून एकच ह्या लेखात सांगण्याचा माझा मानस आहे.

आदर आणि स्नेहाला पात्र असलेल्या तमिळनाडूच्या माझ्या भगिनींनो ! ह्या प्राचीन गौरवशाली तमिळनाडूच्या समाज आणि संस्कृतीचे भविष्य आपल्या शिक्षण आणि साधनेवर अवलंबून आहे. ह्या समस्त भूमंडलात अद्वितीय आणि अनुपम क्षेम-निधीसाठी परमेश्वराने आपल्याला संरक्षिका बनविले आहे. आज ह्या घडीला हे जग प्रचंड आणि प्रलयकारी वादळाइतक्या भयंकर उद्रेकामुळे उलथापालथ करणाऱ्या संघर्षामुळे, भोवऱ्यामुळे खळबळ माजलेल्या समुद्रातील हेलकावे खाणाऱ्या, बुडायला आलेल्या, गिरक्या खाणाऱ्या, टकरा खाणाऱ्या, एखाद्या छोट्या नावेप्रमाणे चाल-लेले आहे.

परमेश्वर कृपा करो आणि ह्या महाप्रलयात तमिळ समाज आणि संस्कृती भग्न न होवो. परमात्म्याने आपल्यावर कृपावंत होऊन आपली विद्या, बुद्धी, चारित्र्यशीलता, स्वातंत्र्य यांच्या साहाय्याने ह्या महान संस्कृतीला नष्ट होण्यापासून वाचवावे !

## तृतीय खंड—समाज

1. जातपात
2. पुरातन जग
3. पशुपक्षी
4. अनंतशक्ती
5. तमिळ भाषा
6. मुक्ती
7. संस्कृतीचा मूलस्रोत

## जातपात

भारतात प्रामुख्याने दोन प्रकारचे प्रश्न आहेत. पहिला दारिद्र्याचा आणि दुसरा जात-पातीचा. दारिद्र्यामुळे पोटभर अन्न मिळण्याची वानवा आहे. आपल्या देशात तयार झालेल्या खाद्यपदार्थांची विलायतेकडे होणारी निर्यात थांबविणे, हा ह्या प्रश्नापासून सुटका करून घेण्याचा एक मार्ग झाला. इंग्लंडसारख्या काही देशात सकाळी अंथरुणातून उठताक्षणीच नाश्त्यासाठी दक्षिण अमेरिकेतून मागविलेली मासळी खायला मिळते. लोणी असते, ऑस्ट्रेलियातून आलेले. आपल्या देशात ही परिस्थिती नाही. आमची माती सुपीक आहे. ती आपल्या देशाच्या लोकाना पुरेल इतके खाद्य-पदार्थ जरूर मिळवून देते. बराचसा धनसंचय केला नाही तर खाद्यपदार्थांची टंचाई भासेल, अन्नटंचाई होईल, अशी परिस्थिती येथे मुळीच नाही. खाद्यपदार्थांची निर्यात ज्या क्षणी थांबेल, त्याच क्षणापासून आमच्या जनतेला यथेच्छ खाद्यपदार्थ मिळायला लागतील. ह्या क्षेत्रात आम्हाला यश मिळवावयाचे असेल तर येथील व्यापाऱ्यांना असे मार्ग अवलंबिण्यासाठी भाग पाडावे की ज्यामुळे केवळ उदर भरण एवढाच हेतू न राहता, त्यानाही फायदा व्हावा आणि जनतेलाही त्रास होऊ नये. खाद्यपदार्थ परदेशी न पाठवता, गावांत आणि शहरांत ज्या लोकांना अन्नटंचाई भासते त्यांच्याकडून योग्य काम करवून घेऊन मेहनतीच्या बदल्यात अन्नवाटप करण्याची व्यवस्था करणे फार सोईचे होईल.

नुकताच जगन्नाथपुरी आणि त्याच्या आसपासच्या प्रदेशात मोठा दुष्काळ पडला आहे. एकीकडे आपल्या देशाची राजेरजवाडे, जमीनदार, जहागिरदार, सावकार, पंडितशास्त्री मंडळी, व्यापारी, वकील, मोठमोठे अधिकारी वगैरे मंडळी आपापले ढेरपोट सांभाळीत गोडधोड पदार्थ इतके ठासून खात आहेत की अपचनाची त्यांना भीती असते, तर दुसरीकडे अख्ख्या जगात दिसणार नाही अशी केविलवाणी अवस्था आहे. आपल्याच देशात एकसारखा दुष्काळ पडत असतो, आणि दुष्काळग्रस्त लोक मृत्युमुखी पडतात, परंतु ह्या भयंकर हानीपासून आणि घोर अन्यायापासून वाच-विण्याचा उपाय त्या लोकांना सुचत नाही. हा विचारही मनाला क्लेषदायक ठरतो. ह्या संकटामध्येच जातपातीचा अत्याचार असाच तापदायक वाटतो.

खालच्या जातीचेच लोक दारिद्र्यात खिचपत आहेत, ही स्थिती नाकारता येणार नाही. खरे तर तेच अधिक मेहनती आहेत. जो मेहनत करूनच पोट भरतो, तोच वर्ग सर्वात अधिक सशक्त होईल. अन्याय कोठे नाही ? सर्व जगात तो भरलेलाच आहे. तरीसुद्धा आपल्या देशासारखी दयनीय परिस्थिती दुसरीकडे कोठेही नाही.

ह्या कडैयम गावात एका सधन घरात काही विशेष विधीसाठी म्हणून शंकरनाय-

नारच्या मंदिरातला हत्ती आणला गेला आहे. तो हत्ती अठरा वर्षांचा आहे. असे म्हणतात की तो हत्ती खूप दुष्ट आहे, म्हणून साऱ्या गात्रकऱ्यांच्या झुंडीच्या झुंडी त्याला पाहण्यासाठी लोटतात. आज सकाळी मीसुद्धा आपल्या मित्राबरोबर हा हत्ती पाहायला गेलो होतो. मजेची गोष्ट अशी, ह्या हत्तीच्या माहुतांत दोन ब्राह्मण युवक आहेत, तर एक शैवओदुवार म्हणजे पुजारी वंशाचा आहे. साधारणपणे मुसलमान किंवा हिंदूंच्या खालच्या ज्ञातीतील लोकच माहूत बनतात. ह्या हत्तीला तर ब्राह्मण माहूत मिळाले आहेत.

त्यांच्यापैकी एका ब्राह्मण माहुताशी मी हत्तीच्या प्रकृतीबद्दल बोलत होतो. नदीत स्नान करण्यासाठी जाताना तो त्या हत्तीला निर्दयपणे मारत असताना मी पाहिले होते. त्या घटनेची आठवण देत त्याला " बाबारे ! जनावरांशीसुद्धा प्रेमानं वागावं. निर्दयपणानं त्यांना मारझोड करून एखादी गोष्ट करायला शिकवणं योग्य नाही." मी एवढेच म्हटले मात्र की तो आपले हत्तीच्या शास्त्रातील ज्ञान पाजळत एक भलेमोठे व्याख्यानच देऊ लागला. तो म्हणाला, " हा हत्ती खालच्या जातीतला आहे. हत्तींमध्ये सुद्धा ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र असे चार मुख्य वर्ण आहेत. प्रत्येक वर्णाच्या उपजातीही आहेत. हा हत्ती शूद्र जातीचा आहे. शूद्र लोकांत ' ईषवर 'जात आहे ना ? तसा हा हत्ती ' वीरन ' वर्गात मोडतो."

अशा प्रकारे त्या माहुताने मला एक लंबीचौडी हकीकत सांगितली.

जातपातीची भावना आमच्या हृदयात किती खोलवर रुजली गेली आहे, हे दाखविण्यासाठीच मी हत्तीची ही कहाणी सांगितली. हत्तीहत्तीत सुद्धा ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र असे वर्गीकरण ! घोड्यांच्यातही तेच ! अंतराळातील ग्रहांतसुद्धा असाच जातिभेद ! फार काय, रत्नांतसुद्धा हेच वर्गीकरण आहे.

अशा प्रकारे जातपातीची भावना ज्या देशात इतकी पक्की झाली आहे, ज्या देशात स्वातंत्र्य, समानता, बन्धुत्व आदी सिद्धान्त प्रस्थापित करणे इतके सोपे ठरेल का ? बरे एखाद दुसरी जात आहे का ? अहो, किती जाती, उपजाती, शाखा, प्रशाखा आहेत ! " परै अठरा असतील तर नुळै एकशे आठ." असे म्हणतात. म्हणजेच ' परैयर ' जातीच्या अठरा शाखा तर नुळैयर जातीत एकशे आठ उपभेद आहेत. शिवाय परैयर, पळ्ळन, चक्किलियन हे सर्व निरनिराळ्या जातींचे, एक दुसऱ्याबरोबर सहभोजनास तयार होत नाही. विवाहादी संबंध नाहीत. काय म्हणावे याला ! किती क्रूर विडंबन आहे हे ? जणू आहेत तेवढे भेद पुरेसे नाहीत. म्हणूनच की काय दररोज नवनवीन भेद, उपभेद डोके वर काढीत आहेत. ह्या परिस्थितीत सुधारणा करण्याच्या उद्देशाने प्रेरित झालेले काही लोक कळत न कळत " आणखी काही वर्ग निर्माण करीत आहेत. कडैयमच्या ' वेळाळ जाती 'च्या काही आंग्लविद्याविभूषित

लोकांनी आपण द्राविडी ब्राह्मण असल्याचे घोषित करून परंपरागत जातिसूचक 'पिल्लै' नावाचा त्याग करून त्या जागी 'रायर' असे नाव जोडले. उदाहरणार्थ, जर कोणाचे नाव 'आणिडच्या पिल्ले' असले तर सरकारी नियमानुसार त्यात बदल करून 'आणिडच्प्प रायर' या नावाने आपला सारा व्यवहार ते करतात. ही 'द्राविडी ब्राह्मणा'ची उपाधी त्यांना कशी प्राप्त झाली ह्याचा पत्ता त्यांनाही नसतो. असे ऐकिवात आहे की काही काळापूर्वी वळकुवर मंडळीची अशा प्रकारची एक सभा तंजोरमध्ये झाली, ज्यात वळकुवर जातीला उच्चजातीचा दर्जा असल्याचे घोषित करून इतर हरिजन व चांभारांना अस्पृश्य समजले गेले आणि त्यांना पंचांग वगैरे वापरण्याची मनाई करून जाहीर केले गेले की ह्या नियमाचे उल्लंघन करणाऱ्यावर इलाज केला जावा. वळकुवर जातीचे श्रीमान बिडाला पेरुमाळ ह्यावर भडकून उठले आणि जूनच्या 'स्वदेशमित्रन्'मध्ये त्यांनी एक रसाळ लेख लिहिला आहे. वळकुवर जातीचे लोक खरे तर 'परैयर' आहेत, 'पंचमर' म्हणजे नीच जातीवाले आहेत हे त्यांनी सप्रमाण सिद्ध केले आहे, ते वाचून मला तरी खूप आनंद झाला.

परंतु त्या लेखात पेरुमाळ नायनारने असे म्हटले आहे की चतुर्थ वर्ण वेळकाळांच्या कुलापासून 'परैयर' अलग झाले आहेत. हे मात्र पूर्णपणे विसंगत वाटते. कोणत्या आधारावर ते असे म्हणतात, कळत नाही. असे वाटते की आंतरजातीय विरोधाच्या भावनेमुळे ते असे म्हणत असावेत. वैमनस्य आणि विरोध यांच्यामुळे कोणाचेही भले होणार नाही.

सर्व वर्गांना योग्य शिक्षण मिळाले तर सर्व समानबुद्धि होतील. मांसाहारी लोक मांसाहार सोडून देतील तर स्वामी विवेकानंदांच्या म्हणण्याप्रमाणे सर्वांना एकदम ब्राह्मण बनविता येईल. सुसंस्कारांच्या योगाने खालच्या जातीतील लोकांनासुद्धा ब्राह्मण करता येईल, यासाठी आपल्या वेदशास्त्रात काही आधारसुद्धा सापडतात. सर्व भारतीयांना या प्रकारे ब्राह्मण केले तर बरे होईल—असेच मला वाटते. कोणी कोठल्याही जातीचा असो, त्याला शाकाहारी बनवून, त्याचे मौंजीबंधन करून, त्याला गायत्री मंत्राची दीक्षा द्यावी. मग त्याला ब्राह्मण मानावेच लागेल. विवेकानंदांचेही हेच म्हणणे आहे. एका मर्यादेपर्यंत हा खरोखरच चांगला उपाय आहे. परंतु उच्च-जातीय मंडळी आपल्या कुलीनतेचा विचार सोडून खालच्या जातीच्या लोकांशी मिळून मिसळून वागतील, तर तो ह्याहीपेक्षा श्रेष्ठ मार्ग ठरेल.

## पुरातन जग

हे जग अति प्राचीन आहे. ह्याचे रूप कदाचित नवे वाटेल परंतु प्रकृती पुरातनच आहे एक लिंबाचे झाड पडून जाईल तर दुसरे लिंबाचे झाड रुजेल. लिंबाचे झाड अमर आहे. जोपर्यंत ही पृथ्वी राहील, अशा प्रकारचेच ऊन असेल, पाऊस, हवा, जन्म, मरण, रोगनिवारण, बंधन, मुक्ती, चांगुलपणा, वाईटपणा, सुख, दु:ख, भक्तिभाव, वेदना, व्यथा चुका आदि सर्व शाश्वत आहेत—अजर, अमर आहेत.

साधने बदलत राहतात, प्रकृती गतिशील असते. हे सर्व कशासाठी सांगतोय्, माहीत आहे ? शाळकरी मुले म्हणत असतात की आकाशातून एक नवा समाज टपकन् खाली पडला, ज्याची माहिती आम्हाला माहीत नाही. परंतु माझा यावर मुळीच विश्वास नाही. हे जग अतिप्राचीन आहे.

निर्धनांच्या वाटयाला नेहमी दु:ख असते. धनिकाला अनेक प्रकारच्या सुखसोयी प्राप्त होतात. मंदिराचे रक्षण करणाऱ्यांना काही कमी पडत नाही. देवदेवतांच्या शिळामूर्ती अर्ध्या देवदेवतांच्या आणि अर्ध्या दगडाच्या असतात. पूर्णपणे देवदेवतांच्या असत्या तर त्या क्षणीच कृतयुग आले नसते का ?

प्रत्येक देशात, हरघडी हाच क्रम चाललेला असतो. ज्याचा हात उंचावर पोहोचेल तो यशस्वी होईल, परंतु दुर्भाग्याच्या नशिबी सारी संकटेच असतात.

धनवान आणि निर्धन असा भेद प्रथमत:च झाला कसा ? शेतकरी आणि सैनिक असे मानवजातीत विभाजन का झाले ? सर्व मिळून शेती करून उपजीविका करत होते तेथे हा भेदभाव कशामुळे जन्माला आला ? हे सर्व विचार करायला लावणारे प्रश्न आहेत, सर्वांसाठी देण्याइतका वेळ नाही. ह्या वेळेला फक्त धनवान आणि निर्धन ह्यांच्यासंबंधीच विचार करू.

व्यापारात मोठी खोट आल्यावर एका चेट्टीने—म्हणजे बनियाने—मोठया दु:खाने आपल्या घरच्या पुरोहिताला विचारले, " महाराज ! धनिक होण्यासाठी काय केले पाहिजे ?" अय्यरने नवग्रहांची पूजा करावी असे सुचविले. चेट्टीने विचारले की ह्यासाठी किती पैसा लागेल ? त्याला उत्तर मिळाले, " दहा सुवर्णांची नाणी." ह्यावर चेट्टी म्हणाला, " आता माझ्याजवळ तर कोलंबोचे नारळाचा शिक्का असलेले नाणे एक-सुद्धा नाही. ह्या अशा अवस्थेत कोणत्या उपयांनी पैसा मिळेल ? आपले शास्त्र काय-सांगते ते मला सांगा."

पुरोहित म्हणाला, " मागच्या जन्मी तुम्ही ब्राह्मणांना भरपूर दान दिले नसावे. म्हणूनच ह्या जन्मी तुमची ही अवस्था झाली आहे. ह्यासाठी आमच्या शास्त्रात कोणतेच प्रायश्चित नाही. ह्या जन्मात काही पुण्यकर्म कराल तर पुढच्या जन्मात धनसंपत्ती प्राप्त होईल."

पुरोहिताचे स्पष्टीकरण ऐकून चेट्टींचं समाधान झाले नाही. खरे तर, मलासुद्धा हा उपाय लाभदायक वाटला नाही. पुढच्या जन्मी मला पुन्हा मानवजन्म मिळेल आणि धनसंपत्तीचे सुख लाभेल, याचा आता मला काही फायदा नाही. या गोष्टीवर माझी श्रद्धाही नाही. ह्या जन्मातच धनप्राप्तीच्या प्रयत्नाला लागावे हेच न्यायसंगत वाटते. पुढच्या जन्मात मिळणाऱ्या धनासाठी आतापासूनच पैसे राखणे हा मूर्खपणा आहे.

कोणी प्राणी किंवा पशुपक्षी एखादा समूह करून आपल्या कुलाचा नाश स्वतः ओढवून घेतात, असे कधी पाहण्यात आले नाही. परंतु मानवप्राण्यामध्ये मात्र ही अनंतकाळा-पासूनची सवय आहे. होमरच्या काळापासून ते कॉन्स्टंटाईन राजाच्या काळापर्यंत यमन देशांत युद्ध कधी संपलेच नाही. वादळी रात्रीतसुद्धा चोऱ्या होतच राहिल्या. हरेक युगात दुष्कर्म होतच राहिले. विषमोचन, रोग–निवारण, निर्धनाला धन, मूर्खाला शिक्षण प्रत्येक घडीला शोधून काढता येईल. निवारण शोधायचेच असेल तर त्यासाठी उपाय-सुद्धा प्रत्येक वेळेस अपरिवर्तनीय असतो. मानव केवळ साधन मात्र बदलतो. बाकी प्राचीनतेचेच अनुकरण करतो, सोडत नाही.

एखाद्या व्यापाऱ्याला धनलाभ झाला, तर तो एकदम सौरमंडळाशी स्पर्धा करू लागतो. जुन्या रीतिरिवाजाप्रमाणे क्रमशः एक एक पाऊल पुढे जायचे असते. अधीरता उपयोगी नसते. अधीरतेने काम बिघडते. हळूहळू प्रगती करतो तोच उद्दिष्ट गाठू शकतो. म्हणूनच जुना मार्गच श्रेयस्कर. तो चिरकाळापासून अनुकरणीय असा मार्ग आहे. जगात प्रत्येक काम, नियमित रूपाने पायरी पायरी चढत क्रमशःच होते. उडी मारली तर धपकन् पडायला होते. पतंग एकदम उडी मारून झेप घेतो, परंतु सूर्य नियमित गतीने मार्गक्रमण करतो. नियत मार्गानेच, मार्ग बदलत नाही किंवा चुकत नाही. सदैव गतिशील आहे, संथगतीने पुढे सरकत जातो–पुढेही असाच जाईल. पुरातन मार्गच सर्व प्रकारच्या व्यवहारांना योग्य असा मार्ग आहे.

## पशुपक्षी

" कोल्ला विरदम् कुवलयमेल्लामोंगो
येल्लोरक्कुम् सोल्लवेन इच्छं परापरमे "
–(तायुमानवर)–

विशिष्ट वेदांतज्ञ आणि व्यवहारकुशल असलेले माझे एक मित्रवर्य (गोपाल पिल्लै असे टोपण नाव त्यांना देऊ या) आज माझ्याकडे आले आणि गप्पा मारू लागले.

ते मला म्हणाले, " आपण पत्रकार जरूर आहात. लिहिताना दुसऱ्याचं मन न दुखविता लिहिणं हेच उत्तम. ' इनशोल्लाल अन्टि इरुनोर वियनुलकम् वनशोल्लाल एन्रुम मकिळावे. ' म्हणजे ही धरती आणि स्वर्ग मधुरवचनांमुळेच आनंदित होतात, कटुवचनांमुळे नाही. दुसऱ्यांच्या हृदयाला जखम न करतासुद्धा पुष्कळ लिहिता येईल. आपल्या लेखनाचा उद्देश जग सुधारणं, लोकांना अधिक आणि शक्य तितकं चांगलं बनविणं हाच आहे ना ? जर आपल्याला आपला उद्देश शीघ्र पूर्ण करणं आहे तर आपण आपले विचार व सिद्धांत, भावना प्रक्षोभित न करता, क्रोधरहित वृत्तीने शांतपणाने दुसऱ्याबद्दलचे आपले विचार दुसऱ्याला जराही न दुखवता गोड शब्दांत मांडणं हाच उत्तम मार्ग होय."

ह्यावर मी म्हणालो, " वा वा ! लाखातली गोष्ट सांगितली आपण ! माझं स्वतःचं मतही हेच आहे. परंतु स्त्रियांची अवनत दशा, खालच्या जातीच्या लोकांची दयनीय स्थिती, पशुपक्षी आणि दरिद्री लोकांच्या अडचणी यांच्यावर लिहिताना दलितवर्गासंबंधी अगदी अलिप्तपणाची भावना दाखवून, निर्दयपणाने त्यांच्यावर अत्याचार करणाऱ्यांबद्दल कधीकधी नकळत राग येतो. परंतु ह्या क्रोधावेशालासुद्धा काबूत ठेवण्याचा मी यापुढे प्रयत्न करीन ? आणि आपण सांगितलं त्याचप्रमाणे वागण्याचा प्रयत्न करीन. कारण आपण म्हटल्याप्रमाणे क्रोधपूर्ण शब्द आमच्याच उद्देश्यपूर्तीत बाधा आणतात. गाय, बकरीचे मांस खाणाऱ्यांना आम्ही कितीही शिवीगाळ केली तरी त्यांची मांसभक्षणाची सवय काही सुटणार नाही. उलटी आमच्याबद्दलची त्यांची द्वेषभावना वाढीस लागेल जर आपल्या पक्षात जी पद्धत आहे, तिच्याकडे त्यांचे ध्यान वेधून घेतले, त्यांच्यात असणाऱ्या करुण रसाला जागृत केलं तरच ते लोक आमच्या विचारांच्याकडे आकर्षित होतील. हाच उत्तम मार्ग आहे."

मित्रवर बोलले, " पशुपक्ष्यांना मारून खाण्यामुळे जो त्यांच्यावर अन्याय होतो, त्याचं स्मरण झालं की मला फार वाईट वाटतं आणि राग अनावर होतो. तुम्ही त्यांना मारण्याचं दृश्य कधी पाहिलं आहे का ? मान कापताना बकरी हलली तर मानेवर नीट प्रहार होणार नाही म्हणून तिच्यासमोर हिरवा पाला टाकतात. तो पाला खात असताना तिची मान सरळ राहते व एकाच प्रहारात तिची मान धडापासून वेगळी करता येते. हे दृश्य पाहताना मला त्या बकरीची मान कापणाऱ्याचा फार राग येतो. त्याला क्षमा करणेही कठीण जातं, किती सहजपणानं तो एका बकरीला मारतो ! पण तो त्या बकरीला पुन्हा प्राण देऊ शकेल ?

काही दिवसांपूर्वी शंकरनायनार मंदिराच्या जवळ असलेल्या एका गावी गेलो होतो. तेथे एका मॉडन मंदिरात बरीच मंडळी एकत्र आली होती आणि पूजापाठ करत होती. ते मंदिर कोणत्या देवाचं होतं, आहे ठाऊक ? असं म्हणतात की गावात काही वर्षांपूर्वी

एक मरवन होता. तो लूटमार करणारा, खून पाडणारा निडर आणि साहसी होता. परंतु गरीब लोकांवर दया दाखवणारा होता. तो मेल्यानंतर त्याची समाधी बांधून त्या समाधीवरच एक मंदिर उभं केलं गेलं. आजकाल गाववाली मंडळी त्या मरवन माडनचीच माडासामीच्या रूपात आराधना करतात. कुतूहलामुळे मीसुद्धा त्यांचा उत्सव पाहण्यासाठी माझ्या मित्रांबरोबर तिथं गेलो होतो. त्या जागी जवळ जवळ वीस सूळ उभे केलेले होते आणि तितक्याच बकऱ्या त्यांना बांधल्या होत्या. सुळांवर अर्धमेल्या बकऱ्या धडपडताना मी पाहिलं नाही. त्यावेळी जर पाहिलं असतं तर माझ्या मनाची काय अवस्था झाली असती कोणास ठाऊक ! मी पाहिलं त्यावेळी सर्व बकऱ्या मृत होत्या. रक्त आणि चरबी ठिपकत होती. बापरे ! त्या दृश्याची आठवण येताच आता-सुद्धा माझ्या अंगावर शहारे उठत आहेत. किती घोर पातक हे !" असं पुटपुटत माझा मित्र गोपाल पिळ्ळै फार दु:खीकष्टी झाला.

ह्यावर मी म्हणलो, "असं म्हणतात की काही दिवसांपूर्वी इराणचे नामधारी राजे 'शहा' बगदाद शहरात आले होते. युरोपची यात्रा करून स्वदेशी परतत असताना ते बगदाद शहरी आले होते. तेव्हा त्यांच्या स्वागतासाठी बगदाद शहरात ऐंशी किंवा शंभर बकऱ्या मारण्यात आल्या. ही बातमी 'स्वदेशमित्रन्'मध्ये आली आहे. ते वाचताना माझ्या पोटात जणू ज्वाला भडकली. परंतु आमच्या देशात छोटयामोठया देवदेवतांच्या मंदिरात पूजापाठ होताना कोठे कोठे एक हजार, कधी दहा हजार बकऱ्यांचे बळी दिले जातात, असा विचार मनात आल्यानंतर मात्र मी राग आवरू शकत नाही.

असं ऐकलं होतं की तिरुनेलवलीच्या जवळ 'कुरंगगिनी अम्मन'चं देवालय आहे. तिथं वार्षिकोत्सवाच्या वेळी असंख्य बकऱ्या बळी दिल्या जातात.

मद्रास शहराच्या आसपासच्या गावात अशाच प्रकारचे एका देवीचे मंदिर आहे. हेच काय, आमच्या देशात अशी असंख्य मंदिरे आहेत. ह्या मंदिरात प्रत्येक दिवशी बळी दिले जातात. त्यांना थांबविलं पाहिजे. त्या मंदिराच्या धर्मगुरूंना आणि समाजाच्या पुढाऱ्यांना सविनय प्रार्थना करण्यासाठी वृत्तपत्रात लिहिण्याचा माझा इरादा आहे. परंतु तुम्ही तर म्हणता की क्रोधपूर्ण शब्द वापरण्यात आणि शिवीगाळ करण्यात काहीही फायदा नाही ! बोला, काय करावं आम्ही ?"

आम्ही दोघे बराच वेळ प्राणीहिंसेमुळे होणारा सर्वनाश, हिंस्रकार्यामुळे होणारे पाप, रोगराई, मृत्यू इत्यादींवर विचारविनिमय करीत राहिलो. आमच्या संभाषणाचे पूर्ण विवरण देण्यासाठी येथे जागा नाही. तरीसुद्धा गोपाळ पिळ्ळे यांना दिलेल्या वचनानुसार येथे हात जोडून प्रार्थना करतो.—तमिळनाडूचे नेतेहो ! आपले पाय धरून कोटी-कोटी नमस्कार करतो. परंतु मांसाहार बंद करण्यासाठी कोणता ना कोणता तरी मार्ग शोधून काढाच !

## अनंत शक्ती

मुंगी मृत कीटकाला खेचत घेऊन जाते. कशामुळे ? आपल्या शक्तीच्या बळावर. धूमकेतू लाखो मैलांचे आपले शेपूट घासत अंतरिक्षात तुफान वेगाने फिरत राहतो. कशामुळे ? आपल्या शक्तीच्या बळावर. त्याच धूमकेतूला पंचाहत्तर वर्षांतून एकदा चाळीस दिवसपर्यंत सूर्य आपल्या चारीबाजूंना फिरवतो. कशामुळे ? आपल्या शक्तीच्या बळावर.

एखादी युवती गाऊ शकते. नेपोलियनने सारा युरोप जिंकला. ह्या दोघांची मूलाधार त्यांची स्वतःची शक्तीच आहे. शास्त्रज्ञांनी शोधून काढले आहे की नेत्र आणि बुद्धी ह्यांच्यासाठी गोचर आणि अगोचर असलेले आधिभौतिक जग सीमाहीन आहे. ह्या विस्तृत, विशाल, अनादिअनंत दुनियेचे जी शक्ती संचालन करत आहे, ती शक्ती सुद्धा असीम आहे, अनंत आहे, कल्पनातीत आहे. जर मानवसुद्धा अशा शक्तीची साधना करील तर त्याला मोठा लाभ होऊ शकेल. 'यद्भावयमि तद् भवसि'–तुम्हाला जे बनणे आवडेल तसेच तुम्ही बनता.

असे समजू नका की ही साधना बिलकुल मामुली आणि सोपी आहे. जिवंत ज्वलंत श्रद्धा ठेवून साधनेमध्ये लीन झाले पाहिजे. भडकत्या अग्नीच्या ठिणग्यांसारखी ज्वलंत भक्ती ध्यान करताना असली पाहिजे. ही काही हसण्यावारी नेण्यासारखी गोष्ट नाही. नियमित रूपाने आपल्या आचरणात आणली तरच तिचे महत्त्व पटेल.

ज्ञानी आणि योगी अशाच काही कठीण साधनेच्या अभ्यासाने अशी शक्ती संपादन करतात. सर्वसाधारण लोक ह्या प्रकारची साधना अवगत नसल्याने नैसर्गिकरीत्या मिळालेल्या शक्तीने युक्त असतात. काहीही असले तरी शक्तीशिवाय कोणीही जगू शकत नाही. क्षणभरसुद्धा श्वास घेऊ शकणार नाही.

मोकळ्या हवेत हिंडल्याने आणि तिच्या श्वसनाने शक्ती अर्जित होते. शरीराला श्रम करावयाला लावल्याने शून्यातून शक्ती शरीरात प्रविष्ट होते. बुद्धीचा काही विषयांसाठी वापर केला असता श्रद्धापूर्वक चिंतनमननाने शक्ती प्राप्त होते. अशा प्रकारे थोडीथोडी करून जी शक्ती संचित होत राहते तिच्याच बळावर ह्या जगतातील लोक जिवंत राहतात.

तमिळनाडूच्या जनतेला अधिक सशक्त बनविणे आहे, त्यांची शक्ती वृद्धिगत करावयाची आहे, हाच माझा उद्देश आहे. ह्याच ध्येयपूर्तीसाठी मी जीवित आहे. आपल्यापैकी प्रत्येकासाठी हीच एक प्रार्थना करावयाची आहे की–हे माते ! ह्या देशाच्या लोकांना सशक्त आणि सबल बनव. आमचे ध्येय तडीस नेण्यासाठी आम्हाला कार्यान्वित करण्याची शक्ती मला दे. खेळ, मल्लयुद्ध, गाणेबजावणे, नाटक, तत्त्वचिंतन,

तपस्या, ब्रह्मचर्यव्रत, सफाई आदींच्या साह्यानेच एखादा समाज संपन्न होतो. त्याचे बल वृद्धिंगत होते. मन, वचन, आणि कर्म ह्या तिघांनाही पवित्र राखणे अत्यावश्यक आहे. हृदय आणि व्यवहार पवित्र ठेवण्यासाठी अभ्यास करणे आहे. भय, संदेह, चंचलता, ह्या तीनही बाबींपासून तिरस्कार वाटला पाहिजे, त्यांच्यापासून दूर राहणे आवश्यक आहे. ह्या वर उल्लेखिलेल्या नियमांचे पालन केले तर शक्तिसंचय होईल.

पुराणवस्तू म्हणून ती काही खोटी ठरत नाही. तसेच नवीन असणे म्हणजे खरेपणाचे लक्षणही नव्हे. कोणत्याही विषयाची सत्यासत्यता नीट छाननी केल्याशिवाय आणि ती अनुभवसिद्ध झाल्याशिवाय स्वीकारू नये. आमच्या पूर्वजांनी योगमार्गाचा अवलंब केला. त्यात हठयोग, राजयोग, भक्तियोग आणि ज्ञानयोग असे चार प्रकार आहेत. हठयोगद्वारा होणारी बलप्राप्ती कमी असते. अन्य तीन योगांची साधना केल्याने अनंतशक्ती प्राप्त होते. कोणत्याही विषयाचे गाढे ज्ञान आणि अनुभव होण्यापूर्वी, कोण्या विवेकाची कास धरणाऱ्या व्यक्तीने असा संदेह मनात आणू नये की 'शेवटी याचे फलित काय ?' आपण खोलवर विचार करणे आवश्यक आहे. ज्यांनी अशी कठोर साधना केली आहे, त्यांना अपूर्व आणि अलौकिक यशःप्राप्ती झालेली आम्ही आपल्या स्वतःच्या डोळ्यांनी पाहिली आहे. आपणमुद्धा अशी शक्ती का प्राप्त करू नये ? तमोगुणात लिप्त राहून शेवटी आपण कोणते सुख भोगले ? आलस्य आणि विषयवासनांच्या मागे लागून, समुद्रात पडलेल्या गवताच्या काडीप्रमाणे मनाला आकुल–व्याकुल करून आम्ही कोणत्या सुखसुविधा आणि वैभव मिळविले ?

धैर्य, हृदयाचे पावित्र्य, कोणत्या तरी एका उद्दिष्टावर पुरेपूर मन लावून मनाचे आणि बुद्धीचे एकाग्र चिंतन करणे आणि लाभहानीची चिंता न करणे हेच योगाचे रहस्य होय.

## तमिळ भाषा

कलकत्याहून प्रकाशित होणाऱ्या 'मॉडर्न रिव्ह्यू' ह्या मासिकाचा पौष–मार्गशीर्ष अंक काल सहज चाळत होतो. त्यात तिरुनेलवेली हिंदू महाविद्यालयातील इतिहासविषयाचे प्राध्यापक श्री. नीलकंठ अय्यर यांचे एक छोटेसे पत्र छापिले आहे. त्याच मासिकात प्रसिद्ध झालेल्या श्री. यदुनाथ सरकार यांच्या लेखावर त्यांनी आपली प्रतिक्रिया मांडली आहे.

श्री. यदुनाथ सरकारांनी साधार लिहिले होते की महाविद्यालयांत इतिहास विषय इंग्रजीभाषेतून शिकविणे हे अनावश्यक संकट आहे. देशी भाषांत इतिहास शिकविला गेला तर अधिक लाभ झालेला दिसेल. ह्यावर तिरुनेलवेलीचे हे पंडितमहाशय म्हणतात की, " भाषेची ही कटकट मोठीच डोकेदुखी होऊन बसली आहे, माझ्या जिल्ह्यापुरते— खरे तर माझ्या महाविद्यालयापुरतेच बोलायचे तर इंग्रजीपेक्षा प्रादेशिक भाषेतच इतिहास विषय शिकविला तर अधिक लाभ होईलच, असे सांगणे कठीण आहे. माझे विद्यार्थी इंग्रजी व्याकरणाच्या आणि वाक्प्रचाराच्या चुका करत असले तरी त्यांचे इंग्रजीचे ज्ञान तमिळच्यापेक्षा अधिक चांगले आहे. मला स्वतःला तमिळपेक्षा इंग्रजी निश्चितच अधिक कळते. म्हणूनच तर इतिहास विषय मी इंग्रजीत जास्त चांगल्या रीतीने शिकवू शकतो. "

श्री. नीलकंठ अय्यरांची ही अवस्था पाहून मला फार खेद वाटतो. ज्यांना आपली मातृभाषा योग्य प्रकारे बोलता येत नाही, ती समजणे शक्य नाही त्यांना इतिहासाचा प्रोफेसर बनून एका विभागाचा कारभार चालविण्याचा अधिकार प्राप्त आहे असा हास्यास्पद प्रकार फक्त आपल्याच देशात पाहायला मिळतो. अरेरे ! काय ही अवस्था !

आणि शिवाय, मातृभाषेचे आपले ज्ञान अर्धवट आहे, ही गोष्ट त्यांनी बंगालच्य मासिकात का लिहिली, हे मला समजत नाही. जपानी, चिनी, नॉर्वेजियन तसेच जगातील विविध देशातील लोक आमची बुद्धी तसेच शास्त्र आणि भाषा यातील गती हीन आणि हेय मानत आले आहेत. अगदी आताआताचीच गोष्ट आहे की भारताचे काही प्रतिभावान् विद्वान साऱ्या जगाला सांगत आहेत की आम्ही ना जंगली आहोत ना 'पुच्छ हीन' वानर आहोत. आम्हाला आमच्या स्वतःच्या भाषा आहेत, आमच्यात मोठमोठे कवी आहेत. मोठे शास्त्रज्ञ आणि पंडितही होऊन गेले. आणि आमच्यातील काही मंडळी तामिळनाडू हिंदुस्थानच्या इतर प्रदेशाहून मागासलेला आहे असा डांगोरा पिटताना पाहून मला हसूच येते.

मी आपले स्वतःचे विचार सांगितले तर बरे होईल.

जगभरच्या लोकांत हिंदुस्थानचे लोक बुद्धी आणि प्रतिभेत वरचढ आहेत. हिंदुस्थानच्या लोकांत आपण तमिळभाषिक शिरोभूषणासमान आहोत. मला स्वतःला चारपाच भाषांचे ज्ञान आहे. परंतु त्या सर्वांत तमिळसारखी सशक्त, समृद्ध, प्रतिभासंपन्न आणि मर्मस्पर्शी भाषा दुसरी नाही.

मला निश्चित असे वाटते की तमिळजातीयांची बुद्धी, प्रतिभा, आणि कीर्ती यांचा आजच्या बाह्यजगाला मुळीच परिचय नाही. ह्या जातीची कीर्ती बाहेर पसरवली नाही माझ्यापासून हेही लपून राहिलेले नाही की भूतकाळच्या दिवसांत तमिळ जातीची

ज्ञानाची प्रखर ज्योत मंदावली होती. जे होऊन गेले, ते झाले. लवकरच तमिळचा ज्योतिर्मय आलोक साऱ्या जगात पसरेल. जर तसे झाले नाही तर माझे नाव बदलून टाका.

तोपर्यंत येथील पंडितांना एक प्रार्थना आहे की त्यांना तमिळ येत नसेल तर त्यांनी कृपया चुपचाप बसावे. ज्यामुळे इतर तमिळ लोकांना हीन आणि तुच्छ मानले जाईल असे शब्द त्यांनी उच्चारू नयेत—इतकीच माझी त्यांना विनंती आहे.

## मुक्ती

महान् कवी तिरुवळ्ळुवरने धर्म, अर्थ आणि काम ह्या तीन पुरुषार्थांची एक हजार तीनशे 'कुरळ' छंदात गुंफण केली. त्याच्या ह्या अद्‌भुत सामर्थ्यावर मुग्ध होऊन काही लोकांनी औवैयार पेक्षा त्याची प्रतिभा अलौकिक असल्याची प्रशंसा केली. औवैयारने तर चारही पुरुषार्थांना एकाच 'वेणव्या'त—हाही एक छंदाचा प्रकार—गाऊन दाखविले—

" **ईदल अरम्, तीविनै विट्टिटल पोरुळ;**
**एंगञांद्रम् कादलिरुवर करुतोरुमित्तू—तातरवु**
**पट्टदे इन्बम; परने निनैन्दि इम् मूंद्रम,**
**विट्टदे पेरिन्ब वीडू।** "

काव्यरूपी दान असो, वा देशरूपी, धन, शिक्षण, औषध, धैर्य आदि योग्य विषय वा वस्तूने जो संपन्न आहे, त्याने ज्याला त्या वस्तूंची आवश्यकता असते, त्यांना त्या देऊन टाकणे हाच खरा धर्म. सामान्यत: दुनियेमध्ये संपन्न, साधारण आणि अकिंचन अशा तीन प्रकारचे वर्ग पाहायला मिळतात. ह्या तीन वर्गांच्या लोकांना जे दान देण्याची इच्छा असते. ती देशकालानुसार बदलत राहते. दानशील आणि धर्मनिष्ठ व्यक्ती केव्हा, कोणाला, किती द्यावे हे जाणून असते. ज्याचा संचय केला जातो तेच धन. सुखप्राप्ती करून देणाऱ्या वस्तू मिळविण्यासाठी साधन मात्र म्हणून मानवाला धनसंचय करावासा वाटतो. असा संचय सदैवच करत राहावे लागते. परंतु कुमार्गाने, आणि कुप्रकारे मिळवलेले धन नेहमीच टिकत नाही. धनसंचयानंतर, त्याच्या बळावर जे दुसऱ्याचे वाईट करतील, ते लवकरच बरबाद होतील. तिरुवळ्ळुवरने म्हटलेच आहे—" **अल्लल पट्टाट्टाडु अळद कण्णणीरंद्रे सेलवत्तै तेय्यकुम् पडै** "—"सतावल्या गेलेल्या

व्यक्तीचे अश्रू हे त्यांना सतावणाऱ्या आणि त्यांच्या दुःखाकष्टाला कारणीभूत झालेल्यांचे ऐश्वर्य धुळीला मिळवून टाकणारे अस्त्रच होय." संपत्ती ही सुखदायक असते. ती प्रयत्नामुळेच संचित होते. मन लावून आणि उत्साहपूर्वक सत्कर्म करीत राहिले तर संपत्तीची वृद्धी होत राहील. काही मूढ लोकांचे म्हणणे आहे की कुकर्म केल्याशिवाय संपत्ती साठणे असंभव आहे. औवैयार म्हणते, कोणतेही कुकर्म न करता, जे मिळविले जाते तेच खरे धन होय, इतर सारी दुःखदायक आणि क्षणभंगुर माया !

स्त्री-पुरुष परस्परांवर प्रेम करतील, तर तेच सर्वश्रेष्ठ सुख ठरेल. खाणेपिणे, स्नान, सुगंधलेपन, फूल आदींपासून मिळणाऱ्याच्या सुखापेक्षा प्रणयानुभवाचे सुख विशेष आहे. प्रणयीयुगल एकरूप होऊन ज्या स्वर्गीय सुखाचा अनुभव घेते, त्या सुखाला मानव आपणच निर्मिलेल्या कायदेकानूंचे नियंत्रण लावतो आणि मग धन आणि अनीतीच्या मार्गाने तेच सुख प्राप्त करण्याची धडपड करतो. स्त्रीपुरुष संयोगामुळेच निर्माण झालेले दुःख जगातील इतर सर्व दुःखापेक्षा अधिक वाढले आहे. काही देशात तर विवाहसंस्थेला नरकदशेचे स्वरूप आले आहे. ईश्वरानेच दिलेल्या स्वर्गीय सुखाला मानवाने आपल्या अज्ञानामुळे आणि पापी विचारांमुळे नरकयातना बनविले आहे.

ईश्वरावर अटल श्रद्धा ठेवून, वर सांगितलेल्या तिन्ही पुरुषार्थांना आपलेसे करणे, जे होणार आहे, तेच होणार अशा निर्लिप्त भावाने सारे काही परमेश्वरी इच्छेवर सोडून निश्चिंत राहणे, म्हणजेच मोक्षप्राप्तीचे सुख मिळविणे. मग वाटेल तेवढे दुःख सहन करावे लागो, चित्त विचलित न करता, चिंता भस्मसात करून परमेश्वराच्या ध्यानात मग्न राहणे म्हणजेच मोक्ष अथवा मुक्ती आहे. गीतेत सांगितलेच आहे, "सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज."

मूर्ख लोक असे म्हणतात की अशा प्रकारे मुक्तात्मा होऊन साधू बनून हालअपेष्टात भीक मागतच पोट भरावे लागेल. ही विचारधारणा निखालस चुकीची आहे. हजारांमध्ये एखादाच मुक्तात्मा असा साधुसंन्याशाचा मार्ग अवलंबू शकतो. पण केवळ तोच एक मार्ग आहे, असे समजता कामा नये. जनकाने जीवनमुक्त होऊनही राज्यशकट चालविले, अर्जुन आणि ऋषिमुनी, पत्नी आणि मुलाबाळांच्या सह सुखद जीवन कंठीत होते. मुक्तात्मा हरेक प्रकारच्या कामात आणि व्यवसायात व्यग्र राहूनही परमेश्वरावर अचल आणि अतूट भक्ती करू शकतात. पूर्वसूरींचे म्हणणे असे आहे की "**एत्तौळिलै चेय्दालुम्, एदअस्यैपट्टालुम्, मुक्तर मनम्मिरक्कू मोनत्ते ।**"—"वाटेल ते कर्म करो, कितीही काबाडकष्ट करो, जीवनमुक्त व्यक्तींचे मन ईश्वरभक्तीत लीन राहील.' औवैयारचे म्हणणे असे आहे की परमेश्वराचे ध्यान करीत असताना इतर तीन्ही पुरुषार्थांचा त्याग करणे म्हणजेच मोक्षसुखाची प्राप्ती. निर्लिप्तता म्हणजेच मुक्ती.

वैराग्य आणि विरक्ती म्हणजेच संन्यास. निष्काम आणि निर्लिप्त मानवाला ओळखावे कसे ? भक्तीच्या परिपक्वतेचे लक्षण काय ? वेद म्हणतात, "निर्भय राहा." भयमुक्त राहणे मुक्तावस्थेचे लक्षण होय. कोणी खऱ्या मनाने परमेश्वरावर विश्वास ठेवतो का केवळ देखावा करतो, हे जर जाणून घ्यायचे असेल तर अल्पकालात त्याची परीक्षा आपोआपच होईल. आपत्कालातही जो डगमगत नाही तोच ज्ञानी, जीवनमुक्त आणि मृत्युंजय आहे आणि परमेश्वराचा खराखुरा शरणागत भक्त आहे, हे ओळखावे. जर आपण परमेश्वरावर विश्वास ठेवला तर कोठल्याही दुःखापासून बाधा होणार नाही. ह्या ज्ञानाचा बोध ज्यांना झाला आहे, ते जीवनमुक्त मानव ज्या कोणत्या पदावर असतील, तेथे ते अद्वितीयच ठरतील.

## संस्कृतीचा मूलस्रोत*

फ्रान्सचे माजी मुख्यमंत्री श्री. क्लामोन्सो हे गेल्या काही दिवसांपासून आपल्या भारत-यात्रेवर आहेत हे आपल्याला विदित आहेच. काही दिवसांपूर्वी मुंबईत त्यांच्या सन्मानार्थ एक मेजवानी दिली गेली. त्यासमयी त्यांनी केलेल्या भाषणाच्या काही भागाकडे आपले लक्ष वेधू इच्छितो.

"फ्रान्ससाठी ज्यांनी आपले रक्त सांडले, त्यांच्या जन्मभूमीचे दर्शन घेताना मला अभिमान वाटत आहे. फ्रान्सच्या कुटुंबांत भारतीय सैनिकांना राहताना मी पाहिलेले आहे. त्यांच्या सुशील आणि स्नेहपूर्ण वागणुकीने फ्रान्सवासियांची मने जिंकली गेली आहेत. पौर्वात्य मंडळी सौजन्यात आणि सभ्यतेत पिछाडीला नाहीत, मानवता, प्रेम ह्याप्रकारचे अनेक आदर्श आम्ही पौर्वात्यांकडूनच शिकलो. पाश्चिमात्यांनी ह्या आदर्शांचा स्वीकार करून त्यांना आपलेही आदर्श मानले. म्हणून आपण मंडळीहून स्वतःला वरचढ समजून एका उन्नत समाजाचा प्रतिनिधी समजून मी आपल्याशी बोलत नाही, तर मी असं मानतो की संस्कृतीच्या मूलस्रोताच्या दिशेने मी आलो आहे."

कोण आहेत हे महाशय ? नुकतेच फ्रान्सच्या मुख्यमंत्री पदापासून ते दूर झाले आहेत. ते केवळ साहित्याचे अभ्यासक नसून भौतिक आणि आधिभौतिक गोष्टींचे ज्ञानी आहेत. युरोपच्या राजकारणात विख्यात आहेत. सुज्ञ व्यक्ती आहेत. दहा वर्षांपूर्वी हेच शब्द त्यांच्या मुखातून निघाले नसते कदाचित्. तेव्हा ते युरोपचीच संस्कृती

* 'कालविलक्षु' ह्या शीर्षकाच्या लेखाचा काही भाग.

श्रेष्ठ मानत असावेत. आज भारताला प्रत्यक्ष भेट दिल्यानंतर आणि शक्य तितक्या तटस्थ दृष्टिकोणातून पाहिल्यानंतर वरील विचार त्यांच्या मनात रुजले असावेत. माझ्या बन्धूंना मी प्रार्थना करतो की ह्यांचे भाषण ध्यानपूर्वक वाचा. हे महाशय काय सांगू इच्छितात ? युरोपच्या संस्कृतीपुढील आदर्श आणि उन्नत धर्मसंकल्पना—ज्याच्या पूर्ततेसाठी ते धडपडत आहेत—हा युरोपचा वारसा नाही तर पौर्वात्य देशांकडून मिळा-लेली ती देणगी आहे, हेच त्यांचे म्हणणे आहे. हो ना ? ते अगदी स्पष्टपणे ते कबूल करत आहेत की आम्हीच युरोपला आदर्शांची आणि धर्मसंकल्पनेची देणगी दिली. आमची ही देणगी मिळाली नसती तर उघडयानागडया शरीरात जंगली अवस्थेत ते भटकत राहिले असते. आशियातून संस्कृती युरोपमध्ये पसरली. आशियाई संस्कृतीचे मूलस्थान भारतवर्ष हेच होय. पण एक गोष्ट मात्र खरी. प्राचीनकाळात आम्ही कितीही उन्नतावस्थेला पोहोचलो होतो आणि साऱ्या दुनियेला आम्ही उन्नतीचे धडे दिले तरी आजची आमची दयनीय परिस्थिती कायम राहिली तर कुणालाही आमच्या गौरव-शाली भूतकाळासंबंधी काही वाटणार नाही. आज आपला भारतदेश पुनश्च आपल्या अद्वितीय आणि तेजस्वी शक्तींच्या साह्याने ताठ मानेने उभा राहिला तर किती चांगले होईल, म्हणून तर श्री. क्लामोन्सो यांच्यासारखे विद्वज्जन त्यांच्यासाठी प्रशंसेचा पूल बांधत आहेत. आम्ही दुनियेला मार्गदर्शन करण्यास समर्थ आहोत, हे शाबीत होऊन चुकले आहे, परंतु त्या स्थानावर आमचे पाय अजून पक्के रोवले गेलेले नाहीत. श्री. क्लामोन्सो म्हणाले की—"पाश्चिमात्य देशांप्रमाणे येथेही लोक परस्परांशी प्रेम आणि स्नेहपूर्ण भावनेने राहण्याचा परमेश्वरी आदेश विसरून परस्परांशी शत्रुत्वाच्या, विरोध आणि हिंसेच्या मार्गाचा अवलंब करीत आहेत, हे पाहून मला अतिशय दुःख होत आहे." परंतु माझा दावा असा आहे की आज भारताच्या सभोवती असलेल्या वायुमंडळात ज्या सात्त्विक धर्माची हवा फैलावत आहे, त्या हवेत श्वासोच्छ्वास केला नसता तर श्री. क्लामोन्सो यांच्या तोंडातून हे शब्द क्वचितच निघाले असते. जर आता ते पॅरिसमध्ये असते तर तेथे जर्मनीविरोधी वातावरणाने ह्यांनाही गुंडाळले असते आणि त्यांची बुद्धी सात्त्विक धर्माकडे झुकली नसती.

प्रेमरूपी धर्माची कास धरून भारत दुनियेला मार्गदर्शन करू शकेल हा विचार जोर धरत आहे. ह्या विचाराचे प्रस्फुरणच इतके आश्चर्यजनक आहे की सर्व दुनिया विमुग्ध होऊन बसली आहे. परमेश्वर अशी कृपा करेल का ? की नजिकच्या भविष्य-काळात हा सिद्धांत भारतवासियांच्या जीवनात, तर त्यांचे सिद्धांत सर्व क्षेत्रात मान्य झालेले दिसतील.

## चतुर्थ खंड—तत्त्वज्ञान

1. पुढचे पाऊल
2. मूढ भक्तिभाव
3. वाचकांचे ज्ञान
4. अमृताचा शोध
5. पुनर्जन्म
6. जीवनाची सार्थकता
7. उच्चारण आणि आचरण ह्यातील अंतर
8 ज्ञान–रथ (अंशत:)
9. भगवद्गीतेची भूमिका (अंशत:)
10. चंद्रिकेची कथा (पहिले प्रकरण)
11. वेदकालीन ऋषींची कहाणी (भूमिका)
12. तराजू (अंशत:)

# पुढचे पाऊल

जे झाले, ते झाले. आता पुढचा विचार करावयाचा आहे.

आपल्या देशाच्या जनतेला देवळाच्या पुढाऱ्यांशी सहकार्य द्यायचे आहे, त्यांचा आदर ठेवायचा आहे तर पुजाऱ्यांनीही जनतेपासून काहीही लपवून न ठेवता, न फसवता, सरळ आणि स्पष्टपणे विषयप्रतिपादन केले पाहिजे.

तुम्ही विचारू शकता—परमेश्वर सर्वव्यापी आहे. सर्व सृष्टीत परमेश्वराचे अस्तित्त्व आहे ना ? मग मंदिर बनवून, त्यात दगडाच्या किंवा धातूच्या मूर्तीची प्रतिष्ठापना करून, त्या मंदिरातच सर्वांनी परमेश्वराची प्रार्थना केली पाहिजे अशा प्रकारच्या नियमाचे बंधन कशाला ? उत्तर हेच आहे की, जनतेमध्ये ऐक्यभावना निर्माण करण्यासाठीच हे बंधन आहे.

केवळ दगडाच्या मूर्तीतच परमेश्वर असतो अशा प्रकारचा विश्वास दृढ झाल्यानंतर आम्ही असे म्हणू शकतो का की आपल्या सभोवताली हिंडण्या-फिरणाऱ्या लोकांत परमेशाचे अस्तित्व नाही ?

लक्षात घ्या. सर्व चराचरात व्याप्त होऊन, चराचराला चालना देणारी ही ज्योतिर्मय शक्तीच, आपल्या चारी बाजूंना असणाऱ्या अनंत कोटी जीवांच्या स्वरूपात प्रकट होते. वेदही हेच सांगतात.

" आपल्या स्वतःला साऱ्या विश्वात आणि विश्वाला आपल्या स्वतःत जो पाहू शकतो तोच खरा चक्षुधारी अर्थात् दर्शक ". हा पूर्वीच्या सिद्ध पुरुषांचा सिद्धान्त होता.

आपला आत्मा आणि विश्वात्मा दोन्ही एकच. तुम्ही, मी, मगर, कासव, माशी, गरुड, गाढव, म्हैस ... ... सर्वांच्यात एकच प्रकारचा प्राण आहे. हा प्राणच परमात्मा आहे.

लोक एकरूपाने ईश्वराची प्रार्थना करायला लागतील तर प्राणिमात्रात सर्वात मिळून-मिसळून काम करण्याची भावना येईल आणि आत्म्याच्या ऐक्याचा बोध होईल. मंदिरामुळे गावात एकी राहील. घरात मूर्तिपूजा करीत राहिले तर कुटुंबाच्या ऐक्याला तडा जाणार नाही.

मन लावून ऐका—अगदी स्पष्ट शब्दात सांगतो. पुरुष असूनही तुम्ही ज्या देवांची आराधना करता, त्यात काही देवी देखील आहेत. तुमची आई, बहीण, पत्नी आणि कन्या ह्यांच्यामध्ये ज्या दैवी पराशक्तीचा महिमा आतापर्यंत अप्रकट स्वरूपात होता, तो ह्या देवींचाच प्रसाद आहे. देवी माता आहे. आपल्याला आपल्या कन्या, पत्नी, भगिनी आणि माता यांना देवींच्या इतके प्रतिभाशाली झालेले पाहावयाचे आहे.

तुम्ही, तुमचे पिता, भाऊ, मुलगा तसेच सर्व पुरुषवर्ग जी एक प्रगत अवस्था प्राप्त करण्याची मनोधारणा ठेवता, त्याचेच प्रतीक सर्व देव होत.

तुम्ही शिवशंकर आहात; शक्ती तुमची अर्धांगिनी आहे.

तुम्ही विष्णू आहात; लक्ष्मी तुमची देवी आहे.

तुम्ही ब्रह्मा आहात; सरस्वती तुमची सहधर्मचारिणी आहे.

ह्या तत्त्वानुसार मनुष्यमात्राला पशुत्वापासून देवत्वाकडे घेऊन जाण्यासाठी असणारी पाठशाळा म्हणजेच मंदिरे होत.

पुजारीवर्ग नेमके हेच सत्य झाकून ठेवतो. पुजारी हाच विचार करतो की पूजा करणारे शाश्वत रूपाने दास किंवा गुलामच राहावेत परंतु तो स्वतः मात्र दैवी शक्तीचा साक्षात्कार झालेलाच राहावा. जो दुसऱ्यांना आपल्या अधीन ठेवू इच्छितो, त्याच्यात दैवी शक्तीचा वास राहत नाही. काही पुजारी तर दैवी शक्तीचे सोंग करून लोकांच्या डोळयांत धूळ फेकत परधन लुटण्याचा प्रयत्न करतात. पण चलाख माणसाचे डोळे आठ दिवसांच्या आतच उघडतात. किती काळ एखादा ढोंगी आपल्या स्वतःला फसवत दैवी शक्तीच्या साक्षात्काराचा अभिनय करू शकेल ? म्हणूनच या पुजाऱ्यांचे खरे स्वरूप लवकरच उघडकीला येते. लोक पुजाऱ्यांची उपेक्षा करू शकतात पण पूर्व रूढींचा मान राखणारे मात्र दगडाच्या देवांची पूजा करण्याचे सोडू शकत नाहीत. परंतु असले दगड कधीही नवसाला पावत नाहीत. एखाद्या मामुली दगडाला खरा सज्जन सच्च्या भक्तिभावाने पुजेल, पूर्ण भक्तीपूर्वक मंत्र म्हणेल तर परमेश्वराचा जसा साक्षात्कार होतो, तसाच ह्या अपात्र पुजाऱ्यांच्या केवळ स्पर्शाने परमेश्वर त्या दगडातून निघून जाईल. मग मात्र त्या दगडाची किंमत रस्त्यावर पडलेल्या इतर दगडांइतकीच होईल.

मंदिरात गेलो काय किंवा न गेलो काय, परमेश्वराची प्रार्थना केली काय वा न केली काय, परंतु इतरांची फसवणूक केली नाही आणि त्यांना धोका देण्याचे सोडून दिले तरीही परमेश्वराच्या कृपेस आपण पात्र होऊ. अगदी किंचित्सुद्धा, आणि अगदी मामुली बाबतीत सुद्धा कुणी धोका न देता जर परिपूर्ण सिद्धी प्राप्त केली, तर तोच परमेश्वर ठरेल. कृमिकीटक, कावळे, चिमण्या, अगदी मुंगीला सुद्धा हानी होता कामा नये. परमेश्वराने जन्म दिला, तो जे करील तेच योग्य... अशा अलिप्त भावनेने नदीत तरंगणाऱ्या लाकडाप्रमाणे ह्या जीवनरूपी सागरात पोहत गेले पाहिजे. जो असा निरिच्छ होऊन, परमेश्वरावर भरवसा ठेवून, जीवनपथावर वाटचाल करतो, त्याला दैवीशक्ती प्राप्त होते, यात काही संशय नाही.

दुर्बल जीवजंतूंवर मनुष्यमात्र जोपर्यंत अत्याचार करत राहील तोपर्यंत हे कलियुग राहील. अधर्म नमेल तर कलियुगही नमेल. साऱ्या विश्वात कली नमेल. परंतु जगातील

अधर्म आणि अन्याय दूर होतील आणि कृतयुगाचे आगमन होईल अशी शक्यता नजीकच्या भविष्यकाळात तरी नाही. मी एकटाच का म्हणून न्यायाच्या मार्गाने जाऊ... असा विचार करून अधर्माची कास न सोडता पूर्ववत अधर्माचेच सतत पालन करणे योग्य नाही. अन्यायाची माथ ज्या क्षणी सुटेल, त्या क्षणीच कृतयुगाचे लाभ दिसू लागतील. यात काही संदेह नाही.

एखादी जरी व्यक्ती कलीविरुद्ध कंबर कसून उभी राहील तरी तिच्या डोळ्यां-देखत दहा पाच लोक कलियुगाची समाप्ती करण्यासाठी तयार झालेले दिसतील. एकाचे दहा, दहाचे शंभर, आणि ह्याप्रमाणेच हजार, लाख, कोटी तयार होत जातील. मानव-जातीमध्ये असाच सत्ययुगाचा प्रसार सुरू होत जाईल ह्यामध्येही संदेह नाही.

## मूढ भक्तिभाव

अगदी ह्या क्षणापर्यंत आपल्या आमजनतेत अंधश्रद्धा आणि मूर्ख भक्तिभाव इतका ठासून भरलेला आहे की त्याची गणती अशक्य आहे. परिणामी आमच्या कार्यात आणि व्यवहारात जी विघ्ने येत आहेत, तीही अनंत आहेत.

ह्या मूर्ख भक्तिभावामुळे सर्वात मोठी अडचण ही निर्माण झाली आहे की प्रत्येक गोष्टीसाठी आपण तिथी, नक्षत्र, लग्नयोग वगैरे पाहू लागतो. अगदी हजामत करण्या-साठी सुद्धा आम्हाला महिना, पक्ष तिथी, नक्षत्र व योग्य दिवस यांचे फल शोधावे लागते. हजामत करवून घ्यायला इतक्या अडचणी तर विवाह, व्यापार, प्रवास, शुभकार्य इत्यादींसारख्या महत्त्वाच्या कार्यांसाठी वर सांगितलेले लग्न आणि शुभयोग शोधून काढण्यात आपण किती धन आणि समय वृथा दवडतो याला सीमाच राहिलेली नाही. शुभमुहूर्त पाहणेसुद्धा आपल्या दैनंदिन कार्यक्रमात विघ्ने आणू शकते. ह्या गोष्टींमुळे आमचे किती नुकसान होते, पैशाचा किती अपव्यय होतो, इकडे आपण लक्ष देत नाही. मुहूर्त पाहण्याने केवळ आमच्या कार्यात बाधा पडते, दिवस आणि लग्न इत्यादींचा योग शोधताना तर केवळ आमच्याच कार्यात विघ्न येते एवढेच नसून लग्नादि बाबींसंबंधी सांगणाऱ्या ज्योतिषाला पैसेही द्यावे लागतात.

" वेळ पैशाहून अधिक मौल्यवान आहे ", अशी एक इंग्रजी म्हण आहे. परंतु ती म्हण आपणाला परिचित आहे असे वाटत नाही. काळाचा अपव्यय केला तर धनाचा लाभ होणार नाही. आजचे काम उद्यावर ढकलण्याने खूप नुकसान होते. कुठलेही काम

असले तरी मनात येताच सुरुवात केली तर बहुधा यशःप्राप्ती होते. टाळाटाळ केली आणि नंतर करण्याची सवय लागली की प्रारंभीचा उत्साह आणि वेग हळूहळू मंदावत जातो.

इंग्रजी शिकलेल्या लोकांकडून ऐकले की अज्ञान हेच अंधश्रद्धा आणि मूर्ख भक्ति-भावाचे मूळ कारण आहे. जर लोकांमध्ये शिक्षणाचा प्रसार झाला तर हे आपोआपच दूर होऊन जातील. एका ठराविक मर्यादेपर्यंत मी हे मानतो. परंतु असे स्पष्ट दिसते की आजकाल आमच्या शाळात जे इंग्रजी शिक्षण दिले जात आहे, ते ह्या कामासाठी उपयोगी पडणार नाही. साधारणपणे शंभर वर्षांपासून ह्या देशात इंग्रजी शिक्षण प्रचलित आहे. अक्षरशः हजारो शाळा निर्माण झाल्या आहेत. त्यातून हजारो, लाखो, करोडो विद्यार्थी शिक्षण घेऊन बाहेर पडले आहेत. हे लोक अंधविश्वासापासून दूर गेलेत का ? मुळीच नाही. आपल्या देशाची लोकसंख्या तेहतीस कोटी आहे. पूर्णपणे शिक्षित झाल्यानंतर ह्या तेहतीस कोटी लोकांचा अंधविश्वास आणि मूर्ख भक्तिभाव संपून जाईल, असे नाही. आतापर्यंत ज्यांनी उच्चशिक्षण मिळवले आहे, ते जर आपल्या अंतर्मनाशी सचोटीने राहिले असते तर अधिकांत अधिक लोकांचे आचरण सुधारले असते. कितीतरी गोष्टीत आम्ही आपल्या लोकांना इंग्रजी शिक्षण घेतलेल्या व्यक्तींच्या राहणीचे अनुकरण करत, आपल्या जुन्या रीतीरिवाजांना बदलताना पाहात आहोत. ह्या बाबतीतही असेच होईल.

आपल्या अंतर्मनाचा आवाज ऐकून आणि आपली बुद्धी आणि ज्ञानामुळे झालेला विकास यांच्या अनुरूप व्यवहार करण्याची धारणा इंग्रजी शाळांत शिक्षण घेतलेल्या लोकांत नाही. इंग्रजी शाळांत कितीही खरीखोटी शास्त्रे भलेही शिकविली जात असोत मग !

स्वतंत्रता, सचोटी, साहस, शौर्य, पौरुष आदी प्रयत्नपूर्वक शिकवले जात नाही. ज्या सचोटीचा आपल्याला अनुभव येतो, ती आचरणातही आणली पाहिजे. असे न करणे अपमानास्पद कृत्य आहे, पाप आहे, हेही शिकविले जात नाही. केवळ मौखिक रूपाने पढवले जाते. हे गुण आचरणात आणण्याचे शिक्षण दिले जात नाही. पुस्तकी ज्ञान, लौकिक व्यवहार आणि बोलण्यात वागण्यात अंतर ठेवणाऱ्याचे उदाहरण दाखवावयाचे असेल तर इंग्रजी शाळात शिकलेल्या आमच्या देशातील लोकांहून अधिक उदाहरण शोधून मिळणार नाही.

तिरुवल्लुवरने सांगितले आहे—

"कनविनुम इन्नादु मन्नो विनैवेर
सोल् वेरुउडैयार तोडर्बु."

(बोलणं एक, करणं दुसरंच, हा ज्यांचा वाण
त्यांची मैत्री घेईल स्वप्नात देखिल प्राण)

अर्थ अगदी सरळ आणि स्पष्ट आहे की ज्यांचे बोलणे आणि वागणे यांत अंतर आहे, त्यांचा सहवास स्वप्नातसुद्धा वाईट.

बी. ए., एम्. ए. च्या पदव्या प्राप्त करून वकील, प्राध्यापक, तंत्रज्ञ किंवा अधिकारी बनलेल्या अय्यर, अय्यंगार किंवा पिल्लेपैकी आपल्या मुलामुलीच्या शुभविवाहासाठी मुहूर्ताची आवश्यकता नाही, असे कुणी सांगितले आहे का? "काय करायचं! घरच्या स्त्रियांच्या त्रासाला कंटाळून आम्हाला असल्या मूर्ख रीतीरिवाजांचं पालन करावं लागत आहे" अशा प्रकारची तक्रारसुद्धा काही लोक करतात. स्त्रियांना ज्या गोष्टीं-साठी मान द्यायचा, त्यासाठी अवश्य द्यावा. परंतु बुद्धिवादी व्यक्ती ज्या गोष्टींवरून आमची चेष्टा करतात त्या प्रकारचीच मूर्खपणाची कृत्ये करावयाला स्त्रिया भरीस घालत असतील तर त्यांचे म्हणणे ऐकणे चुकीचे आहे. शिवाय हे खरे कारणही नाही, केवळ खोटा बहाणा आहे आमच्या लोकांत अशी आंधळी श्रद्धा त्याज्य मानण्याइतपत साहस न येण्याचे कारण हेच आहे की सनातन मंडळी आणि सामान्यजन आपल्या पंगतीत बसविणार नाहीत, आमच्यावर बहिष्कार टाकतील. इंग्रजी शिक्षा घेतलेलेही कुलीन हिंदू लोक अनेकविध अंधविश्वास आणि निरर्थक रूढी यांच्या बेड्या हाता-पायात घालून लटपटत चालत आहेत, ह्याचे मुख्य कारण जातिबहिष्काराचे भय हेच आहे, दुसरे कोणतेही नाही. हे खरे कारण लपवून स्त्रियांच्यावर खोटा आरोप लादणारे हे मर्द न जाणे आणखी किती गोष्टीत आपल्या स्त्रियांशी खरेदी केलेल्या बाजारू स्त्रीप्रमाणे पशुतुल्य व्यवहार करतात. परंतु ही गोष्ट आमच्यापासून लपणार नाही. अपरिमित धन व कालाचा अपव्यय, पराभव, जगाची कुचाळकी, सत्यरूपी परमेश्वराचा विरोध हे आपल्या नजरेत इतके महत्त्वाचे नाहीत जितके सहभोजनाचे स्वातंत्र्य, आणि समाजाचा बहिष्कार हे मानले गेले आहे.

आपण थोडेसे साहस करून सत्याच्या मार्गावरून चला. काही काळ ह्या बाबतीत वंचित राहावे लागेल, पण नंतर आपली बाजू घेणाऱ्यांची संख्या वाढेल. सत्याचे बळ वगैरे कितीतरी कारणांनी ते सहभोजनही आपल्याला सहज घेता येईल. साहस दाखवून हे काम करा.

## वाचकांचे ज्ञान—

आजचा मानव व्यापार, कलाकौशल्य, राजनैतिक आणि सामाजिक सुधारणा वगैरे लौकिक व्यवहारांच्या क्षेत्रातील जवळ जवळ सर्व योजनांवर विचार करून बसला आहे. कोण्या एका क्षेत्राचे वा इलाख्याचे सूक्ष्मज्ञान दुसऱ्या एखाद्या क्षेत्रातील शिक्षित व्यक्तीला नसण्याची शक्यता असते परंतु ज्याने आपल्या भागातील विशेष बाबीचा अभ्यास केला आहे, त्याला त्या भागाची बारकाईने माहिती असणारच.

जेथपर्यंत बुद्धी आणि ज्ञानाचा संबंध येतो, तेथपर्यंत साधारणत: मानवाने बारकाईने सत्याचा शोध केलेला आहे. परंतु मिळविलेले ज्ञान आणि शोधलेली सत्ये यांचा मेळ घालायला मन असमर्थ ठरते. ज्ञानाचा आविष्कार होऊनही चित्तशुद्धी होईलच असे नाही. म्हणूनच ज्ञानाच्या साहाय्याने उमगलेले सत्य आचरणात आणणे ही मानवापुढची मोठी समस्या होऊन बसली आहे. आत्मज्ञानांच्या संबंधी संत तायुमानरने म्हटले आहे—

**" वाचक ज्ञान ते वरुमो, सुखम् पाळत्त**
**पूसलेन्द्र पोमो पुगलाय् परापरमे."**

अर्थ असा आहे की " केवळ मौखिकरूपाने प्राप्त झालेल्या ज्ञानाने आनंदाचा अनुभव कोठे मिळतो ? काय करावं ? पापी मन तर सारखा संघर्ष करत असतं ! हा संघर्ष शांत कधी होईल ? हे परमेश्वरा ! तूच त्याला सांग !"

हेच सत्य जागतिक नीतीच्या संदर्भात अभिव्यक्त करताना तिरुक्कळवर म्हणतात—

**" सोल्लदल यार्क्कुम एळिह् अरियावम्**
**सोल्लिय वणणम् सेयल "**

ह्या कुरळाचा म्हणजे पदाचा अर्थ असा आहे—" कुठल्याही धर्माच्या बाबतीत तोंडानं सांगणं सोपं आहे. परंतु जे सांगितलं. तसंच करून दाखविणं दु:साध्य होऊन बसत."

उदाहरणार्थ, नारी आणि नर यांच्यात आत्मप्रवृत्ती आणि गुण समान असतात, त्यामुळेच कुठल्याही दृष्टीने स्त्रियांना कमी लेखणे अयोग्य ठरेल, अशा प्रकारचा विचार युरोपच्या शिक्षित वर्गाकडून रुजला गेला खरा परंतु स्त्रियांना मताधिकार देण्यासंबंधी मात्र युरोपच्या अधिकांश राजनीतीज्ञांनी आणि तज्ज्ञांनी विरोधच दर्शविला. एवढेच नव्हे तर बनावट न्यायसंहितांचा आधार घेण्याचे धाडसही केले.

" विष्णुभक्त कुठल्याही कुलाचा असो, समानदृष्टी आणि समान आदर यांना पात्र असतो." श्री रामानुजांची ही उक्ती पूर्णपणे जाणणारे वैष्णव संप्रदायाचे लोक अन्य जाती पेक्षा ब्राह्मण आणि शूद्र असा भेदभाव दाखवीत असतात. एवढेच नव्हे तर आपल्यात वड-कैले," तेनकैले * असे नामाभिधान करून माथेफोड करत वादविवाद उकरत बसतात.

* वैष्णवांच्या उपजाती.

" समस्त शरीरात मीच जीवात्मा होऊन वसत असतो," असे गीतेत भगवानांनी सांगितले आहे. दुसऱ्या एके ठिकाणीही भगवान म्हणतात– " जो सर्व प्राणिमात्रांत स्वत:ला आणि आपल्यात सर्व प्राणिमात्रांना पाहू शकतो, तोच खरा द्रष्टा होय." हेच निष्कर्ष वेदोपनिषदांचे अंतिम निष्कर्ष आहेत, हे जाणूनसुद्धा हिंदुजन जगाच्या इतर कुठल्याही जनतेपेक्षा जातिभेदाच्या बाबतीत अधिक कडवेपणा दाखवीत आले आहेत.

**" इनसोल इविर्दोंद्रल काणवान एवन कोलो, वनसोल वळगुंवदु."**

ह्या पदानुसार मधुर शब्दांनीसुद्धा योग्य परिणाम होत असेल तेव्हा कटू वचनांचा अवलंब करणे म्हणजे मूर्खपणा आहे. अनुभवाने शहाण्या झालेल्या व्यक्तींना हे ज्ञात असते. तरीसुद्धा जगात कठोर शब्द आणि क्रोधपूर्ण विचारांपासून दूर राहिलेली व्यक्ती मिळणे दुरापास्त आहे.

'मृत्यू हे पापाचे फल आहे'–ही बायबलची उक्ती प्रत्येक ख्रिस्ती व्यक्तीला ज्ञात आहे. तरीही पापोकृत्यापासून मुक्त असा एकही ख्रिस्ती मनुष्य कुठेही सापडत नाही. उलट, "आपण सर्व पापी आहोत" हेच वाक्य सदैव घोळत ते आपले दिवस कंठीत असतात.

ओह ! हा कसला अंधार ? अन्याय आहे हा. अत्याचार आहे.

अगदी लहान प्रमाणावर व्यापार, शेती वगैरे कार्यांतसुद्धा सरळ मार्गाने जाऊन लाभ होऊ शकेल, असा निश्चय करूनसुद्धा त्या प्रकारच्या मार्गाचे अनुकरण अशक्य होत चालले आहे. ह्या मोठ्या दुर्बलतेचे निराकरण करणारी कारणे शोधून काढल्याशिवाय गप्प बसणे हे न्यायाला धरून होणार नाही.

जाणूनबुजून, डोळे उघडे ठेवून खड्ड्यात पडण्याप्रमाणे आपल्याला कल्याण करून घेणे समजत असतानासुद्धा वाईट गोष्टींपासून आपली सुटका करून घेण्यात मानवजात असमर्थच राहिली आहे.

ह्यावर उपाय काय ? मानसिक कणखरपणा हेच औषध आहे. तात्कालिक अडचणी, कष्ट आदीची पर्वा न करता, मानवाने ज्याला सत्य म्हणून मानले आहे, त्याच्या दिशेने चालून दाखवावे. अशा सत्यव्रताचे पालन करणाऱ्या आणि धैर्याने सत्पथावर मार्गक्रमण करणाऱ्यांना प्रोत्साहन दिले पाहिजे. पुरस्कार आणि प्रशंसा यांचा वापर करून त्यांना प्रेरणा देत राहिले पाहिजे. ओह ! कलियुगाने मनाचा कब्जा घेतला आहे. बस. अनावश्यक दु:ख, अडचणी आणि संकट यांनी जग बेजार झाले आहे.

या, बांधवांनो ! देशवासियांनो !

एखादी व्यक्ती सचोटीची कास धरण्याचा प्रयत्न करत असेल तर अनेकविध अडथळे रोज निर्माण होतात, त्यामुळे प्रामाणिकपणाने जगू इच्छिणाऱ्या लोकांचे धैर्य खचून जाते. या बांधवांनो, आपण सांघिक स्वरूपात सचोटीच्या मार्गाचा अवलंब करू या.

स्त्री-पुरुषांचे समानत्व, हाच धर्म. समजले ना तुम्हाला ? चला तर मग, लाखांच्या संख्येने असलेल्या स्त्रियांना बंधनमुक्त करू या. जातिभेदात काही अर्थ नाही हे तुम्ही जाणून घेतले ना ? रंगभेद, देशभेद ह्याला काहीच महत्त्व नाही. हेही तुमच्या ध्यानात आले ना ? छान झाले. करोडोंच्या संख्येने पुढे या. समानतेच्या मार्गावर आपण सर्वजण पुढे जाऊ या. लाखो लोक एकत्र येऊन निरर्थक मूर्ख वहिवाटीचे बंधन तोडून त्यांचे तुकडे तुकडे करावयाचे आहेत.

'प्रेमच सुखाची वाट दाखवील; विरोधाचा नाश करील' हे आले तुमच्या ध्यानात ? उठा. आपण कोट्यवधी लोक प्रत्येक ठिकाणी, प्रत्येक क्षणी, प्रत्येक प्राणिमात्रावर सतत, अविचलित आणि अतूट प्रेम करण्यास सुरुवात करू या. कलियुगाचा अंत घडवून आणायचा आहे आपल्याला. त्यासाठी धैर्य अंगी बाणायचे आहे आपल्याला.

## अमृताचा शोध

**"काक्क निन्नारूट् काट्चोयल्लालोरु पोक्कुमिल्लै.'**

**—तायुमानवर**

अनेक वर्षापूर्वीची गोष्ट आहे. एक भिकारी रस्त्यावरून गात चालला होता—

**"तूगुकैपिले वांगुकिर मूच्छू—अट्**
**सुषि मारि पोनालुम पोच्छु"**

(ह्या जीवनाचा काय भरोसा ? निजलं असताना श्वास बंद झाला तर ?)

हे गाणे ऐकल्याबरोबर मी चिंतनात बुडून गेलो विचार केला. खरोखरच हे शरीर इतके क्षणभंगुर आहे तर ह्या जगात कोण त्या शरीराला मोठे करून दाखवणारा आहे ? ईश्वर आपल्या बुद्धीला उद्भाषित करतो. आपल्याला बुद्धीचे मूर्तिमान रूप दिले आहे. बुद्धी आनंदरूपी सुखाची अपेक्षा करते. अपार सौंदर्य आणि असीम सुखांनी भरलेले जग आमच्यासमोर आहे. हे जग चिरकाल आनंददायक आहे. चिंतारहित आहे. ह्या ब्रह्मांडात अणूइतक्या किंबहुना त्याहूनही लहान असलेल्या भूमंडलातच आपण हालचाल करू शकतो. ह्या पृथ्वीप्रमाणे असंख्य ग्रह अंतरिक्षात फिरत आहेत. त्यांच्यासंबंधीही माहिती ज्ञानद्वारे आपण मिळविली आहे. त्याच्या काही भागाकडे आपण अगदी दुरूनसुद्धा पाहू शकतो. जेथपर्यंत आपली दृष्टी पोहोचते तेथपर्यंत सौंदर्यच सौंदर्य आहे. आपल्या भूमंडलावर आकाशाचे छत पसरलेले आहे. आकाश आणि पृथ्वीच्या

अवकाशात निर्मल आकाश, सूर्यकिरणांचे तेज, रंगाचे इंद्रजाल, वनराई, पर्वतराजी, नदीनाले, समुद्र...सौंदर्यच सौंदर्य आहे. दुसरे काही नाही.

प्रत्येक वस्तूत, प्रत्येक अनुभवात सुख आणि दुःख दोन्ही असतात. आपण बुद्धीच्या जोरावर दुःखानुभूतीला दूर सारून सुखाची प्राप्ती करतो. उदाहरणार्थ– पाणी– स्नान केले तरी सुख, प्राशन केले तरी सुख; माती– ह्याच्यात जे पेरावे ते उगवते, अधिकांश सुखकारकच असते. ह्यावर निवास करण्यातही सुखच. हवा– ह्याचा स्पर्शही सुखद, श्वास घेतला तरी सुख. जीवजंतूशी साहचर्य वाढवले तरी सुख. मानवी नात्यागोत्यात प्रेम असले तरी सुख. आणि ह्या व्यतिरिक्त ह्या जगात खाणे, पिणे, झोपणे, मेहनत करणे, नाचणे, गाणे, ऐकणे, चिंतन करणे, ज्ञान मिळविणे...प्रत्येक बाबतीत सुखच सुख भरलेले आहे.

दुःखनिवारण सहज शक्य नसते. परंतु हे सर्वकाही सुखदुःखात मिसळलेले आहेत. प्रत्येकजण आपल्या बुद्धीच्या बळावर दुःखाचे निवारण करून सुखप्राप्तीसाठी उतावीळ आहे. दुःखाचा उच्छेद करण्यासाठी प्रतिभाशाली बुद्धी, दुर्दम्य साहस, आणि दृढता अपेक्षित असते. हीच बाब तर साधी सोपी सरळ नाही. खूपश्या अडचणींचा सामना केल्यानंतरच छोटीमोठी सत्ये समजायला लागतात. प्रत्येक मनुष्य आपल्यासाठी सुखाचा महाल उभा करण्यासाठी आतुर आहे. परंतु असाधारण प्रतिभा लागते त्यासाठी. अविचलित मानसिक दृढता, कलाकौशल्यात निपुणता, विद्या, कीर्ती, धनदौलत या सर्वांची अपेक्षा असते आपल्याला. घरदार, भाऊबहिणी, गाववाले, देशबन्धू विश्वबन्धू सुखी आणि संपन्न राहावेत, अशी व्यवस्था आपल्याला करावयाची आहे. आपल्या मोठमोठ्या अपेक्षा आहेत. जर ह्या इच्छा पुऱ्या व्हावयाच्या असतील तर दृढ पायावर हळूहळू वर उभे राहायचे आहे. शाश्वत सुखांची प्राप्ती सहजसाध्य नसते. कोणी निर्धन मनुष्य धनवान होऊ इच्छित असेल तर त्याला काही वर्षे लागतील. अशिक्षित व्यक्तीला सुशिक्षित होण्यासाठी काही वर्षांचे परिश्रम लागतील. कोठल्याही व्यवसायात कौशल्य प्राप्त करावयाचे असेल तरी बराच कालावधी लागेल. आत्मज्ञानाच्या प्राप्तीसाठीसुद्धा काळ जावा लागतो. " जो धीर धरतो, तोच यशस्वी होतो." अधीरतेमुळे कामाचा विचकाच होतो. शिवाय, मध्येच मृत्यूही आडवा येतो. ह्या प्रकारच्या सुखाच्या शोधात, न थकता प्रयत्न करीत, ह्या सर्वांशी दोन हात करीत, योग्य काळाची प्रतीक्षा करीत धीर धरावयाचा असतो. तो भिकारी जे गात होता तसेच घडले तर काय करावयाचे ? झोपेतच मृत्यूने गाठले तर ? किती दुःसह कल्पना आहे. शंभर वर्षे जगू असा निश्चयच असेल तर ठीक आहे, शंभरवर्षांत बरेच काहीसे करून जाऊ. परंतु पुढच्या क्षणाची निश्चिती नाही तर काय करायचे ? नाही, हे चालायचे नाही. कोणत्या ना कोणत्या मार्गाने हे शरीर सुदृढ आणि मजबूत ठेवले पाहिजे. जे

काही आम्हाला करावयाचे आहे, त्याची पूर्ती करूनच आम्ही मरू, तोपर्यंत जिवंत राहू. आमच्या इच्छा आणि कर्तव्ये पुरी करीपर्यंत आम्ही मृत्यंजय आहोत.

## पुनर्जन्म

### पुनर्जन्म होतो

काल संध्याकाळी मदुराईत एक शास्त्रीजी मृत्यू पावले. त्यांचा पुनर्जन्म संभवनीय आहे का ? रस्त्यावरून चालताना एखादी मुंगी कुणाच्या तरी पायाखाली येऊन चिरडली गेली तर ती मुंगी पुन्हा जन्माला येईल का ? ह्यासंबंधी आपल्या पुराणात विस्ताराने चर्चा केलेली आहे. ती वाचून आपण शंकानिरसन करू शकतो. परंतु मी आता जे सांगणार आहे ते थोडेसे वेगळे आहे. मी हिंदुस्थानच्या पुनर्जन्माविषयी काही सांगू इच्छितो.

हिंदुस्थान हे हिंदूंचे स्थान म्हणजे भूमी हेच आपल्या देशाचे आणि देशवासीयांचे नाव आहे. येथील जनतेला ' भारतीय ' असेही म्हटले जाते.

### भारतीय

' भारत ' भरताने संस्थापिला. हा भरत दुष्यंत राजाचा पुत्र होता. हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत पसरलेल्या ह्या देशाला भरताने एका छत्राखाली आणून सर्वप्रथम ऐकाधिपत्य चालविले होते, म्हणून ह्या देशाचे नाव ' भारतवर्ष ' असे पडले. गंगेला जे नदीनाले येऊन मिळतात, ते सर्व गंगामय होऊन जातात. तसेच जे जे लोक भारतवर्षात येऊन राहिले आणि कित्येक पिढ्या येथेच वास्तव्य करून राहिले ते ' भारतीय ' होऊन गेले.

ख्रिश्चन असोत वा मुसलमान, ते कोठूनही येवोत. येथे येऊन आपल्या स्वतःच्या धर्माचे पालन करू शकतात, आपल्या देवदेवतांचे पूजन करू शकतात. ज्यांनी ह्या भारतभूमीत जन्म घेतला, वाढले, ह्या भूमीला शरण आले, त्या सर्वांची गणती ' भारतीयां'तच केली पाहिजे. ' भारतीयां 'चा एकच समाज आहे. तो अखंड आहे. अनादी आहे. अमर आहे. त्याची मूळ शक्ती आर्यसंपत्ती आहे. ही संपत्ती म्हणजेच आर्यांची बुद्धी आणि ज्ञान आणि त्या ज्ञानापासून मिळालेले फल.

**आर्यसंपत्ती**

संपत्ती हा संस्कृत शब्द आहे. याचा अर्थ आहे ' धन. ' परंतु येथे धन म्हणजे द्रव्य, भूमी, गाय, बैल, एवढेच नसून ज्ञान, चारित्र्य, धन या तिन्हींचा सूचक शब्द. आर्यसंपत्ती म्हणजे आर्यांची बुद्धी आणि ज्ञानविकास.

आमचे वेद, शास्त्रे, जनता, भाषा, काव्य, शिल्प, संगीत, नृत्य, उद्योग, व्यवसाय, आमच्या मंदिराची उन्नत गोपुरे, मंडप आणि कुटिरे ... सर्वांना आर्यसंपत्ती असे सर्वसामान्य नाम दिले गेले आहे. संस्कृत कवी कालिदासरचित ' शाकुंतलम् ' नाटक, हिंदीत असलेले तुलसीदासाचे ' रामचरित मानस ', कंबरामायण, शिलपतिकारम्, तिरुक्कुरळ, आंडाळ तिरुमोळी ही सर्व आर्यांची संपत्ती आहे. तंजोरचे मंदिर, तिरुमैलै नायकरचा महाल, त्यागराजाचे कीर्तन, एलोराची गुम्फामंदिरे, आग्रा येथील ताजमहाल, शरभशास्त्रींचे वेणुगान,... ही सर्व आर्यांचीच संपत्ती आहे. आर्यांची संपत्ती म्हणजे हिंदुस्थानीयांचा ज्ञानविकास, हिंदुस्थानची संस्कृती. जोपर्यंत ही सुरक्षित आहे, तोपर्यंत हा समाज जिवंत राहील. त्यावर धूळ बसू दिली तर हा समाज आतून पोखरला जाईल.

हे जग राहील, जोपर्यंत ह्या आर्यसंपत्तीचे संरक्षण करणे आणि ती अधिकाधिक उज्ज्वल आणि यशस्वी बनविणे, हे देवदेवतांनी भारतीयांसाठी विहित केलेले कर्तव्य आहे.

**मध्ययुगीन कालातील आमची पीछेहाट**

शेकडो वर्षे आम्ही ह्या आर्यसंपत्तीचे रक्षण करत आलो आहोत. परंतु गेली काही शतके आम्ही ह्या संपत्तीला गंज लागू दिला. देवदेवतांनी सांगितलेल्या कर्तव्यात आलस्य, अहंभाव, उपेक्षा आणि हीनभावना ह्यांच्यामुळे कसूर केली म्हणूनच देवतांनी आशीर्वाद दिले, की ' हा भारतीय समाज अजून थोडा वाळवीने पोखरू द्या.'

आपण अजगरासंबंधी ऐकले असेलच. असे म्हणतात की त्याची शेपटी आगीत जळत राहिली तरी तो सुखाने झोप काढू शकतो. आपला समाज आणि संस्कृती वाळवीमुळे इतकी पोखरली गेली तरी आम्ही सुस्तच राहिलो. किती हा अभिमान, अहंभाव ! इतकी बेपर्वाई आणि आलस्य ?

आमच्या काव्यापासून कमी आनंद मिळू लागला. ओबडधोबड काव्यप्रकार आमच्या कविमंडळींना सुकर, सुगम वाटू लागले. कविमहाशय ' डोळ्यांना ' ' चक्षू ' म्हणू लागले. काव्यात रसहीनता आली. तत्त्वज्ञान आणि सार ह्यांच्या ऐवजी पोकळपणा वाढत चालला. सचोटी कमी होत चालली. उक्तिवैचित्र्य आणि वक्रोक्ती यांच्या चमत्काराचेच प्रदर्शन अधिक होऊ लागले. कवी कंबनने म्हटले आहे.

" छवियुरत्तोळिदु तणणेंद्वळुक्कमुम तळुविच् चांद्रोर,
कवियेनक् किडंद गोदावरियिनै वीरर् कंडनर, "

– (कंबरामायण)

छवि म्हणजे प्रकाश. हा संस्कृत शब्द आहे. कदाचित् कंबनच्या जमान्यात हा शब्द जास्त प्रचलित होता.

" स्वच्छ, शीतल, गुणवती अशी ही नदी उत्तम कवितेप्रमाणे प्रवाहित होती " अशा प्रकारे कवी कंबन गोदावरी नदीचे वर्णन करतो. कंबनच्या विचाराप्रमाणे कविता प्रकाशमान्, स्पष्ट, शीतल प्रवाहाप्रमाणे माधुर्यपूर्ण असावयाला हवी.

प्राचीन काळचे ग्रंथ तत्कालीन प्रचलित भाषेत रचले गेले आहेत. काळाबरोबर भाषेचेसुद्धा परिवर्तन होत असते. जुने शब्द बदलतात, आणि त्याची जागा नवीन शब्द घेतात. विद्वान आणि कवी यानी समकालीन सामान्य जनाना समजतील अशा शब्दांचेच प्रयोजन केले पाहिजे. अद्‌भुत आणि मार्मिक प्रसंग सरळ मधुर शैलीत प्रस्तुत केले तरच ती चांगली कविता ठरते. परंतु काही शतकांपासून साधुसंत आणि कवी यांनी साध्यासाध्या गोष्टीसुद्धा असाधारण आणि अलौकिक बनवून गूढ आणि अस्पष्ट शैलीचा आधार घेणे हेच पांडित्य आणि प्रतिभेचे लक्षण मानले.

## मध्ययुगीन संगीत

जगातील नाना देशाच्या संगीतात भारतीय संगीताचे विशिष्ट स्थान आहे. काव्याप्रमाणे संगीतातही नवरसांचा समावेश असतो. नवरसांच्या संबंधात एक वेगळा लेखच लिहीन. प्राचीन ग्रंथात कोणकोणते राग, कोणत्या संदर्भात, कोणत्या रसपरिपोषासाठी वापरले जावेत याची शास्त्रीय माहिती आहे. कीर्तनाच्या पदांचा अर्थ, रागाची तरलता आणि रसाचे माधुर्य एकमेकांत संपूर्ण मिसळले गेले पाहिजे. संगीतकार भक्त त्यागराजाच्या जमान्यात आमचे संगीत उज्ज्वल होते. परंतु नंतर ते अंधकारात विलीन होऊ लागले. गीतात रसांचा परिपोष होत नाही. होत असेल तो केवळ शोक म्हणजे करुणरसाचा अन्य रसांना प्राधान्य नाही. गीतस्वरांच्या अनुसार ताल बसवायचा असतो. हा क्रम बदलला गेला आणि आता तालाच्या अनुषंगाने गीत बनते. " माधुर्यापेक्षा जास्त महत्त्व तालालाच आहे " असा निष्कर्ष काढला गेला. सुखानुभूती आणि ताल ह्या दोहोंचे मधुर असे मिश्रण झाले पाहिजे. परंतु केवळ ' ताल 'च असेल तर ते पूर्ण संगीत होत नाही.

## पुनर्जन्म

मध्ययुगीन कालात आमचे जे अध:पतन झाले होते, ते दाखविण्यासाठी संगीत आणि काव्य यांची उदाहरणे प्रस्तुत केली. पण ही स्थिती केवळ त्या दोन क्षेत्रांतच होती असे

नाही. आमची शिल्पकला, चित्रकला, नीतिशास्त्र, हात–पाय...आणि किती सांगू... प्रत्येक क्षेत्रात अवनती झाली होती. मोठा घातक रोगच जणू जडला होता. अशा ऐन मोक्क्याच्या प्रसंगी एका महान धनवंत्रीला अज्ञात शक्तींनी पाठविण्याची कृपा केली म्हणून आम्ही सहीसलामत सुटलो. हाच आमचा पुनर्जन्म ठरला. पुनर्जन्माची सर्व लक्षणे आम्हाला दिसत आहेत. भारतवासीयांनी नवा जन्मच घेतला आज सारे जग मानत आहे की विश्वकवींमध्ये रवीन्द्रनाथ ठाकुरांचा समावेश आहे. आजपर्यंत युरोपीय पडितांनी निसर्गविज्ञान आपली स्वतःची खासगी मालमत्ता मानली होती परंतु आता आमच्या जगदीशचंद्र बसूंनी निसर्गविज्ञानात अद्वितीय प्रतिभा दाखविली आहे. युरोपीय शास्त्रज्ञांतही हे अमान्य करणारा कोणी नाही. निकटच्या भविष्यातच तो दिवस उगवेल की ज्या दिवशी तमिळनाडूत नवी कविता आणि विज्ञानशास्त्रातील प्रतिभा चमकून उठेल आणि सारे जग आश्चर्याने चकित होऊन पाहात राहील.

मृत्यूपासून अगदी बालबाल बचावलो आम्ही. हिऱ्याप्रमाणे कठीण आणि घट्ट होऊन वाचलो. देवदेवतांची कृपा आहे. आमचा हा पुनर्जन्म सुंदर आणि सफल राहावा, ह्यासाठी आम्ही सदैव त्याची प्रार्थना करू.

आमच्या देशवासीयांना विश्वास वाटतो की प्रत्येकाला आपल्या कर्मानुसार, पाप–पुण्याच्या बळावर, पुढच्या जन्मात उच्च किंवा नीच जन्म मिळेल. "तू पुढच्या जन्मी पशू होशील." असे पापकृत्य करणाऱ्याला सांगितले तर तो घाबरून जातो. परंतु मनुष्य ह्या गोष्टीकडे ध्यान देत नाही की ह्या जन्मीसुद्धा ते पशुतुल्यच जीवन जगत आहेत. प्रत्येक क्षणाला मानवाच्या मनात जो विचार येतो आणि तो जे कार्य करतो, तेच त्याचे पुढील काही जन्म ठरवितात. ह्या जगात ज्याने जन्म घेतला आहे, तो ह्या जन्मातच हजारो वेळा जन्म घेतो आणि मरतोसुद्धा. असे म्हणणेच उचित ठरेल की "प्रत्येक क्षणाला कुणीतरी जन्म घेऊन मरतो, मरूनच जगतो." आपण पशुतुल्य जीवन जगणाऱ्या मानवांना पाहिले नाही का ? अंतर्मुख होऊन आपल्याशीच जरा विचार केला तर साफ लक्षात येईल की आम्ही केव्हा कोणता पशू बनलो होतो, कपट, फसवणूक, सोयीप्रमाणे लपवाछपवीचा व्यवहार करणारा मनुष्य कोल्हा नाही तर दुसरा कोण आहे ? अगदी निरुत्साही आणि कामचोर बनून दुर्मुखलेले तोंड घेऊन बसतो तो 'देवांगू'*च असतो ना ? लपूनछपून दुसऱ्यांना हानी पोहोचविणारा सर्पच असतो. आळशी, यशाची अभिलाषा नसणारा, अल्पसुखात खूष असणारा डुक्करच ! आपल्या स्वातंत्र्याचा विचार न करता, दुसऱ्यांच्या इच्छेप्रमाणे चालणारा, त्यांच्या दानावर पोट भरणारा कुत्राच जणू. प्रत्येक छोट्यामोठ्या बाबतीत ज्याच्या रागाचा पारा चढतो तो शिकारी कुत्रा असतो. काँग्रेसमध्ये राहून आंग्ल अधिकाऱ्यांचाही

* माकडाच्या जातीचा दुबळा प्राणी

हितेच्छू बनू पाहणारा 'मेहता' दलाचा मनुष्य वटवाघुळासारखा असतो. आपल्या बुद्धीनुसार विषयाचे संपूर्ण ज्ञान संपादन न करता पूर्वजांनी सांगितल्याप्रमाणेच तेच तेच म्हणणारा पोपटच आहे. इतरांनी केलेली अवहेलना आणि अपमान सहन करूनही, त्याचा प्रतिरोध न करता आपल्या मंदगतीमुळे सहिष्णू बनलेला गाढव असतो. मोठ्या थाटात वावरणारा असतो कलहंस. अशिक्षिताची तर पशूतसुद्धा गणना होत नाही. तो निव्वळ खांबाप्रमाणे असतो. स्वतः परिश्रम न करता, दुसऱ्यांचा पैसा लुटून जगणारा गिधाडाप्रमाणे असतो. एखाद्या नव्या सत्याचा अनुभव होताच, उत्साहाने त्याला स्वीकारण्याऐवजी त्याच्या पासून दूर पळणारा, दिवाभीत घुबडाप्रमाणे असतो.

प्रत्येक मिनिट, प्रत्येक क्षणी जो सत्याचे भाषण करतो, धर्माचे आचरण करतो, परमार्थाचा शोधक बनतो, तोच मानव व देव म्हणवून घ्यायला योग्य असतो. म्हणूनच पशुतुल्य प्रवृत्तींना आम्ही सर्वांनी प्रत्येक क्षणाला पळवून लावण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

## जीवनाची सार्थकता

मानव आणि मानवेतर प्राण्यांच्या दृष्टीने सांसारिक जीवनाचे प्रेक्षित फल कोणते असेल ? शाश्वत, अजस्र, अपरिवर्तित, अमर, आनंदाचा उपभोग घेणे हेच.

ह्या आनंदाच्या प्राप्तीसाठीच मनुष्य विद्याध्ययन करतो, धनसंग्रह करतो. तपस्या, शिक्षा, चोरी, हत्यासुद्धा करतो, दरोडा घालतो, नाचतो, गातो, हसतो, रडतो आणि नांगर चालवितो, परंतु नेहमी कर्मरत राहतो. केवळ मनुष्यमात्रच नव्हे तर प्रत्येक जीवजंतू ह्याच उद्देश्यपूर्तीसाठी कामात निमग्न असतात.

परंतु हे मात्र स्पष्ट आहे की आजपर्यंत कोणी जीवजंतू ह्या नित्यानंदी अवस्थेपर्यंत पोहोचला नाही. महात्मा बुद्धाने ज्या चार सत्यांचा शोध घेतला, त्यांतील सर्वप्रथम सत्य हे आहे की हे सारे जग दुःखाने भरलेले आहे. ह्या अनिवार्य दुःखाचे मूळ कारण हेच आहे की प्रत्येक जीव दुसऱ्या जीवांकडे पाहताना, त्यांच्यासंबंधी विचार करताना भय आणि शंका या दोन्हीपासून पीडलेला असतो.

प्रत्येकाला आपल्याबद्दल किंवा इतरांबद्दल घृणा, जुगुप्सा, क्लेश, चिंता, असहिष्णुता यांनी पीडित होण्याचे कारण अनादी काळापासून सर्व जीवांच्यामध्ये चाललेला संघर्ष हेच आहे, दुसरे कोणतेही कारण नाही.

सर्व सृष्टी समस्त गुण एक आहे, ह्या वेदांतातील दृष्टिकोणाच्या साहाय्याने अज्ञान दूर केले पाहिजे. ह्या ज्ञानाचा बोध आपल्यासाठी तरी नवा मुळीच नाही. जेव्हापासून सृष्टीचा विकास झाला तेव्हापासून किती तरी पंडितांना आणि कवींना ह्या ज्ञानाचा बोध झाला आहे. कोण जाणे किती करोडो लोक हे सत्य पूर्णपणे अवगत न करता केवळ मुखाने त्याचे प्रलाप करत आले आहेत.

ह्या ज्ञानानुभूतीला व्यवहारात आणताना तेच जुने अज्ञान पंडित वा पामर या दोघांच्याही मार्गांत आडवे येते.

"अज्ञानावर विजय प्राप्त केला, तर अमर आनंदाची प्राप्ती होईल." हे वचन शास्त्र, युक्ती आणि अनुभव ह्यांच्याद्वारे आम्हाला समजाविण्यात येते. तरीसुद्धा अज्ञानरूपी भूत आणि काम, क्रोध, मोह, लोभ, मद, आश्चर्य यांच्यासारख्या सहा यमदूतांशी सामना करण्याइतके मानवाचे मन सशक्त नसते. कुत्र्याला धुऊन पूसून, खायला-प्यायला देऊन घरी पाळले तरी तो शेपटी हालवत घाण खायला पळतोच ना ? तसेच कितीही नवनवीन आनंदाचा आणि सुखांचा अनुभव होऊनसुद्धा त्यांच्यात मन रमत नाही. पुनःपुनः जाणूनबुजून कुठल्या ना कुठल्यातरी दुःखाच्या खाईत पडून चुटपुटत राहते.

मन अधीर असले म्हणजे बुद्धी चंचल होते. म्हणूनच बुद्धीवर विश्वास ठेवून मनाला काबूत ठेवले पाहिजे. मनाची स्थिरता राखण्याचा अभ्यासपूर्वक प्रयत्नच सर्व योगात उत्तम योग मानला जातो. मन भरकटत दुःखाच्या खाईत पडते तेव्हा बुद्धीच मार्गदर्शक बनू शकते. जेव्हा बुद्धीसुद्धा मना करते तेव्हा मन त्याची पर्वा करीत नाही. बुद्धीचे उल्लंघन करण्याची शक्ती मनाकडे असते. म्हणूनच मन जेव्हा अधीर होऊन दुःखामुळे विचलित होऊ लागेल तेव्हा दृढता आणि धैर्य यांचा लगाम लावून, त्याला थांबवण्याचा अभ्यास करणे हीच उत्तम योगसाधना आहे. ह्या सिद्धीच्या प्राप्तीसाठी काही लोक संसार सोडून एकांतात जाऊन, डोळे मिटून बसतात, तर दुसरे काही लोक श्वासबंधन, अष्टबंधन अशा प्रकारच्या हठयोगाची साधना करतात. काही तर निर्जन ठिकाणी जपतप करीत बसतात.

जी व्यक्ती संसारापासून दूर न पळता, लोकात मिळून मिसळून राहूनच नित्यकर्म करीत, धर्म आचरत राहील आणि चंचलतेची शिकार कधीही न बनता मनावर विजय प्राप्त करील, तीच खरी साधक होय. हीच सच्ची साधना आहे बाकी सर्व व्यर्थ आहे.

नीती, शांती, समता, प्रेम आदींच्या द्वारे मानसिक दृढता आणि संयम प्राप्त होईल आणि चिर आनंदाची प्राप्ती होईल. ह्याच्या व्यतिरिक्त जीवन सार्थकी लावण्याचा अन्य मार्ग नाही.

## उच्चारण आणि आचरण ह्यातील अंतर—

प्रत्येक व्यक्तीचे आपले स्वत:चे एखादे ध्येय असते. एखाद्या व्यक्तीला इतर व्यक्तीपेक्षा धर्म, न्याय किंवा जातीकडे विशेष ओढा असतो. परंतु लोकमतानुसार हे लाभदायक असेलच असे नाही. कोणताही सिद्धांत चांगले अथवा वाईट फल देऊ शकतो. परंतु एखादी व्यक्ती जेव्हा आपला विश्वास बसलेल्या सिद्धांतानुसार एखाद्या कार्यात मग्न होते तेव्हा तिचा असाच विश्वास असतो की ते कार्य स्वत:च्या आणि इतरांच्या भल्या-साठीच आहे. अत्याचार करणाऱ्या शासनात भुकेलेले–तहानलेले राहून सरकारी अधिकाऱ्यांकडून झालेले अपमान सहन करीत, आपली प्रतिष्ठा गमावून अत्यंत कष्टाचे जिणे जगावे लागते. शेतात राबणाऱ्या शेतकऱ्यालाही अनेक अडचणींना तोंड द्यावे लागते. वेळेवर पाऊस पडत नाही, पडलाच तर नांगरण्यासाठी बैल मिळत नाहीत. नांगरून झालेल्या शेतात पेरायला चांगले बी बियाणे मिळत नाही. बी-बियाणे मिळाले तर पेरणी करून, उगवलेल्या रोपट्यातून तृण काढून टाकून, पिकाची काळजी घेत वाढवून, वेळेवर ते कापून घरी आणावे आणि धान्याचा साठा करून सुखाने राहावे तर ह्याच्यासाठी आवश्यक पैसा नसतो. इतके काबाडकष्ट करून धान्य घरी आणले तर त्याचे फल भोगण्याची क्षमताच उरत नाही. कारण सरकारचे देणे पुरे करण्यासाठी ते धान्य सारेच्या सारे विकावे लागते. म्हणूनच शेती किंवा शेतमजुरी करण्यापेक्षा दुसरा कोणताही धंदा करण्याच्या इच्छेने तो दरोडेखोरांच्या कंपूत सामील होऊन, दरोडे टाकत, लूट मिळवीत उदरनिर्वाह करू लागतो. जरी ह्या त्याच्या कृत्यामागे त्याचे स्वत:चे उदरनिर्वाहाचे ध्येय असते, तरी ते इतरांना हानिकारक असते. परंतु तो तर आपद्धर्माचेच पालन करीत असतो. त्याची पत्नी आणि बालबच्चे उपाशी आणि नग्ना-वस्थेत आहेत. खायला अन्न नाही तर लाज झाकायला कपडा नाही अशी अवस्था असते. कुटुंबप्रमुख पुरुष ह्या नात्याने आपल्या कुटुंबाचे पालन पोषण करण्यास असमर्थ ठरल्यामुळे त्याचा अभिमान गळून पडतो. हे तर सिद्ध झाले आहे की शेती करून काही लाभ होण्याची आशा नाहीं. ह्याच्या उलट, चोरी करून का होईना पोटात काही ना काही जरूर पडेल. इंग्रजांच्या कृपेने प्रवासी नि:शस्त्र असतात. पोलीस म्हणून देशी रखवालदारच असतात, त्याचे वेतन फार कमी असते. शिवाय त्यांचा असा विश्वास आहे की त्यांच्या साहाय्याशिवाय हे विदेशी शासन टिकणार नाही म्हणून मोठ्या आत्म-विश्वासाने चोरी करावयाला तयार असतात. डाका घालणारे, लुटारूंना सहकार्य करून त्यांच्या लुटीतील हिस्सा मागून आपले पोट भरणारे हे लोक ! अशा परिस्थितीत लूटमार करून पोट भरणे हेच श्रेयस्कर असेच एखादा शेतकरी म्हणू शकेल. हा धंदा हिंसाचारी आहे. हिंसाचार तर पाप आहे. ह्या पापकर्मामुळे मोक्षाचा मार्ग बंद होईल

अशी त्याला शंका असते. म्हणून ह्यापासून वाचण्याचा मार्ग तो शोधून काढतो. डाका टाकताना तो काहीलोकांना हातसुद्धा लावीत नाही. स्त्रिया, रोगी, दूरचा प्रवास करणारे यात्री आणि यांच्यासारख्या इतर काही लोकांवर तो हात उगारत नाही. एवढे करूनही त्याचे समाधान होत नाही, आपल्या लुटीच्या मालातील एक हिस्सा तो दानधर्मात देतो. आपल्या स्वतःची समजूत घालतो की दिवसाढवळ्या लुटणारे सावकार, देण्याघेण्याचा व्यवहार करणारे हृदयहीन महाजन...ह्यांना लुटले तर काय बिघडले ? उठता–बसता, चालता–पळता कर लावणारे हे सरकार ! जमिनीवर कर, पाण्याचा कर, रस्त्याचा कर, मिळकतीवर कर, खर्चावर कर, व्यवसायावर कर, घरावर कर, जकातकर, विक्रीकर, रेल्वेकर, दारूवर कर, कुत्र्यावर कर, आयातीवर कर, निर्यातीवर कर, ह्यासारखे असंख्य कर लावून सरकार आमचे घरबार, जमीनजायदाद, गाय–बैल, भांडी-कुंडी यांचा लिलाव करून टाकते, त्या सरकारला आम्ही का लुटू नये ? अशा प्रकारचे विचार त्याच्या मनात येतात. शेवटी नाना तर्कवितर्कानंतर लूटमार करूनच पोट भरणे श्रेयस्कर आहे, असा निश्चय तो करतो. हा त्याचा निश्चय जन्मजात गुण व निसर्ग याच्याविरुद्ध असला आणि धर्मसंगत नसला, तरी जीवनाची मागणी आणि आवश्य-कता यांच्यामुळे आपद्धर्म म्हणून त्याच्या मनात घर करून बसतो. ह्यालाच एक सिद्धांतांचे स्थान देऊन तो आपल्या कर्माला प्रवृत्त होतो. काही जण अशा प्रकारचा वाद घालतील. ते काहीही म्हणू द्यात, वा करू द्यात. ज्याला आपला स्वधर्म म्हणून मानले तेच करून तो आपली गुजराण करील. त्याचे बोलणे आणि वागणे ह्यात साम्य आहे. दोन्ही एकमेकाला पूरक आहेत. ह्या दृष्टिकोणातून पाहता त्याला 'दृढचित्त' पुरुष असे म्हणावे लागेल.

सिद्धांत म्हणजे काय ? विवेचन करून त्यातील तत्त्वार्थ समजून घेतला पाहिजे. कारण आपल्यामध्ये असे काही लोक आहेत जे निश्चित मते आणि विचार बनल्या-शिवायच कार्यरत असतात. ज्यांच्यात विवेचनात्मक बुद्धी किंवा शक्ती नसते, त्यांचे स्वतःचे काहीही सिद्धांत नसतात. ज्याचे स्वतःचे सिद्धांत असतात, त्याच्यात विवेचना-त्मक बुद्धी असतेच. समजा, की एक गाव आहे, आणि त्या गावातील सर्व रहिवासी एकाच जातीचे किंवा एकाच वर्गाचे आहेत. सर्वच्यासर्व 'कळ' जातीचे (चोरीचा धंदा करणारी जात) आहेत. त्यांची प्रत्येक पिढी ही दरोडा घालण्याचाच धंदा करते, हाच त्यांच्या उपजीविकेचा व्यवसाय असतो. त्यातील एकेकाचे उदाहरण घेऊ. त्याचा पिता दरोडेखोर आहे, आजा, पणजा, शेजारी, मामा, मेव्हणा, प्रत्येक जण दरोडेखोर आहे, म्हणून तोपण दरोडेखोर आहे. म्हणजे तो परंपरागत डाकू आहे. अशा व्यक्तीचे उदाहरण घेतले तर असे म्हणता येणार नाही की तो आपल्या सिद्धांता-नुसार कर्म करतो. त्याच्यात विवेचनात्मकबुद्धी नसेलही. असेही असेल की त्याच्यात

ती शक्ती नसेल. परंतु तो आपल्या बुद्धीच्या बळावर, एखादा सिद्धांत मानून, त्याप्रमाणे कर्म करणारा नाही. कितीतरी चालणारे–फिरणारे मुडदे मानवजन्म मिळण्याचा उद्देश समजल्याविना खातपीत असतात आणि एके दिवशी मरून जातात. हे लोक, बरे अथवा वाईट, कोणत्यातरी एका सिद्धांताचे पालन करून, त्याशी दृढसंकल्प राहून आपण आखून घेतलेल्या कार्यात मग्न राहणाऱ्यांपैकी नाहीत. परंतु सिद्धांत म्हणजे काय ?

कोणत्याही कार्याचे औचित्य वा अनौचित्य आपली विवेचनात्मक बुद्धी आणि खोलवर चिंतन–मनन यांच्या द्वारा ओळखणे आणि त्याला आपला जीवनाधार बनविणे म्हणजेच सिद्धान्त. आपल्या देशातील कितीतरी लोक अशा सिद्धांतांचा स्वीकार करण्यास समर्थ आहेत. परंतु कोणताही सिद्धांत अगदी कोऱ्या स्वरूपात स्वीकारणे ही एक गोष्ट झाली आणि त्याला आपल्या आचरणात आणणे ही दुसरी गोष्ट झाली. जर कोणी एखाद्या सिद्धांताचा स्वीकार करून, त्या मार्गाने जाण्यास असमर्थ ठरला तर तो ' जिवंतप्रेता 'च्याच वर्गात गणला जाईल.

ह्यावरून स्पष्ट होते ते असे की ह्यांना दोन वर्गात वाटता येईल. सिद्धांत किंवा आदर्शरहित क्षुद्र मानव, आणि स्वीकारलेल्या सिद्धांताप्रमाणे आचरण करण्यात असमर्थ ठरलेले क्षुद्र लोक. ह्या दोन्ही वर्गातील लोकांकडून समाजाची फारशी हानी होईल असे नाही परंतु हे लोक जोपर्यंत जिवंत आहेत तोपर्यंत भुईला भार होऊनच राहतील, इसकेच !

आजकाल एक नवा वर्ग डोके वर काढू लागला आहे. हा आतड्यांना लागलेल्या कृमीप्रमाणे असतो. ह्यांनी आपल्या डोक्यात नानाप्रकारचे मोठमोठे सिद्धांत भरलेले आहेत. त्या सिद्धांतांना विकूनच हे पोट भरत असतात. हे लोक सार्वजनिक सभांत उभे होऊन मोठ्या विस्ताराने उपदेश करत असतात. आम जनता ह्यांच्या त्या महान सिद्धांतांनी चक्रावून जाते आणि त्यांचा असे समजून आदर करू लागते, की हे लोक म्हणजे उच्च आदर्शांची जणू खाणच आहे, ह्यांचे हृदय अगदी अस्सल हृदय होय. आणि ही माणसे महान् व्यक्ती आणि अवतारी पुरुष होत. ह्या आदरसत्काराचा प्रफुल्लित मनाने स्वीकार करताना ह्या माणसांना अभिमान वाटतो. परंतु ह्याच माणसांचा पीछा करीत त्यांचा मागोवा काढीत गेले तर दिसेल की तेथे कचरा आणि जगभरची घाण भरलेली आहे. ह्या महान व्यक्तीचे कर्म आणि आचरण त्या कथित सिद्धांतांच्या अगदी विपरीत असते. " टोचून पाहणारा नसेल तर नदीचे प्रचंड पात्र काय वर्णावे ?" ह्या तमिळ म्हणीनुसार ह्यांना डिवचले की लगेच ते गरमागरम भाषणे ठोकतात आणि चिडून म्हणतात की, " तुम्हा मंडळींनी माझ्या बोलण्यानुसार वर्तन करावे, माझ्या आचरणाचे अनुकरण करू नये." असे म्हणून ते लोकांच्या डोळ्यांत

धूळ फेकनात. ह्याच्यापेक्षा वाईट गोष्ट तर ही की जादुगाराप्रमाणे ते आपले सिद्धांतही बदलू शकतात.

ह्या द्रोही पाप्यांकडून आमच्या देशाची किती हानी होत आहे, याची गणती नाही. कारण ह्यांचे अनुकरण करून कित्येक मूढ लोक कुमार्गाला लागतात. आपल्याला उच्च सिद्धांताची अपेक्षा आहे, ह्या व्यक्तींची नाही. जर कोणी आपल्या श्रेष्ठ सिद्धांताची घोषणा करीत त्याच्याविरुद्ध आचरण करू लागला तर त्याचा आदर राखणे म्हणजे आपला मूर्खपणा होय. आपण त्याचा बुरखा फाडला पाहिजे. त्याला अपमानित केले पाहिजे. जर कोणी एखादा कॉफीचा प्याला, खाणे आणि कपडे ह्यांसाठी आपल्या श्रेष्ठ सिद्धांतांचा त्याग करील त्याची गणती कशात करायची? त्याच्याहून तुच्छ, नीच आणि पतित व्यक्ती दुसरी कोणी होऊ शकत नाही. त्याच्यापुरतेच बोलायचे झाले तर त्याचे बोलणे आणि करणे ह्यात महदंतर आहे.

आम्ही भारतवासी आज परतंत्र आहोत. आपले सर्व अधिकार आणि स्वातंत्र्य आम्ही गमावून बसलो आहोत. कोठून तरी आलेल्या गोऱ्या जातीच्या लोकांचे गुलाम होऊन पडलो आहोत. आम्ही तीस कोटी आहोत तर त्यांची संख्या दोन लाखसुद्धा नाही. साऱ्या जगाला ही विचित्रच गोष्ट वाटते. याचा अर्थ असा मुळीच नाही की तीस कोटी लोकांवर शासन करणाऱ्या आंग्लांना जगातील इतर देशातील योद्धे अद्वितीय बलशाली मानतात. परंतु आम्ही त्यांच्या नजरेतून उतरलो आहोत. आमच्या-विषयी त्याच्यात तिरस्कार आणि अनादराची भावना निर्माण होते. जेथे जातील तेथे भारतीयांची अवहेलनाच होते. लोक आपल्यावर थुंकतात. लोकांचा असा विश्वास बसला आहे की आम्ही भारतवासी शेळयांच्या कळपांसारखे आहोत. आंग्लच काय, परंतु कोणीही पाहिजे तर आमच्यावर शासन करू शकेल. अश्या अवस्थेत आम्ही मोठेपणा दाखविला तर ते अनुचित ठरेल. स्वातंत्र्य मिळविल्यानंतरच आम्ही आमच्या मिश्यांना पीळ देऊ शकू. आताच जर थाटमाट दाखविला तर जग हसेल.

प्रत्येक भारतीय स्त्रीपुरुषाकरिता एकच माननीय सिद्धांत आहे. आपल्या प्रिय मातृभूमीला स्वतंत्र करून नंतर असे जीवन व्यतीत करणे की इतर लोक घाबरून का होईना आमचा आदर राखतील. ह्या ध्येयपूर्तीत जी विघ्ने येतील त्यांची पर्वा न करता नेहमी आगेकूच करावयाची आहे. ह्या ध्येयापर्यंत पोचण्यापूर्वी आपल्याला कोणत्याही प्रकारची सुखसुविधा, आराम किंवा प्रतिष्ठा यांच्यामागे जायचे नाही. घरबार, बाल–बच्चे, पत्नी या सर्वांना सोडण्याची पाळी आली तरी त्यासाठी तयारी ठेवायची आहे.

" मेय्वरुत्तम पारार् पसिनोक्कार कणतुंञार

ए व्वेवर तीमैयुम् मेर्कोल्लार, सेवि

अरुमैयुम पारार् अवमदिप्पुम् कोल्लार
करुममे कण्णायिनार् "

ह्याचा अर्थ असा– "कर्मशील व्यक्ती आपले शारीरिक श्रम, भूक, तहान, निद्रा यांचा विचार करीत नाही. कोणी त्याला दुःख वा संताप आणील वा त्रास देईल तरी त्याची पर्वा करणार नाही. आपल्या पवित्र कर्तव्यासाठी अटल राहणारी कर्मठ व्यक्ती मानापमानाचा विचार करीत नाही."

पूर्वपुरुषांच्या ह्या सूक्तीच्या अनुसार आपल्याला मार्गक्रमण करावयाचे आहे. जो अशा आदर्शाचे आचरण करण्यास असमर्थ आहे, त्याने आपला भेकडपणा जाहीर करून माघार घेतली पाहिजे. "मीपण स्वातंत्र्यासाठी संघर्ष करणारा आदर्शवादी आहे" असे म्हणून वृथा अभिमान बाळगायची आवश्यकता नाही. ज्याने स्वातंत्र्याच्या आंदोलनात भाग घेतला आहे त्याने आपला प्राण वगळता इतर सर्वांचा त्याग करण्यासाठी तयारी ठेवली पाहिजे. भारतवासियांनो ! आळश्याचा कोठलाही सिद्धांत असू शकत नाही. ऊन असो वा पाऊस, तहान, भूक, वादळ, पाणी ...जे असेल त्याचा विचार करायचा नाही. जर हे शरीर क्षणभंगुर आहे तर ही कशी शाश्वत असतील ? पंचेंद्रियांच्या भुकेने व्याकुळ होऊन ऐंद्रीय सुखाच्या मागे पडून स्वराज्य धर्म विसरू नका. ब्रह्म सत्य असते. सत्याचाच विजय असतो. तुम्हाला पारतंत्र्यातून मुक्त व्हावयाचे आहे, एवढेच नव्हे तर, आपल्या विजयाचा डंका वाजवत जगाच्या काना-कोपऱ्यात पारतंत्र्याच्या बेडयात जे जे अडकलेले आहेत त्यांना स्वतंत्र करावयाचे आहे. तुम्ही आपल्या कर्माने भारतमातेला पूर्वीप्रमाणे जगाच्या कपाळावरील तिलक म्हणून उज्ज्वल अवस्थेत नेऊन ठेवले पाहिजे. म्हणून सांगून ठेवतो की ह्या सिद्धांतांचा त्याग करू नका... करू नका.

## ज्ञान–रथ*

(पूर्व पीठिका)

संध्यासमय होता. तिरुवल्लिकेणी वीरराघव मुदली गल्लीत उभा राहून समुद्राच्या दिशेने पाहात होता. मी घरातल्या चबुतऱ्यावर विश्रांती घेत लवंडलो होतो. खोलीच्या चारी बाजूला असलेल्या काचेच्या खिडक्यातून आणि मागल्या दरवाज्यातून सुखद

* फक्त पहिला अध्यायच येथे दिला आहे.

थंडगार हवेच्या लहरींनी सर्व खोली व्यापली होती. संध्यासमयीचं वातावरण, आणि शीतल हवा यांच्या आनंदामुळे माझ्यात जे माधुर्य आणि मस्ती भरली होती ती वर्णनातीत आहे. विचार केला—" वाहवा ! आता जाऊन मन:पूत स्नान करून आणि नंतर सुंदर घोडागाडीत बसून समुद्रकिनारच्या अडैयारपर्यंत जाईन आणि रस्त्यात कालिदासाचं शाकुंतल किंवा एखादं उपनिषद् यांचा रसास्वाद घेईन तर किती मजा वाटेल ?" तेव्हाच ध्यानात आलं की माझ्याजवळ घोडागाडी नाही.

वाटलं—अरेरे ! धनाभावामुळे जगात लोक किती प्रकारच्या निकृष्ट ऐहिक सुखांपासूनच नव्हे तर उत्कृष्ट सुखांपासूनही वंचित आहेत ? माझ्या अंतरात्म्यानं मला टोचलं–" अरे मूर्खा ! परमेश्वरानं सर्व मानवांना ज्ञानरूपी अलौकिक रथ प्रदान केला आहे, ज्यात बसून वाटेल त्या दिशेकडे जाऊन मनाला वाटेल त्या दृश्याचा आनंद लुटण्याची शक्ती मिळते तर मग ह्या असल्या फडतूस गाडीत बसण्याची इच्छा कशाला करतोस ? जी तुला सुख दिल्याशिवाय न जाणे कोणत्या क्षणाला खाली ढकलून देईल." मी त्वरित माझा सेवक 'संकल्प' याला ज्ञानरथ तयार करण्याची आज्ञा दिली. रथ येऊन माझ्यासमोर उभा राहिला. मी तत्क्षणी त्यात सवार झालो. परंतु माझं ज्ञान इतरांच्या रथांप्रमाणे वेगवान नाही. क्षणार्धात दूरवर उडत घेऊन जाईल असं द्रुतगतिवानही नाही. जरा लंगडं आहे. काय करणार ? जे काही आहे त्यातच काम चालवायचं आहे ना ? म्हणून मी रथावर आरूढ झालो. ह्या ज्ञानरथावर आरूढ होऊन मी जे काही पाहिलं, त्याच दृश्यांचं आणि अद्भुत गोष्टींच वर्णन केलं आहे.

**उपशांतो लोक** (चिंतारहित लोक)

" दु:खरहित स्थान जेथे म्हणून असेल तेथे मला ताबडतोब घेऊन चल."

ज्ञानरथाला पाहताच माझ्या मनात विचार आला म्हटलं, अरे ! इतका सुंदर रथ असतानासुद्धा इतके दिवस दु:ख आणि चिंता यांच्यापासून सुटका करून घेण्याचा मार्ग मला दिसला नाही. किती दिवस माझं हृदय जाळ्यात अडकलेल्या किड्याप्रमाणे तडपत होतं, सुटकेचा मार्ग न सापडल्यामुळे मी विव्हळत होतो. संसाराच्या चिंतांची आठवण येताच माझं मन घाबरायला लागतं. त्यांच्या घातकी आणि विषासारख्या शक्तीसंबंधी मी काय काय सांगू ? ह्या चिंता चेहऱ्याचं सौंदर्य आणि यौवन एकदम नष्ट करून टाकतात. नेत्रांचा तजेला मंद होऊन जातो, शरीर पिवळं पडायला लागतं. ह्या घातकिणीमुळे डोक्यावरचे केस गळू लागतात तर कपाळावर आठ्या पडतात. माझा गोड आवाज कर्कश बनतो. माझी छाती आणि बाहू यांच्यातील शक्ती पार पळून जाते. रक्तसंचाराची गती धीमी होते आणि ती मैल्यानं भरलेल्या नाल्याप्रमाणे मंद होते. पाय कमजोर होतात. ह्या चितारूपी विषारी किड्यांची शरीराच्या आत कसर

लागते. ती शरीराचाच नाही तर बुद्धीचाही नाश करून टाकते. स्मरणशक्ती कमजोर होत राहते, महत्त्वाच्या गोष्टी ऐनवेळी आठवत नाहीत. मरुभूमीवरील वर्षाप्रमाणे सारं ज्ञान, शिक्षण, निष्फल होऊन जातं. मेघाच्छादित आकाशाप्रमाणे बुद्धी अंधुक होऊन जाते. चितारूपी घातक व विषारी कोटाणूंची अशी विघातक शक्ती वैद्यकशास्त्रात सांगितलेल्या अदृश्य, भयंकर रोगजंतूंतही नसते.

मी आज्ञा केली, "हे ज्ञानरथा ! आता मला चितारहित दुनियेत घेऊन चल." परंतु ताबडतोब मनानं डिवचलं, 'अरे ! हे इतकं सुखमय नाही. चितारहित होणं, एवढंच पुरेसं आहे का ? इतर सुखोपभोगांचं स्थान तुझ्या आठवणीत कसं नाही राहिलं ? मला तरी वाटतं की जिथं चिता नाही, तिथं सुखही नसतं. शिवाय—मला सांगता येत नाही की कारण काय फक्त एवढंच म्हणेन—तुझं तिथं जाणं मला आवडत नाही."

मनाचं हे म्हणणं ऐकताच माझा पारा चढला. छे ! छे ! अरे वेड्या मना ! सारखं दुःख, वेदना आणि व्यथा यांनी पीडित असलेल्या तुझी दया येऊन मी विचार केला होता की थोडा काळ का होईना. तुला शांती मिळवून देईन. परंतु तू स्वतःच विरोध करत आहेस ? माझं हे म्हणणं ऐकूनही मन आपल्याच मनाला चिकटून राहिलं, माझ्याशी सहमत झालं नाही.

मनरूपी मोहिनीवर मी प्यार खूष असतो. ह्या मोहाचा नशा कसा चढला होता, ह्याचं वर्णन मी येथे करू शकत नाही. ते मोठं रहस्यच आहे. कालांतरानं मी इतका मुग्ध झालो की मन आणि मी असं वेगवेगळं अस्तित्वच उरलं नाही. द्वैताची भावनाच राहिली नाही. मनाची ही व्याकुळता माझ्याकडून सहन झाली नाही. आणि म्हणूनच उपशांती लोकाच्या दर्शनार्थ मी उत्सुक झालो. परंतु मनाची माझ्या प्रस्तावावरील नाराजी पाहून मला मोठं आश्चर्य वाटलं. रागही आला. मी मनाला शांत करण्याचा प्रयत्न केला. परंतु हट्टवादी मन जरासुद्धा पाझरलं नाही. अडेलतट्टू प्रमाणं अडून बसलं. मला समजेना की काय करावं ? मग मात्र मी दृढ शब्दांत सांगितलं, "अरे मना ! ह्या एका गोष्टीत मी तुझं ऐकणार नाही. तुझ्या भल्यासाठीच मी हे करतोय्. समजलं ! ठीक तर ! ज्ञानरथा ! चल घेऊन आम्हाला !"

पुढील काही क्षणांतच आम्ही उपशांती लोकापर्यंत पोहोचलो.

गगनचुंबी किल्ल्याच्या चारदरवाजाच्या मुख्य द्वारापाशी रथ थांबला. लांबवर किल्ला दिसत होता. मला वाटलं होतं की रथ पोहोचताच दरवाजा आपोआप उघडेल. परंतु असं झालं नाही. केवढी आश्चर्याची गोष्ट ! नाही ! "हा लोक इतका पवित्र आहे की ज्ञानरथसुद्धा आत प्रवेश करू शकला नाही," असा विचार करून मी हैराण झालो. माझं मन तर पहिल्यापेक्षा हजारपटीनं अधिक कापायला लागलं. माझ्याशी ते

काहीही बोलू शकलं नाही बिचारं. किल्ल्याच्या प्रवेशद्वाराशी एक द्वारपाल हातात नंगी तलवार घेऊन उभा होता. प्रज्वलित अग्नीप्रमाणे लाल आणि हिमालयाचे सुद्धा एकाच वारात तुकडे करील अशा धारदार तलवारीवर डोळे चमकावून टाकणाऱ्या अक्षरांत कोरलं होतं 'विवेक'! द्वारपालाने विचारले, "कोण तू? कशासाठी आलास?"

त्याला प्रणाम करीत मी म्हणालो, "उपशांतिलोकाचं दर्शन करायला आलोय." हे ऐकताच तो मोठमोठ्याने हसू लागला.

"हसतोस का बाबा?" मी विचारलं. तो तर उत्तर न देता हसतच राहिला. बिचारं मन क्षणाक्षणाला अधिकाधिक घाबरू लागलं. मी पण हैराण झालो होतो. मी रागानं त्याच्याकडे पाहिलं आणि विचारलं, "एकाच शब्दात सांग. मी आत जाऊ शकतो की नाही? असं काय हसतोस?"

ह्यावर मात्र तो पुटपुटला, "अरे! तुझ्यात आणि उपशांतीत बरंच अंतर आहे." त्याचं हे पुटपुटणं माझ्या कानापर्यंत आलं होतंच. मग तो जोरात म्हणाला, " नाराज होऊ नकोस, पण उपशांतिलोक म्हणजे एखादं नाट्यगृहच आहे काय की जे पाहून तू परत जाऊ इच्छितोस?" हे ऐकून मात्र मला हसू आलं. "साधारणपणे जे येतात ते परतून जात नाहीत."

"समजलं! आम्ही आत प्रवेश करू शकतो की नाही, तेवढं सांग."

आत येऊ शकता तुम्ही, हे तर सर्व जीवांचं माहेरघर आहे. येथे येणाऱ्या कुणाही जीवाला थांबवण्याचा मला अधिकार नाही. परंतु 'वैराग्य' किल्ल्याच्या पलीकडे जाऊन पुढे प्रवेश करण्याचा अधिकार तुझ्याबरोबर आलेल्या, मनरूपी मिथ्यावस्तूला नाही. मनानं आत प्रवेश केला तर अग्निलोकात गेलेल्या कापसाच्या पुतळ्याप्रमाणे जळून भस्म होऊन जाईल."

तेव्हाच माझ्या ध्यानात आलं की उपशांतिलोकाचं नाव ऐकताच माझं मन भीतीनं थरथर का कापत होतं. आणि मला येथे न येण्यासाठी का विनवत होतं. किल्ल्याच्या नजीक येताच धर्मदेवतांच्या समोर उभ्या केलेल्या अत्याचारी राजाप्रमाणे शुद्ध हरपून घाबरून गेलो. ह्या लोकात प्रवेश करण्याचा माझा उत्साहही पार मावळून गेला होता. माझ्या मनावर माझा इतका मोह जडला होता की ते मारून स्वतः सुख भोगण्याची माझी इच्छा नव्हती.

द्वारपालाला विचारलं, "बोल बाबा! आता मी काय करू?"

त्याने उत्तर दिलं, "अरे मानवा! मन मेल्यानंतरच उपशांतीची प्राप्ती होईल. जोपर्यंत ते अस्तित्वात आहे तोपर्यंत चिंतेपासून मुक्त होण्याची इच्छा करणे बेकार आहे. चितारूपी असुरांना जन्म देणारी माता म्हणजेच मन. त्या मोहाविनीसंबंधी तुझी

मोहांधता अजून कमी झालेली नाही. परिपक्व अवस्थेला पोहोचल्यानंतरच तू येथे येऊ शकतोस–आता निघून जा बरं येथून."

बस. क्षणार्धात तो किल्ला, द्वारपाल दिसेनासा झाला. क्षणभर डोळ्यांपुढे अंधारी आली. पुन्हा जेव्हा डोळे उघडले तेव्हा मी त्याच वीरराघव मुदली गल्लीत त्याच घराच्या मजल्यावरच्या खोलीत खाटेवर पहुडलो होतो आणि समुद्राच्या दिशेने थंडथंड हवा येत होती.

"जाऊ द्या. उपशांति लोकात जाण्याचं भाग्य आम्हाला मिळालं नाही. पर्वा नाही. परंतु बिचाऱ्या मनाची हत्या करून स्वत: मात्र सुख आणि आनंद लुटणं ही कृतघ्नता आहे की नाही ? बिचाऱ्या मनाची चिंता आणि दु:खाविषयी विचार केला होता, त्यापासून मला जो मोठा लाभ होत आहे, त्याचा विचार मात्र केला नाही. हे जीवन मिळावयाला मनच कारणीभूत आहे. मनाला ईश्वर म्हटले तरी अतिशयोक्ती होणार नाही. शिवाय माझ्यासाठी तो आणि त्याच्यासाठी माझ्याशिवाय अन्य ह्या धरतीवर अभिन्न मित्र कोण आहेत ? त्यांचा द्रोह करू का ? कोटिकोटी चिंतांनी पिडलं, तरी पर्वा नाही. मनाविना मला एकट्याला जगायचं असेल तर तो उपशांतिलोक कितीही अनुपम आणि अलौकिक असो, मला नको आहे."–असा मी दृढनिश्चय केला आहे, मनोमन म्हटलं 'उपशांती...शांती' असं ओरडणाऱ्यांना ही दुनिया ब्रह्मज्ञानी आणि महर्षी म्हणून पूजते ना, खरं तर हे लोक महामूर्ख आणि द्रोही आहेत.

मला असा विचार करताना पाहून, मनाने एक मोठा नि:श्वास टाकला. ते आता थोडंसं शांत झालं होतं. त्याची भीती दूर होत चालली होती. मी सुद्धा आनंदानं श्वास घेऊन मनरूपी मोहिनीला चुंबन दिलं.

## भगवद्‌गीतेची भूमिका *

"हे अर्जुना ! समत्वबुद्धियोगयुक्त पुरुष पुण्य आणि पाप ह्या दोन्हींचा ह्या जगात त्याग करतो म्हणजे ह्या दोन्हींत अडकून राहात नाही. म्हणून तूही समत्वबुद्धियुक्त होऊन जा, कारण हा समत्वयोगच कर्मकुशल आहे" ( **गीता–दुसरा अध्याय पन्नासावा श्लोक** )

---

* भारतींनी गीतेचा अनुवाद केला आहे आणि त्या अनुवादाला एक सुंदर प्रस्तावना लिहिली आहे. त्याचाच काही अंश येथे दिला आहे.

गीतेत भगवान जो उपदेश करतात तीच गीतेची आधारशिला आहे. समत्वबुद्धीने युक्त होणे म्हणजे बुद्धीला निष्काम आणि निर्विकार ठेवणे होय. अशा अलिप्त व निष्काम बुद्धीचाच वरील श्लोकात विचार आहे. बुद्धी निष्काम आणि निर्विकार ठेवणे याचाच अर्थ असा की चिंता आणि त्याला आधारभूत असणाऱ्या पापी विचारांपासून बुद्धीला दूर ठेवणे–

" आपण शिशुतुल्य न बनाल तर मोक्षसाम्राज्याची प्राप्ती होणार नाही "—ह्या महात्मा येशू ख्रिस्ताच्या उपदेशाचाही अर्थ हाच आहे.

" बालकाप्रमाणे व्हा," याचा अर्थ हा नाही की आपण आपल्या लौकिक अनुभवांना विसरून जावे, मिळवलेले ज्ञान आणि विद्या सोडून द्यावी आणि नवजात बालकाप्रमाणे मातेचे स्तनपान करत बोबडे बोलावे. ह्याचे तात्पर्य हेच आहे की आपण आपले हृदय शिशुहृदयाप्रमाणे निष्कलंक आणि निर्मळ ठेवावे.

जोपर्यंत हृदय निर्विकार आणि निश्चल राहणार नाही, तोपर्यंत बुद्धी निश्चल होणार नाही. जोपर्यंत हृदय पूर्णरूपाने विकाररहित होत नाही तोपर्यंत अधूनमधून बुद्धी शांत असूनसुद्धा पुन:पुन: विचलित होईल.

निर्विकार हृदयातच निश्चल बुद्धी राहू शकेल. भगवान म्हणतात, " हे अर्जुना ! समत्वबुद्धीने युक्त, निष्काम योगाच्या स्थितीत तू राहावेस. अशा स्थितीत तू जे जे कर्म करशील, ते पुण्यकर्मच ठरेल. तू निष्क्रिय राहिला तरी चांगले होईल. तू सत्कर्म आणि दुष्कर्म या भेदांना विसरून आपल्या इच्छेप्रमाणे तुला वाटेल ते करू शकतोस. कारण समत्वबुद्धियुक्त योगस्थितीत तुझे कुठलेही कर्म पापकर्म ठरणार नाही. तुझी बुद्धि निष्काम–निर्विकार झाली ना की मग तुझ्या हातून कधीच पापकर्म होणार नाही. म्हणून पाप–पुण्याचा विचार न करता इच्छित कार्यात मग्न राहा."

वरील श्लोकाचा अर्थ ह्या दृष्टीने न घेता, " पापकर्म–पुण्यकर्म दोन्ही सोडून म्हणजेच सर्व प्रकारचे कर्म त्याज्य ठरवून, हे अर्जुना ! तू नेहमी निष्क्रिय राहा"— असा भगवानांचा उपदेश आहे असे मानणे म्हणजे मूर्खपणाच्या व्यतिरिक्त दुसरे काही नाही.

कारण पुढे तिसऱ्या अध्यायात भगवानांनी म्हटले आहे, " कोणीही पुरुष एक क्षण-भरसुद्धा कर्म केल्याविना राहू शकत नाही. समस्त जीव, नैसर्गिक गुणांच्यामुळे स्वभावत:च कर्मरत राहतात. ह्यावर त्यांचासुद्धा ताबा नसतो."

म्हणून मनुष्याला कर्माचे अनुष्ठान आवश्यकच आहे. कुंभकर्णसुद्धा नेहमीच निद्रिस्ता-वस्थेत राहू शकत नाही. त्याला सुद्धा सहा महिने जागरण होतेच. परंतु कर्म करताना, त्या कर्माच्यामुळे दु:खी कष्टी होऊन व्याकुळ राहणाऱ्या लोकांसारखे कर्म नसावे. भगवान म्हणतात, " कर्मफलाच्या आसक्तीशिवाय जो आपला धर्म पाळतो तोच वीतरागी ! तोच खरा योगी होय."

समत्वबुद्धीपासून विचलित होता कामा नये. सदैव कार्यमग्न असावे. तू जे काही करशील त्याचे फल चांगलेच असेल. तू निष्क्रिय राहिलास तरी तुझे मन स्वतःच कर्मरत राहील, भलेच करत राहील. शरीर जे कर्म करत असते, तेच केवळ कर्म नाही. मनाद्वारे केलेले पण कर्मच असते. जप करणे म्हणजे कर्म नाही का ? शास्त्र, कविता, नाटक, वेदशास्त्र, नियम, पुराण, कथा–कहाणी आदि सर्व सृजनात्मक कर्म नाही का ? हे सर्व शरीरकृत कर्म नाही तर मनकृत कर्म आहे."

बुद्धीला भ्रमात पडू देऊ नका.

पुढे श्रीकृष्ण म्हणतात—" योगाचा मार्ग अवलंबावा कारण योगच सर्व कर्मांत कुशल आहे."

कर्म करण्यासाठी आपल्या स्वतःला योग्य बनविणे म्हणजेच योग आणि योग म्हणजे समत्व. " **समत्वम् योग उच्यते** " म्हणजे निश्चल मनाने, अनासक्त राहून, निर्भय होऊन, कर्मात मग्न राहणे म्हणजेच मनाच्या पूर्ण तन्मयतेची साधना होय.

एखाद्या वस्तूत चित्त लावताना, तुमचे मन–ती वस्तूच बनून जाते, तेव्हाच तुम्ही त्या वस्तूचे जाणकार ज्ञाते बनू शकता. भगवान म्हणतात–" **योगस्थः कुरु कर्माणि** "– योगात स्थित होऊन कर्म करा.

योगी आपल्या ज्ञानाला ईश्वरीय ज्ञानाप्रमाणे व्यापक बनवितो. कारण ध्यान स्थित होणे, पाहणे त्याच्यासाठी बोधगम्य होऊन बसते. म्हणून त्याचे ज्ञान विशाल होऊन जाते. अलौकिक बनते, त्याचे ज्ञान अमर्याद होते. म्हणूनच तो ईश्वराला समस्त सृष्टीत पाहू शकतो.

वेदांत सांगितलेल्या सिद्धांतांच्या व्याख्येच्या रूपात भगवद्गीतेची रचना झाली. ऋग्वेदातील पुरुषसूक्त सांगते— " **पुरुष एवेदं सर्वं, यद्भूतं यच्च भाव्यम् ।** " हेच गीतेत भगवान असे सांगतात—" हे अर्जुना ! जो संपूर्ण भूतांत आत्मा पाहू शकतो आणि सर्व भूतमात्रांना आत्म्यात पाहू शकतो, तोच दर्शक होय."

तुम्ही स्वतःच ईश्वर आहात, तुमच्याकडून झालेले कर्मसुद्धा ईश्वरीय कर्म होय. तुमचे बंधनात अडकणे सुद्धा ईश्वरीय कर्म आहे. इतर बंधनात तुमचे पडणेही ईश्वरीय कर्मानुसार आहे. तुमची बंधनातून सुटकासुद्धा ईश्वरेच्छाच आहे. विधान आहे.

असे जर आहे तर बंधनमुक्त होण्यासाठी मी प्रयत्नशील कशासाठी राहू ? जर सर्व काही ईश्वरी इच्छेप्रमाणे चालते तर मग मुक्ती मिळवण्यासाठी मी प्रयत्न कशाला करू ? कोणी असा प्रश्न उपस्थित केला तर मी त्याला विचारतो की, " मुक्ती म्हणजे काय ?"

सर्व तऱ्हेची दुःखे, भय आणि चिंता यांच्यापासून मुक्त राहण्याची इच्छा म्हणजे मुक्ती. जर ती मिळविण्यासाठी तुम्ही इच्छुक असलात तर त्यासाठी तुम्ही अवश्य प्रयत्न

करावा, अन्यथा दु:ख आणि चिंता यामध्ये सदैव गुरफटून बसाल. तुम्हाला कोण अडविणार ? परंतु जे कर्म कराल ते ह्याचा पूर्ण बोध घेऊन करा की हे माझ्या ताब्यातील नाही—ईश्वरेच्छेनुसार आहे. ह्यामुळे तुमचे कल्याणच होईल, असेच शास्त्रादि सांगतात. '**सर्वं विष्णुमयं जगत्**' हाच सनातन धर्माचा सिद्धांत आहे. सर्व काही ईश्वरमय आहे. समस्त जगत्, समस्त जीव, जड-चेतन, दृश्य-अदृश्य, वस्तू सर्व ईश्वरीय कर्म आहेत. ईशावास्योपनिषदात सांगितले आहे- "**ईशावास्यं इदं सर्वं यद् किं च जगत्यां जगत्।**" म्हणजे—'ह्या जगात जे काही घडते ते ईश्वरमय आहे,' हेच तत्त्व भगवान् गीतेत सांगतात—"साऱ्या जगतात व्याप्त असलेला परमात्मा अविनाशी आहे."

ह्या सृष्टीत सर्व ईश्वरी अंश आहे, सर्व कर्म ईश्वराचेच आहे, तेव्हा चिंता करणे किंवा दु:खी राहणे हे मूर्खपणाच्या शिवाय दुसरे काय ठरेल ?

सर्व काही ईश्वरेच्छेमुळे होते, तर मग आम्ही चिंतामग्न का ? (काय, ज्याने माझ्या कपाळावर प्रारब्धलेख लिहिला ते शिवशंकर मृत्यू पावले ?) सर्व तारांगण ईश्वरी आदेशानुसारच फिरते. हीच शक्ती त्रिलोकाचे संचालन करीत असते. तुम्हीसुद्धा तोच आहात. तुमचे मन, तुमचे चित्त, चित्तवृत्ती...सर्व काही तोच आहे. '**सर्वं विष्णुमयं जगत्**'. अरे मानवा ! का वृथा ओझे घेऊन फिरत असतोस ? अरे, सारा भार एकदम उतरून फेकून दे आणि निश्चित होऊन आपले कर्म करीत राहा. जो जसा इच्छील तसा राहू दे. तुम्हाला काय त्याचे ? काय तुम्ही हे जग निर्मिले आहे ? जग म्हणताना स्वत:ला वगळून अन्य जगताची गणना करू नये. तुम्ही ज्याच्यात आहात, ते जगत तुम्ही निर्माण होण्यापूर्वीच निर्मिले गेले आहे. तुमचे पालनपोषण केले गेले आहे. अरे मानवा, काय तू हे जग निर्मिले आहेस ? काय तूच ह्या जगाचा संचालक आहेस ? काय हे तारांगण तुझ्या इशाऱ्यावर चालते ? ह्या जगात तू आपल्या इच्छेने जन्म घेतला आहेस का ? तर मग, प्रत्येक गोष्टीची जबाबदारी आपल्यावर घेऊन का फिरत असतोस ?"

भगवान म्हणतात, " हे अर्जुना ! राग, भय आणि क्रोधरहित अन्योन्य भावांनी माझ्यातील तसेच मला शरण आलेल्यातील खूप महापुरुष ज्ञानरूपी तपाने माझ्या स्वरूपात विलीन झालेले आहेत. (**गीता—चवथा अध्याय, दहावा श्लोक**) ह्या श्लोकात इहलोकीच जीवनमुक्त होऊन ईश्वरी अवस्थेप्रत पोहोचण्याचा उपाय सांगितला आहे. भगवान म्हणतात, "ज्ञानरूपी तपस्येची साधना करा. राग, क्रोध व इच्छा यांचा त्याग करा. माझ्या शरण येऊन मजस्वरूप होऊन जा." भगवान म्हणतात, " हे अर्जुना ! जो पुरुष संपूर्ण कर्म परमात्म्याच्या आश्रयाने करतो, जो मन आणि इंद्रिये यांच्यासंबंधी आसक्ती ठेवत नाही, तो पापात लडबडत नाही. जसे कमळाचे पान पाण्यात राहूनसुद्धा पाण्यापासून अलिप्त राहते तसेच." ( **गीता—पाचवा अध्याय, दहावा श्लोक** ).

हे मनुष्यप्राण्या ! किती मार्मिक आहे हा संदेश ? पापापासून स्वत:ला वाचविण्याचा मार्ग न समजल्यामुळे व्याकुळ होणाऱ्या हे मानवा ! भगवानांनी ह्या श्लोकाच्या द्वारा तुला सन्मार्ग दाखविला आहे. परमेश्वराचे ध्यान करीत केलेले कर्म त्याचेच होते, त्याच्यासाठीच केलेले असते, अशा अकर्त्याच्या भूमिकेतून केलेले कर्म मग ते कुठलेही असो, त्यात पापाचा लवलेशही उरत नाही. कमळाच्या पानावरील जलबिंदूप्रमाणे पाप तुझ्या चित्ताला भुलवू शकणार नाही, घरंगळत वाहून जाईल.

भगवान सांगतात, " मनुष्यमात्रात कोणत्याही कर्माचे कर्तेपण नाही. कर्म करण्याचे कौशल्य परमेश्वराने त्याला दिलेले नाही. कर्माचे फळपण तो भोगत नाही. सर्व काही प्रकृती धर्माप्रमाणे चालते. " **(गीता–पाचवा अध्याय, चौदावा श्लोक)**

मनुष्य आपल्या कर्माचा कर्ता नाही. तर मग आपल्या कर्मासंबंधी चंचलता दाखविण्याची व ईर्ष्या करण्याची काहीही आवश्यकता नाही. आपल्या संकल्पित कार्यांत हा बाधा आणील, असा विचार करून अन्य प्राण्यांशी संघर्ष करण्याचीही आवश्यकता नाही.

भगवान सांगतात, " पंडितजन म्हणजे यथार्थबुद्धिलोक आत्मज्ञानी, विद्याशील, विनयशील ब्राह्मण, गाय, हत्ती, कुत्री आणि त्यांना खाणारे चांडाळ या साऱ्यांना समान दृष्टीनेच पाहतात. "

" **आत्मवत् सर्व भूतेषु** "– " संपूर्ण जीवमात्रांना आपल्या तुलनेतच निश्चित भावाने पाहणे, जातिभेद व बुद्धिभेद या दृष्टीने न पाहणे, हेच ज्ञानी लोकांचे लक्षण आहे– " असे भगवान म्हणतात.

सर्व सृष्टी ईश्वरीय आहे ना ! प्रत्येक जीवात विष्णूचा अंश आहे ना ? '**सर्वंभूतम् ब्रह्म**' सर्पसुद्धा नारायण आणि शृगालसुद्धा नारायण आहे. ब्राह्मण ईश्वर आहे तर चांडाळही ईश्वरच ! तर मग एका जीवाला दुसऱ्यापेक्षा कमी लेखणे हे अज्ञानाचे लक्षण नव्हे काय ? असे उच्चनीचभेदाची दृष्टी ठेवणारे कधीही दु:खापासून निवृत्त होणार नाहीत. जेथे ही भेददृष्टी आहे, तेथे भयही असते आणि संकटसुद्धा असते. मृत्यूही असतो. सर्व भेदभावांपासून मुक्त राहणे म्हणजेच ज्ञान होय. तीच खरी मुक्ती !

# चंद्रिकेची कथा *

## भूकंप

पोतिकै पहाडाच्या डोंगराळ भागात वेळानगुडी नावाचे एक सुंदर शहर वसलेले आहे. गावाला स्पर्श करून जाणारी एक छोटी नदी वाहते. चारी दिशांना असलेली पर्वतांची सुनील शिखरे आणि हिरवीगार वनराजी नजरेत भरते. सारं गाव घनदाट बागबगीच्यांनी वेढलेलं आहे. सूर्योदयापासून ते सूर्यास्तापर्यंत विविध पक्ष्यांचा मधुर किलकिलाट कानांत घुमत राहतो.

ह्या गावाच्या वस्तीपासून जरा दूर, पश्चिमेकडे, नदीच्या जवळ ब्राह्मणांची गल्ली आहे. ह्या गल्लीतील लहान मुलांचे आवाज, चिवचिवाट करणाऱ्या पक्ष्यांच्या मधुर कलकलाटात ती मुलं वाढली असल्यामुळे असेल कदाचित–फारच गोड आणि सुरेल होते. ती मुलं, विशेषत: मुली, आपण बोलतो तीच तमिळ भाषा बोलत, परंतु त्या भाषेत त्या इतक्या गोड आणि मधुर आवाजात बोलत की जणू कोकिळेचं कूजन, पोपटांच्या लकेरी किंवा नागणवाय चिमण्याचं चिवचिवणंच !

त्याच गल्लीत पूर्व दिशेला एक कृष्णमंदिर होतं. मंदिरासमोर हिरव्यागार गवतानं भरलेलं एक मैदान होतं, ज्यावर गायी, बैल आणि काही गाढवंही चरत होती. काही गायी कृष्णमंदिरासमोर बसल्याबसल्या रवंथ करत असत, जसं काही परमेश्वराचंच स्मरण करीत आहेत. कावळे त्यांच्यावर येऊन बसत आणि अगदी मजेत त्यांच्या शरीरावर जमलेल्या कृमिकीटकांवर चोची मारत, आणि गाईंना गोड अशी वेदना होई. कधीकधी डोळ्यांतील बुबुळावर चोच मारण्याचा अभिनय करून गाईचं मनोरंजनही करीत. वृक्षांच्या फांद्यांवर बसलेले पक्षी हे सर्व पाहता पाहता विस्मय-विमुग्ध भावात किलबिलाट करीत.

वेळानगुडीमधील ही ब्राह्मणांची गल्ली अपूर्व शांती, सौंदर्य आणि स्नेह यांचं मूर्तिमंत रूप बनली होती. गल्लीतील स्त्रिया फार रूपवान होत्या. पुरुषमंडळी सुशील आणि गुणी होती खरी परंतु त्यांच्यामधील बहुतांश लोक गरीब होते. जवळजवळ प्रत्येकाकडे वाडवडिलार्जित संपत्तीच्या रूपाने मिळालेले बागबगीचे, जमीन आदी थोडीबहुत अवश्य होती. परंतु त्यांतून होणाऱ्या उत्पन्नावर उदरनिर्वाह चालणे कठीण

* ह्या कथेला कादंबरिकेचे रूप देण्याची भारतीची इच्छा होती. परंतु त्यांची इच्छा पूर्ण होण्यापूर्वीच त्यांना यमदेवाचे आमंत्रण आले. '**विशालाक्षीची कथे**' (चंद्रिका) ची काही शेवटची प्रकरणे अपूर्णच राहिली. येथे त्या अपूर्ण कादंबरिकेचे पहिले प्रकरणच फक्त दिले आहे.

होते. अशा मर्यादित उत्पन्नातच धोतर-कपडे, लुगडी-चोळया, लुंग्या, मुंडन, कर्णच्छेदन, मौजीबंधन, विवाहादी मंगलकार्ये; सासरपाठवणी, सीमांतपूजन वगैरे सणसमारंभ; उत्सव, जलसे आदींमुळे काही ना काही तरी खर्चाची भर पडत असे. त्यामुळे त्या गल्लीतील गृहस्थधर्मीयांच्या जमीनजायदादीत हळूहळू घट येत असे आणि मिळकतीच्या या अभावामुळे ते दुःखी बनत चालले होते. परंतु घरच्या प्रौढमंडळीची ही मानसिक व्यथा ना त्या गल्लीतल्या बाळगोपाळांच्या ध्यानात येत होती ना तेथील पक्ष्यांच्या. मंदिरासमोरील हिरव्यागार कुरणात चरणाऱ्या गाई आणि गाढवं यांनाही ही व्यथा कळत नव्हती. ते तर सदैव आनंदात गडबड करत, गात, हर्षभरानं नाचत असत.

ह्या गल्लीतील ब्राह्मणांत सर्वांत अधिक अडचणीत होती एक व्यक्ती, जिचं नाव होतं महालिंग अय्यर. त्यांचा परिवार होता मोठा आणि घर होतं सर्वात लहान. वृद्ध माता-पिता, एक विधवा बहीण, तीस वर्षांची पत्नी, पाच कन्या एवढं होतं त्यांचं कुटुंब. सहावं मूल होऊ घातलं होतं.

इतक्या लोकांचं पोट कसं भरावं ? वाडवडिलार्जित संपत्ती अशी महालिंग अय्यरला काही मिळालीच नव्हती. परिवाराच्या पालन-पोषणासाठी, कमाई करण्यासाठी आवश्यक असलेल्या तारुण्याच्या उत्साहाची आणि आत्मविश्वासाची साथ तर केव्हाच सुटली होती. त्याचं वय चाळीस वर्षांहून अधिक नव्हतं. पण मुलांची वाढती संख्या, पत्नीच्या तक्रारी, वृद्ध मातापित्यांचे आजारपण, विधवा बहिणीचं तारुण्य इत्यादी दुःखांनी पीडलेले महालिंग अय्यर इतके गांजले होते की त्यांच्या डोक्यावरचे केस एकदम पिकलेले होते, कंबर वाकलेली होती, शरीर सुकून काटकीप्रमाणे झालं होतं. पिचलेले गाल, खोल गेलेले डोळे, आणि यौवनाच्या मस्तीत केलेल्या अतिशृंगारामुळे झालेल्या गरमी रोगाची चिन्हे विद्यमान असणारी पाठ, खांदे आणि चेहरा !

मार्गशीर्ष महिन्यातील रात्र होती. आकाशात घनदाट अन्धकार पसरलेला होता. तारेसुद्धा नजरेला दिसत नव्हते. सर्व गावकरी आपल्या आपल्या घरात चिडीचाप बसलेले होते. बाहेर मुसळधार पाऊस आणि वादळी वारे यांनी अक्राळविक्राळ रूप धारण केलं होतं. क्षणाक्षणांत इतक्या जोरानं गडगडाट होई की वाटे दुनिया चक्काचूर होऊन जाईल त्यामुळे. कुठून तरी वृक्ष कोलमडून पडल्याचा आवाज येई. वाटू लागे की सर्व बागबगीचे घाबरून इतस्ततः पळताहेत. जवळपासचे डोंगर एकमेकांशी टकरा देत आहेत, असे भयंकर आवाज येत होते.

घरांत दडी मारून बसलेल्या लोकांना निश्चित वाटलं की आज प्रलय होणार आहे. दुनियेचा अंत ओढवला आहे. बाळगोपाळ मंडळी घाबरून किंचाळू लागली. स्त्रिया घाबरून गेल्या, पुरुष कापू लागले. वादळाची भीषणता वाढू लागली.

एकाएकी भूमी हादरली. भूकंप झाला. त्या गल्लीतील घरं जुनाटच होती. त्यांतील एकही शिल्लक राहिलं नाही. त्या घरांत जितकी माणसं होती, ती सर्वच्या सर्व मृत्यु-मुखी पडली.

महालिंग अय्यरच्या घराला बाहेरच्या दरवाज्याला लागून एक छोटी खोली होती. बस्, आता तीच फक्त शिल्लक उरली होती. घराच्या ओसरीवर महालिंग अय्यर, त्याचे वृद्ध मातापिता, त्यांच्या पाचीच्या पाची मुली एका ठिकाणी घाबरून जमले होते. ही सर्व मंडळी कोसळणाऱ्या भिंतीखाली दबून मृत्युमुखी पडली. बाहेरच्या खोलीत मात्र महालिंग अय्यरच्या पत्नीला प्रसववेदना होत होती. तिच्या शेजारी अय्यरची विधवा बहीण बसली होती.

रात्री सात वाजण्याच्या सुमारास जी वर्षा आणि वादळ सुरू झाले ते पहाटे चार वाजता एका मोठ्या भूकंपाबरोबरच थंड झाले. अर्ध्या घंट्यातच सारं काही पूर्ववत् शांत झालं. दुसऱ्या दिवशीचा सूर्य वर आला. विधवा बहीण विशालाक्षी आता बाहेर पडली. तिला दिसलं की सारी घरं गाडली गेली आहेत, (सर्व काही) तुटून फुटून विखुरलं गेलंय्. जिथं पाहावं तिथं प्रेतं आणि पशुपक्ष्यांची निर्जीव शरीरं. पुऱ्या गावाला पाहण्यासाठी तिच्याकडे वेळ होता कुठं ? पाऊस आणि वादळ यांच्या तडाख्यातून वाचण्यासाठी या गल्लीत जे आले होते त्यांचीच प्रेतं तिनं पाहिली होती. कोसळलेल्या घरांच्या ढिगाऱ्यात दबून प्राण गमावलेल्या लोकांना ती पाहू शकत नव्हती. परंतु आपल्या घरातील कोणीही जिवंत राहिलं नाही हे मात्र तिच्यापासून लपलं नाही. त्यावरूनच गावातील एकंदर परिस्थितीचं अनुमान तिनं काढलं. गल्लीबोळात कुणीही दृष्टोत्पत्तीस न पडल्यामुळे तिला सारं गाव ओसाड वाटलं.

काल रात्रीची भयंकर, घाबरून सोडणारी स्मृती अजून तरंगत होती. धरती हललेली पाहून महालिंग अय्यरचे वृद्ध पिता जोरात ओरडले, "बापरे ! पृथ्वी हलत आहे. भूकंप होतोय्. चला लवकर, आपण सर्व बाहेरच्या छोट्या खोलीत जाऊ. मलाही तेथे न्या." त्यांचं हे किंचाळणं विशालाक्षीच्या कानावर पडलं होतं, याच्यानंतरचं संभाषण मात्र तिला ऐकू आलं नाही. बाहेरच्या खोलीत येण्यासाठी ओसरीवर येऊनच येता आलं असतं. घरातूनच ह्या खोलीत येता आलं नसतं. तरीसुद्धा छोट्या खिडकी-तून म्हाताऱ्याची किंकाळी वादळाच्या हाहाकाराला चिरत तिच्या कानापर्यंत आली होती.

त्या लोकांचं खोलीत येणं संभवनीय नव्हतं, हे तिला कळून चुकलं होतं. कारण बाहेरचा दरवाजा उघडून चबुतऱ्यावरून चढूनच ह्या खोलीत येता आलं असतं. ते कसं शक्य होतं ? दरवाजा उघडताच सप्तमेघ आणि प्रलयंकारी वादळ घरात घुसलं असतं ना ? विशालाक्षीला वाटलं की ह्या विचाराने ते बाहेर आलेच नसावेत. एका

क्षणार्धात भिंत तुटून कोसळून पडण्याच्या आवाजात लोकांची करुणकिंकाळी तिला ऐकू आली. तिला वाटलं, सर्वच्या सर्व मृत्युमुखी पडले असतील का ? ती आता आपल्या खोलीची भिंत पडण्याची वाट पाहात राहिली. इतक्यात भूकंप थांबला, थोड्याच वेळात पाऊस आणि वादळही शमलं.

काल रात्रीच्या स्मृतीत गढलेली विशालाक्षी चारी दिशांना दिसणाऱ्या पडलेल्या भिंती, उन्मळून पडलेले वृक्ष यांना पाहात उभी होती. तेवढ्यात खोलीतून नवजात अर्भकाचं रडणं ऐकू आलं. ती धावत आत गेली तर तिला दिसलं की तिच्या वहिनीनं–गोमतीनं–एका मुलीला जन्म दिला आहे !

विशालाक्षी नवजात मुलीची काळजी घेण्यात मग्न होती इतक्यात गोमती आसन्न-मरण झाली. शेवटचा श्वास घेण्यापूर्वी ती एवढंच म्हणाली–– " विशालाक्षी ! विशालाक्षी ! ! अग ऐक ! मी आता दोन मिनिटांपेक्षा अधिक काळ जिवंत राहात नाही. प्राण जाण्यापूर्वी तुला एकदोन गोष्टी सांगायच्या आहेत. जोपर्यंत तुझ्या शरीरात प्राण आहेत तोपर्यंत त्यांना विसरू नकोस. सर्वप्रथम म्हणजे तू पुनर्विवाह कर. विधवाविवाहात गैर काही नाही, तो न्यायसंगतच आहे. स्त्री असो वा पुरुष, दोघेही समान रूपाने काळच्या देवाच्या अधीन आहेत. म्हणून स्त्रिया पुरुषांच्या गुलाम म्हणून राहिल्या ? हे पाहा ! नीचपणाने, पुरुषांनी बनवलेलं हे शास्त्र स्वार्थी हेतूतून बनविण्यात आले आहे. ते फाडून चुलीत टाकून दे. हिम्मत धरून मद्रासला जा. तेथे विधवांच्या मदतीसाठी जी संस्था आहे तिचा पत्ता शोधून काढ, त्यांच्या मदतीने तुझ्या योग्य असा वर शोधून काढ. दुसरी गोष्ट ही की माझ्या मुलीचा तू आजन्म सांभाळ कर आणि हो, तिचं नाव " चंद्रिका ठेव."

विशालाक्षी म्हणाली, " ठीक आहे ! "

गोमतीचे प्राण पक्षी उडून गेले.

## वेदकालीन ऋषींची कहाणी*

काशी विश्वविद्यालयाच्या पायाभरणी समारंभाच्या वेळी अनेक विद्वानांची भाषणे झाली. त्यातील सुप्रसिद्ध वैज्ञानिक श्री. जगदीशचंद्र बसु यांचे भाषण महत्त्वपूर्ण आहे–

" लौकिक शास्त्रांच्या म्हणजे भौतिक शास्त्रांच्या संशोधनकार्यात भारताला पुन्हा अग्रभागी आणून ठेवणं हे आमचं कर्तव्य आहे." ह्यावर अधिक प्रकाश टाकताना

* केवळ भूमिका मात्र येथे दिली आहे.

त्यांनी शेवटी सांगितले, " हिंदु समाजात आणि संस्कृतीत एक अलौकिक अशी शक्ती आहे. काळाच्या दुर्दम्य ऱ्हासामुळे जगभर उलथापालथ घडवून आणणारे परिवर्तन झाले, परंतु आपल्या अलौकिक शक्तीच्या बळावर आपला समाज त्याच्याशी सामना करत आला आहे. नाईलनदीच्या तटावरील असीरिया देशात आणि पापिलोनियात ज्या महान् संस्कृती हजारो वर्षांपूर्वी विकसित झाल्या, त्या नष्ट होण्याचे परिवर्तन आमची संस्कृती पाहात होती. त्या काळातही भारतमातेला आपल्या चिरंतनतत्त्वावर विश्वास होता आणि आजही ती चिरयौवनाच आहे. भविष्यकाळातही ती चिरकालीन राहील, ह्यासंबंधी सुद्धा तिला विश्वास वाटतो.

नवीन शास्त्रांच्या विद्यारूपी पर्वतावर ज्योति:स्तंभाप्रमाणे प्रकाशकिरणे पसरविणारे श्रीमान जगदीशचंद्र बसूंचे हे शब्द कोरे औपचारिक शब्द नव्हेत. मध्यकालीन युगाच्या मूर्ख विचारांना मोठ्या अभिमानाची बाब समजणाऱ्यांकडे आपण लक्ष न देणेच योग्य ठरेल. ह्याव्यतिरिक्त शास्त्रज्ञबसूंनी जे सांगितले त्याचा आदरपूर्ण स्वीकार केला पाहिजे. मध्ययुगीनकालात, मिथ्या बडबड, निराशा आणि उदासीनता यांच्या कचऱ्याचे जे ढीगच्या ढीग पडले होते, त्यांच्या ओझ्याखाली आपला देश दाबला गेला होता. भारतमाता एका गाढ निद्रेत होती. आता त्या कचऱ्यातून वर निघून धैर्यरूपी पतित-पावन गंगेत डुबकी मारून आपला भारतीय समाज आपल्या गगनमंडळावर उगवलेल्या सूर्याचे अभिनंदन करत आहे.

ह्या अमर जिवंत हिंदुसंस्कृतीरूपी कल्पवृक्षाचे बीजारोपण ज्यांनी केले होते ते आपले वेदकालीन ऋषिगण होते. किती शतकांपूर्वी ते विराजमान होते ह्याचा हिशेब लावून सप्रमाण सांगण्यासाठी आधुनिक शास्त्रज्ञांजवळ काहीही साधन नाही. हिमालय-पर्वताचा उद्भव कधी झाला, हे कोणाला ठाऊक आहे ? वेदकालीन ऋषिगण कोणत्या युगात होऊन गेले ? हे कसे सांगावे ?

श्री रामकृष्ण परमहंस म्हणतात—" प्रार्थना करण्याच्या वेळी ती हृदयाच्या तळा-पासून निघाली पाहिजे. थोडे दिन आपण तग धराल तर माझी माता जगदंबिका आपली प्रार्थना पुरी करील."

परमहंस महाराजांनी योग्य तेच सांगितले—हृदयाच्या तळापासून निघालेल्या प्रार्थनेला 'मंत्र' म्हणतात, मंत्र फलदायीच ठरणार. परंतु ही साधना सुलभ नाही. हृदयाचा तळ अतल आहे, अगम्य आहे, अगाध आहे. मानवाने समुद्राच्या खोलीचा पत्ता लावला आहे परंतु हृदयाच्या तळाचा शोध लावणे हे समुद्राच्या खोलीचा पत्ता लावण्यापेक्षा कितीतरी पटीने कठीण आहे. परंतु निराश होण्याचे काही कारण नाही. प्रत्येक जण आपापल्या हृदयसागराच्या तळाशी यथासाध्य विमग्न होऊन अनोख्या अशा वस्तू प्राप्त करू शकतो. ह्या तळाकडे जितके खोल पोहोचता येईल तितके

नवेनवे मोती हातात येतील.

ऋषिजन निश्चल मनाचे असतात. म्हणूनच सहजगत्या ते मनाच्या खोलीत शिरून तेथून 'मंत्र' घेऊन येऊ शकले. ह्या मंत्रांच्या साहाय्याने देवगण वश राहतात. कोऱ्या शब्दांना काहीही महत्त्व नाही. पण तेच शब्द जर हृदयाची तळमळ प्रकट करू शकलें–"जसे तुमचे विचार असतात, तसेच तुम्ही वनता." "करणी तशी भरणी"—हे सत्यवचन अमर आहे. चिंतन, दृढ चिंतन, अविचलित चिंतन—सत्वरच हे चिंतन सर्वविदित सार्वभौतिक सत्यात रूपांतरित होऊन जाईल. मधुचंद्र ऋषींनी वर सांगितलेल्या शास्त्रसंपन्न मंत्राच्या साहाय्यानेच 'इन्द्रन' नामक वैज्ञानिक शक्तीला स्थापित करतात. हे मंत्र कवितांच्या रूपांत उद्भासित आहेत.

ऋग्वेदात ऋषींच्या काव्यकृतीचे अध्ययन करताना आमच्या हृदयात मधुरस प्रवाहित होतो. बुद्धी परमेश्वरी भावनांनी प्रेरित होऊन जाते.

## तराजू *

गतसप्ताहात मद्रासमध्ये कंदस्वामी मंदिराच्या वसंतमंडपात संत महासंघ यांच्या आधिपत्याखालो एक सभा झाली. स्वामी अद्भुतानंदांनी श्रोतृवृंदापुढे एक सुदर प्रवचन केले असे ऐकतो.

स्वामींजीच्या प्रवचनाचे सारसूत्र असे होते म्हणे–धर्मासंबंधी आपले पूर्वज महत्त्वपूर्ण असे विचार मांडत आले आहेत. हे विचार योग्यपणे समजून घेऊन सर्व जगापुढे प्रतिपाद्रन करावयाची जबाबदारी आपल्यावर आहे, धर्मविषयक बाबीत अमेरिका आणि युरोपदेशवासी आपल्याकडे मोठ्या अपेक्षेने पाहात आहेत. धर्मासंबंधीच्या विचाराचे प्रकटीकरण म्हणजे पारमार्थिक सत्याबद्दल चर्चा. पंचेंद्रियांसाठी अगोचर असणारे आणि बुद्धिप्रामाण्याच्या बळावर जाणणे शक्य आहे असे अलौकिक स्वरूपाचे सत्य ! हे तर ज्ञान, भक्ती आणि योगविद्या ह्यांच्याच द्वारा शक्य होईल. नितान्त परिश्रम आणि कडक तपश्चर्येच्या जोरावर आपल्या पूर्वजांनी ह्या सत्याची महती आपापल्या ग्रंथात वर्णिली आहे. विश्वाची उन्नती साधावयाची असेल तर ह्या ज्ञानरूपी अमूल्य ठेव्याचा विचारपूर्वक आणि कुशलतेने उपयोग करून अखिल जगतातील दु:ख, वेदना आणि अज्ञान दूर करण्यासाठी दोन्ही हातांनी ज्ञानदान करीत राहिले पाहिजे.

तिरुवल्लुवरने म्हटले आहे—

* 'तराजू' नामक निबंधाचा काही अंश.

" नाम् इम्बुरुवदु उलगु इम्बुरवकंडु
कामुरुवर् कट्रिंदार."

स्वत:ला आनंदित करणाऱ्या ज्ञानाने जगही आनंदित झालेले पाहून बुद्धिवंत अधिकाधिक ज्ञान मिळविण्याची ईर्ष्या धरतील. स्वामी अद्भुतानंदनांचे विचार अशाच प्रकारचे आहेत. ह्या विचाराशी मीमुद्धा, पूर्णपणे सहमत आहे. परंतु आपल्याला केवळ हेच करून थांबावयाचं नाही. भौतिक बाबीबद्दल सुद्धा जगाच्या आमच्याकडून अपेक्षा आहेत, हे विसरून चालणार नाही. आपल्या पूर्वजांनी केवळ पारमार्थिक विषयात अद्वितीय अशी प्रगती केली असे नव्हे तर भौतिक विषयांतही त्यांनी उल्लेखनीय उन्नती केली होती. देशोदेशीच्या साहित्याविषयी आणि कलांविषयी माझ्या एका मित्राचे ज्ञान वाखाणण्यासारखे आहे. त्याचे म्हणणे असे आहे की ग्रीक लोकांच्या ज्या वास्तुशिल्पाबद्दल युरोपमध्ये एवढी प्रशंसा केली जाते त्याच्यापेक्षा आमच्या देशात आढळणारी वास्तुशिल्पे अधिक चांगली आहेत. जगाला हे पटवून देण्याच्या उद्देशाने तर आनंद कुमारस्वामींसारख्या प्रतिभाशाली व्यक्ती प्रयत्नशील राहिल्या. परंतु अख्ख्या तामिळनाडूमध्ये राहणाऱ्या लोकांत हे पटलेला कोणीही दिसत नाही. मी स्वत: बऱ्याच देशांच्या संगीतशास्त्राचा काही अंशी तुलनात्मक अभ्यास केला आहे. मी तरी ह्याच निष्कर्षाला येऊन ठेपलो आहे की आपल्या प्राचीन संगीतशास्त्राची बरोबरी करू शकेल असे संगीत जगातील इतर कुठल्याही देशाकडे आढळत नाही. काव्याच्या प्रांताबद्दलही हेच म्हणता येईल, शिवाय गणित, रसायनशास्त्र इत्यादी कितीतरी शास्त्रे सर्वप्रथम आपल्या देशातच विकसित झाली होती, असे दिसते.

तर सागायचा मुद्दा हा की आपल्याला भौतिक ज्ञानाच्या क्षेत्रातही उन्नती करावयाची आहे. ज्या शास्त्रात आपण अज्ञ आहोत, त्यांच्याविषयींचे ज्ञान आपल्याला इतरांकडून मिळवावयाचे आहे. त्याच शास्त्रांना आपल्या बुद्धीच्या आणि मेहनतीच्या योगाने परिपुष्ट करून आपले ज्ञान जगासमोर पुन्हा मांडावयाचे आहे. भौतिक क्षेत्रांच्या विकासात आपल्यालाच सदैव पुढे राहावयाचे आहे. आपणच एकमात्र या कामासाठी योग्य आहोत, असा मला विश्वास वाटतो.

मुंबई काँग्रेसच्या अधिवेशनात भाग घेण्यासाठी विभिन्न प्रांतातून जे प्रतिनिधी येणार आहेत त्यात काही महिलाही असतील अशी आशा आहे. प्रतिनिधींच्या मदतीसाठी ज्याप्रमाणे नियत सेवादलाचे स्वयंसेवक आहेत, त्याचप्रमाणे महिला प्रतिनिधींची देखभाल करण्यासाठी स्वयंसेविका पण तयार आहेत असे कळते. मला तरी वाटते की ही देशाच्या उज्ज्वलभवितव्यसूचक अशी घटना आहे.

अरे हो ! एक गोष्ट सांगायची राहून गेली होती. चीन देशाच्या लोकतंत्राचा नेता असलेल्या युवान-शी-कै चे विचारही अधिकाधिक परिपक्व बनत चालले आहेत.

पूर्वीची राजेशाही संपुष्टात आणण्यासाठी भगीरथाप्रमाणे अविरत प्रयत्न करून चिनी लोकांनी लोकतंत्र अस्तित्वात आणले. युवान-शी-के जवळ साऱ्या सेनेचे बळ होते, म्हणून चिनी लोकतंत्राचे अध्यक्षपद मिळणे त्याला सोपे झाले. काही दिवसांचा कालावधी संपतो न संपतो तोच युवानला असे जाणवू लागले की चीनसाठी लोकतंत्रा-पेक्षा पूर्वीची राजेशाहीच अधिक योग्य आहे इतरांना वाटले की ह्या महाशयांना स्वतःच राजाच्या सिंहासनावर बसण्याची स्वप्ने पडू लागली आहेत. अशा अफवाही पसरू लागल्या की आपल्या मुलीचा विवाह तो राजकुमाराबरोबर करू इच्छितो. म्हणून आपल्या देशाच्या ज्योतिर्विदांना माझी नम्र प्रार्थना आहे की त्यांनी चीनच्या लोकतंत्राचे आयुष्य अजून किती काळ आहे याची माहिती काढावी. त्याच्या जन्म-पत्रिकेसंबंधी काही माहिती आवश्यक असल्यास मी ती पुरवितो.

त्या लोकतंत्रात राहू उच्चीच्या स्थानावर आहे. दुसऱ्या स्थानावर शनी आहे. शनीचे पंगुत्व सर्वज्ञात आहे. बाकीचे सर्व ग्रह वक्री आहेत. ह्याचे फलही मी सांगू शकेन. परंतु खरे तर ज्योतिषशास्त्राची मूळाक्षरेसुद्धा मला ज्ञात नाहीत.

चेय्यूरहून एका वृद्धाच्या विवाहासंबंधी श्री. मादवय्याने लिहिलेले एक पत्र काही दिवसांपूर्वी ' स्वदेशमित्रन् 'मध्ये प्रसिद्ध झाले होते.

वृद्धाचे वय सत्तर वर्षांचे आहे त्याची माता अद्यापिही जिवंत आहे. त्याच्या आजीचे वय तर अठ्ठ्याण्णव वर्षांचे आहे. वृद्ध मातेच्या आणि आपल्या स्वतःच्या देखभालीसाठी हा म्हातारा सोळा वर्षांच्या युवतीशी विवाह करणार आहे. असे कळते की ह्या म्हाताऱ्याकडे एकवीस तरुण कुमारिकांच्या जन्मकुंडल्याही आलेल्या आहेत. शेवटी कन्यकेचा पिता धन, नशीब आणि ज्योतिष यांच्यावरच विश्वास ठेवून कन्या-दानाला तयार होतो. परमेश्वरावर विश्वास असणारा मात्र कुणी दिसत नाही.

अहो, उंटाचे अंग काय एखाद्याच ठिकाणी वाकडे आहे का ? तामिळनाडूच्या एखाद्याच बाबतीत दु:ख थोडेच वाटते ?

Printed at Beauty Print, Paharganj, New Delhi-55